१ सटवाजी वा। नागोजी मेंढें
५ / ४

सदरहू पांच हरकारे नवे ठविले. दरमाह रुपये ५ पूर्वील प्रमाणें करार केला आहे हे विनती.

पै।। छ २ रबिलाखर सन ११९० हिजरी मंगलवार च्यार घटिका दिवस शेष राहतां.

---

A. R. No. 8. (पो.ता.) २१ शवाल ११९० हिजरी
३ डिसेंबर १७७६

पौ छ २१ शवाल मंगलवार सन ११९० हिजरी मा। जोडी खासगत.

श्रीनिवास

यादी हिशोब जासूद मुलाजम सरकार अज इ।। छ १९ सफर सन ११८५ फसली लगायत आखर शवाल सन ११८६ फसली तारीख मुखतलिफ दरमाह नाईक रुपयेस जासूद नफर दरमाह रुपये ५ वजा कसूर दर महिन्यास रोज अडीच प्र।। ।=।।। बाकी तलब.

३६।।= खंडोजी वा। जिवाजी मा।रनुलेचे यैवजी सटवाजी वा। वाघोजी कामटे अज इ।। छ १९ सफर लगायत छ १९ शवाल वाजिब महिने ८ दर माहे रुपये ५ पैकीं वजा कसूर फी महिन्यास रोज अडीच प्रा।=।।। बाकी तलब दर माह ४।।-।प्रा

३६।।= पिराजी वा। संभाजी जाधव अज इ।। छ २४ सफर लगायत छ २४ शवाल वाजिब महिने ८ दरमाह रुपये ५ वजा ०।=।।। बाकी ४।।-। प्रा.

३६।।=· माहदु वाा वाघोजी कामटे अज इा। छ २९ सफर लगायत छ २९ शवाल वाजिब महिने ८ दरमाह रुपये ५ वजा ·।=।।।· बाकी ४।।~।·

३६।।=· अंधोजी वाा निबाजी झेंडे अज इा। छ २९ सफर लगायत छ २९ शवाल वाजब महिने ८ दरमाह रुपये ५ वजा कसूर ·।=।।।· बाकी ४।।~।·

३२८।।।· विठोजी वाा हसाजी भेंडे अज इा। छ ८ रबिलावल लगायत छ ८ शवाल वाजिब महिने ७ दरमाहे रुपये ५ वजा ८।=।।।· बाकी ४।।~।·

३२८।।।· निंबाजी वाा जिवाजी झेंडे यैवजी देवजी वाा माहदजी बोरसे अज इा। छ २४ रबिलावल लगायत छ २४ शवाल वाजिब महिने ७ दरमाह रुपये ५ वजा ·।=।।।· बाकी ४।।~।·

३२८।।।· माणकोजी वाा खंडोजी अज इा। छ १ रबिलाखर लगायत आखर शवाल महिने ७ दरमाह रुपये ५ वजा कसूर ८।=।।।· बाक़ी ४।।~।· प्रा.

३२८।।।· सटवाजी वाा आपाजी राऊत अज इा। छ १ रबिलाखर लगायत आखर शवाल वाजबी माहे ७ दरमाहे ५ वजा ·।=।।।· बाकी ४।।~।· प्रा.

३२८।।।· पिराजी वाा केरोजी चव्हाण अज इा। छ १ रबिलाखर लगायत आखर शवाल वाजबी माहे ७ दरमाहे रुपये ५ वजा ·।=।।।· बाकी ४।।~।· प्रा.

३२८।।।· सेटी वाा नागोजी मेढे अज इा। १ रबिलाखर लगायत आखर शवाल वाजब माहे ७ दरमाहे ६ रु।। वजा ·।=।।।· प्रा. ४।।~।· प्रा.

३६।।=· मल्हारी वाा माहदजी माारनुले यैवजी धोंडजी वाा माणकोजी मोरे अज इा। छ २४ सफर लगायत छ २४ शवाल वाजिब महिने ८ दरमाहे रुपये ५ वजा ·।=।।।· बाकी ४।।~।·

३६॥=· सयद मा वा सयद मियन मारनुले यैवजी जोगोजी वा पुंजाजी अज इ॥ छ १९ सफर लगायत छ १९ शवाल वाजब माहे ८ दरमाहे रुपये ५ वजा ·।=।॥· बाकी ४॥-।· प्रा.

३६॥=· हैबती वा बाळोजी मारनुले यैवजी संताजी वा राणोजी फळके अज इ॥ छ २४ सफर लगायत छ २४ शवाल वाजिब माहे ८ दरमाहे रुपये ५ वजा ·।=।॥· बाकी ४॥-।· प्रा.

२७।≡॥· राघोजी वा तावजी अज इ॥ छ १ जालावल लगायत आखर शवाल वाजब माहे ६ दरमाहे रुपये ५ वजा ·।=।॥· बाकी ४॥-।· प्र॥

२७।≡॥· येसाजी वा भानजी अज इ॥ छ १ जालावल लगायत आखर शवाल वाजिब माहे ६ दरमाहे रुपये ५ वजा ·।=।॥· बाकी ४॥-।·

३८॥๙॥. कृष्टणाजी वा माहदजी नाईक अज इ॥ छ १ जालावल लगायत आखर शवाल वाजिब माहें ६ दरमाहे रुपये ७ वजा अडीच रोजा ॥-।· बाकी ६।=।॥· प्रा.

५४२๙=

६८๙-॥· यासिवाय असाम्या, बरतरफ केल्या सबब नाकाऱ्या.

२८๙॥· माहदु खेनट वा यसाजी अज इ॥ छ २४ सफर लगायेंत छ २८ शाबान दरमाहे रुपये ५ वजा· ।=।॥·बाकी ४॥-। प्रा.

२७।≡॥· महिने ६ दरमाहे ४॥-।·

०॥- रोज ४.

२८๙॥·

२४॥।-।· संभू वा मकाजी यादव अज इ॥ छ ८ रबिलावल लगायेत छ २१ शाबान दरमाहे

रुपये ५ वजा ·।=॥· बाकी ४॥-।· प्रा.
२२॥=।· महिने ५ दरमाहे ४॥-।·
१ ॥≡ रोज १३·

२४॥-।·

१५८≡॥· लक्ष्मण वाा गंगाजी बोरकर अज इ॥
छ ४ जा॥लावल लगायत छ १४ शाबान
दरमाहे रुपये ५ वजा ।=॥· प्रा बाकी
४ ॥-।· प्रा. १३॥≡॥· महिने
३ दरमाहे ४॥-।·
१॥· रोज १०.

१५८≡॥·

६८८-॥·

६१०८≡॥·

सदरहूप्रमाणें खर्च जासूदांचा यास यैवज पेशजी नवाब विका-रुदौला बहादर यांनी हुंडी रामाजी लक्ष्मणजी खंदारकर यांचे दुकानची पाठविली मोा रुपये ४८५ फाजल रुपये

१२५८≡॥

सदरहू रुपये फाजल पडले आहेत याप्रमाणें बहादर मवसूफास समजाऊन हुजूरही विनती करावी मी हुजूरांत अर्जी या विषईंची लिहिली नांहीं. सारांश स्वामीनी स्पष्ट पुसोन जे उतर करतील ते आज्ञा करावी हे विनंती.

----

**A. R. No. 9.**

२ मोहरम ११९१ हिजरी
१० फेब्रुवारी १७७७

पै॥ छ १५ माहे मोहरम सोमवार सन ११९१ हिजरी दीड प्रहर दिवस आल्यास खासगत जोडीबराबर.

## १९

### श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार. विनंती उपरी येथील वर्तमान ता. छ २ मोहरम माघ शुध चतुर्थी भौमवासर पर्यंत वास्तव्य का। सासवड स्वामीचे कृपेकरून क्षेम व स्वामीकडील आनंदवृत्त श्रवणविषईं चित सापेक्षित असे. विशेष. पूर्वी छ २९ जिल्हेजीं छटूचे विद्यमानचे जासूदांसमागमें पत्र पाठविलें तें पावून सविस्तारें वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्या उपरी इकडील विशेष वृत्त पृथकपत्रीं लिहिलें आहे. त्यावरून श्रुत होईल. स्वामींनी श्रीमंत पंतप्रधान स्वामी व कार्यभागी आदि येथील स्नेहित मंडलीस पत्रें व सक्रमण प्रयुक्त तीळ शर्करामिश्र पाठविले होते ते श्रीमंत व सर्वत्र मंडलीस पावते केले व सर्वत्रांनी बहुत प्रीती करून स्वीकारिले हे वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिले आहे. सांप्रत प्रत्योत्तरें सर्वत्रांचीं पाठविलीं आहेत. रा। माधवराव सदासिव व चिमापा पानसे यांजकडील उत्तर माघाहून येईल.

ता।.

| | |
|---|---|
| १ श्रीमंत | १ हरिपंत तात्या |
| १ बापू | १ माधवराव रामचंद्र |
| १ नाना | १ गोविंदराव भगवंत |
| १ कृष्टणराव बलाल. | नि॥ कृष्टणराव. |
| ४ | ३ |

७

सदरहू सात पत्रें स्वामीचे पत्रांची उतरें व रा। कासीपंत गु॥ पानसे यानी पुण्याहून पत्र पाठविलें होतें तें पाठविलें असे. सवताडयांत सरकारचे आमिलाचा दखल जाहला म्हणोन रा। चिमापानी सांगितलें. वरकड बंदोबस्ताविषईं स्वामीचे आज्ञेप्रमाणें चिमापा-कडून जें काये होईल ते विनती लिहीन. रा। हरिपंत तात्यास स्वामीनीं पूर्वीं उभयताप्रमाणें लिहिली होती त्यास सरदारापैकीं उच्च पूर्वीस बाबूजी नाईक व मुतसद्यापैकीं सखारामपंत व फडनीस व कृष्टण-

रावजीची गणना बंधुत्वांत. याकरितां रावजीस श्रीमंत पूर्वी योग्य. हरीपंतांनी सरदारी केली व करीत आहेत. परंतु स्वामीची व त्यांची परस्परें समान गणना. याकरितां त्यास राजश्रियां विराजित यापूर्वीचें पत्र लिहून पावतें केलें. या उपरी जो अलकाब स्वामीचे मर्जीस योग्य भासेल तोच ल्याहावा. सेवकास संमत आहे. बहुत काय लिहिणें. हे विनती.

श्रीनिवास

अखबार पुरदर अज इा छ २९ जिल्हेज लगायत छ २ मोहरम मंगळवार सन ११९० हिजरी.

पूर्वीं छ २९ जिल्हेजीं अखबार पाठविली त्यांत हरिपंतास लोकांचे समजाविसी करितां कांही दिवस लागतील, कूच सत्वर होयाचा मनसुबा दिसत नांहीं व रघोजी भोंसले श्रीमंताचे दर्शनार्थ येणार व करनल इपटैन मुंबईहून वकील येणार, त्याचे मार्गप्रतीक्षेकरितां कूचास विलंब व अन्यत्र वर्तमान लिहिलें होतें. त्या उपरी विशेष वृत्त तपसीलवार लिहिले असे.

राजश्री बाळाजी जनार्दन फडनीस मोरो बाबूराव फडनीस याचे लेकास बरें वाटत नांहीं. याकरितां पुण्यास गेले होते. ते काल छ १ मोहरमीं पुरंदरास आले. श्रीमंत पंतप्रधान यांस चौल संस्कार उदईक माघ शुध पंचमी बुधवारीं नेमिला. यास्तव पार्वतीबाईस रो नाना फडनीसानी विनती करून पुरंदरास घेऊन आले.

धारवाडेस महमद अली कुमनदानानें मोरचे लाविले आहेत, हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. त्यास येथील कारभाऱ्यांचे मुखें चर्चा आहे कीं परशरामपंत मिरजकर व कृष्टणराव पानसे वगैरे येकत्र होऊन धारवाडचे रुखें गेल्यानंतर कुमनदान मार मोरचे उठऊन गेला, या प्रकारें बोलत आहेत. परंतु यांचे बोलणें प्रमाण अप्रमाण, हा निश्चय होत नांहीं.

लोकांचे जुबानी चर्चा आहे की परशरामपंत वगैरे वीस कोसाचे अंतराने आहेत व कुमनदानाने मोरचे लाऊन बसला आहे.

करनल इपटैन यांस मीर महमद आहमद हुजुरीहून पेडगांवास ग्रहस्त आले आहेत. त्यांनी पत्र पाठविले होतें की तुम्हास निरोप घेऊन महिना होत आला. अद्यापी कूच होत नांहीं. याचें कारण काय? फार दिवस लागत असलियां आपण माघारा जाऊं. त्याचें उतर येतसामुदीन मुनसी व करनलाने पाठविले की मुंबईहून तीन च्यार दिवसांत पुन्हा पत्रे येणार, ते आल्यानंतर यथार्थ तहकीक वर्तमान लिहून पाठऊं. सेवकाचे तर्फेनें चिरजीव रघोतमराव येतसामुदिनाकडे गेले होते. त्याने सांगितले कीं माष्टीस कांहीं कार्याचा गुंता पडला. याकरितां त्याचे यण्यास विलंब लागला. सांप्रत करनल साहबांनी मुंबईकरास साफ लिहून पाठविले आहे कीं माष्टीचे येण्याकरितां आम्हीं मुकामात करून राहिलों. येणार असलियां सत्वर पाठऊन देणे. अनमान असलियां त्याचप्रमाणें लिहिणं. म्हणजे आम्ही कूच करून जाऊं. या पत्राचे उत्तर तीन च्यार दिवसांत येईल. त्या पत्रावर सलाह कूच मुकामांची निश्चय होईल.

हरिपंत फडके यांचे कुच्याचा नेम नांहीं. सुमुहूर्तानें कूच करून कृष्टणातीरपर्यंत जाणार म्हणोन येथील कारभारी म्हणत आहेत. परंतु अद्यापि सिलेदार व सिपाही व सरदारांची समजाविश जाहली नांहीं. सर्वत्रांस रुपये दिधले म्हणजे येके दिवसांत समजूत पडोन पंत मा॥रनुले समागमें जावयास रजावंद आहेत. परंतु झाडून तलबेचे रुपये द्याव यास माघेंपुढें अंदेशा करीत आहेत याकरितां लांबणीवर मनसुबा पडला आहे.

रामचंद्र गणेश व बाजीपंत गु॥ फडनीस येसाजी सिद्याचा रुख सोडून गेले. सिदे मा॥र गालब जाहला व पनाळा व कोल्हापुराचे भोंवताले दाहा पंधरा कोसी समग्र प्रांत उज्याड करून लढाईस सिध आहे. हैदर

नायकाचा सिलसिला पनाळेकरांसी बहुत असे. रामचंद्र गणेशानी श्रीमंतास लिहून पाठविलें आहे कीं तैनाती लोक उपयोगी नांहींत. हुजुराती संरजाम व त्यां लोकाचे खर्चास रुपये पाठऊन द्यावे. म्हणजे आम्हीं येसाजी सिंद्याचें पारपत्य करितों त्यास येथील कारभाऱ्यानीं उतर वकीलास सांगितले जे फौज देतो रोजमऱ्याचा यैवज तुम्ही देणें. सरकारांत रुपये नांहीत. सांप्रत रुपयाकरितां वोढ बहुत आहे.

करनल इपटैन यांस उष्टण साहत नांहीं. आजीपर्यंत सीतकाळ होता म्हणोन मैदानांत डेरे देऊन राहिले होते. सांप्रत उष्टण तीव्र लागते. याकरितां नकलमकान करून भिवंडीचे आलिकडील आमराईंत येऊन राहिले आहेत.

श्रीमंतांचा चौल उदईक पंचमीस नेमिला होता. त्यास मातोश्री गंगाबाई अस्पृश्य जाहलीं याकरितां चौलसंस्कार राहिला.

या उपरी जें वर्तमान नवल अपूर्व होईल तें सेवेसी लिहून पाठऊं. बहुत काय लिहिणें. हे विनती.

---

**A. R. No. 10.**

३ मोहरम ११९१ हिजरी
११ फेब्रुवारी १७७७

श्री

विनंती विज्ञापना. येथील कुशल ताा छ ३ माहे मोहरम मुा कसबे सासवड जाणून स्वामीनी लेख(ना)ज्ञा करीत असले पाहिजे. विशेष. येथील वर्तमान छ २९ माहे जिल्हेज रोज रविवारी विनंतीपत्र छटु मिरधे याचे जोडीसमागमे रवाणे केले, ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाहलेच असेल. तदनंतर येथील वर्तमाण छ १ माहे मजकुरी

रोज सोंमवांर करनेल वकील यांनी ममईवाल्यास पत्र लिहिले कीं वकील लवकर पाठवावा कीं ते आल्यानतर आम्हीं कूच करूं. वकील मजकूर येथे आल्यानंतर हे कूच करणार. कूच केलियावर लेखन केले जाईल. शृत होये. रा विसाजीपंत आठवले यांचा निश्चये होता की याबरोबर पाच सांत हजार फौज देऊन पुढे रवाना करावे. त्यास मौकूफ होऊन रा। नरसिगराव धायेगुढे व मालोजी घोरफडे वगैरे यास रवाना करावे, व त्याचे मागून कूच हरीपंताचे व्हावे यैसे होते. त्यास रा नाना फडनीस पुणियास गेलियावर नरसिगराऊ वगैरे यास मोकूफ करून विसाजीपंत आठ(व)ले यास पुढे पाठवावे, यैसा निश्चये होऊन पंत माारनिलेचे कूच पाच हजार स्वारानसी करविले ते जेजूरी नजीक येऊन उतरले आहेत. नाना फडनीस याणी फौजेची समजूती देण्याघेण्याची थोडीबहुत करून, रा। हरीपंताचे कूचाचा निश्चये छ ५ माहे मोहरमी माघ शुध सप्तमीचे नेमस्त करून, आपण छ २ माहे मोहरमी सध्याकाली पुणियाहून निघाले, ते प्राथःकाली छ माारी किल्यास आले. मालोजी घोरफडे याचे लोकासी व हरीपंताचे लोकासी खानाजगी जाली. दोन्हीकडील पाच सात माणसे जायां जाली वं काही जमखी (जखमी) जाली. त्यास रा। नाना फडनीस प्रसगी होते त्याची समजूत परस्परे केली. हरीपंताचे कूचाचे निश्चये जाला आहे. कूच जालियावर लेहून पाठऊन पेशजी तोतियाचे प्रसगी ममईहून माष्टी फिरिगी आले होतें, त्यास जाबसाल करून आपले ठिकाणास गेल्यानतर श्रीमंताचे ठिकाण साष्टी घेतली. त्याजवरून कारभारी त्याजवर श्रमी बहुत. त्यास मौकूफ करून दुसरियास पाठवावे, यैसा निश्चये करनेल फिरगी याचे लिहिल्यावरून जाला आहे. येथे आलियावर सविस्तर लेखन केले जाईल. रा तुकोजी होलकर यास नाना फडनीस यानी पैगाम केला की, तुम्ही रा हरीपंतासमागमे जावे. त्यास याणी उजर केला की हिदुस्तानात मोठा हगामा जाला आहे. शुज्याउदौला वगैरे यांची फौज अतरवेदीत आली आहे. आम्ही इकडे राहिल्याने उजेनेपर्यंत मुलक राहणे कठिण. दुसरे तीन वर्शाचे पेंचामुले कर्जदारी विशेषात्कार जाली. याजमुले

पेच. याप्रमाणे भाशण जालियावर मौकूफ राहिले. सिदे आलियावर काय जाबसाल होणे तो लेहून पाठऊ. राजश्री हरीपताचे कूच जालिया लेखन केले जाईल. पुढे जे प्रसगाचें वर्तमान ध्यानास आलिया लेखन केले जाईल. बहुत काय लिहिणे. कृपालोभ कीजे. हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 11.** ३ मोहरम ११९१ हिजरी
११ फेब्रुवारी १७७७

पैा छ १८ मोहरंम सन ११९१ हिजरी रो। गुरुवार च्यार घटका दिवस असता पावले.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार विनती उपरी. येथील वर्तमान ताा छ ३ मोहरम बुधवार पर्यंत स्वामीचे कृपेकरून क्षेम असे. विशेष. इकडील वर्तमान छ २ माहे मार पर्यंत खांसगर्त जोडी देवजी व सटवाजी समागमें लिहून पत्र अर्जीसहित रवाना केलें, तें पावलें असेल. त्या उपरी पुण्याहून वर्तमान आलेंजे राा हरिपंत फडके यांनीं तीन कोसी कूच करून हडपसरापुढें लोणीसमीप जाऊन उतरले. पूर्वीं विसाजीपंत दिवाण निा हरिपंत यांचे रवानगीचें वर्तमान लिहिले होते. त्यास पांच हजार फौज व सरदार मानाजी फांकडे व मालोजी घोरपडे व सटवाजी भोंसले व नरसिंगराव धायगौडे सुधां परशरामपंत मिरजकराचे कुमकेस दरकूच गेले. रामचंद्र गणेश व बाजीपंत मिरज प्रांतास आले आहेत. राजश्रीचे मदतीकरितां तीन हजार फौज व च्यार तोफा नेमिल्या आहेत. त्या पैकीं हजार बारासे स्वार गेले. परशरामपंत व कृष्टणराव पानसे मुनेहलीसमीप आहेत व धारवाडचे मारचे उठून महमद अली कुमनदान गेला, म्हणोन तहकीक वर्तमान यैकिलें. हैदरनायकाचा लेंक

टिपू दाहा बारा हजार स्वार व वीस हजार बार व तोफा सुधां धारवाड प्रांतेस येणार म्हणोन वर्तमान यैकिलें. मोरोपंत फडनीस यांची व उभयतां कार्यभागियांची यैक्यता करावी याकरितां राजश्री बालाजी जनार्दन फडनीस यांचे सलाहानुरूप राजश्री कृष्टणराव बलाळ आजी छ ३ माहे माार बुधवारीं पुण्यास गेले. राजश्रीचे पुत्र गोविंदराव व गोविंदराव भगवंत व डेरे वगैरे सरजाम गडासमीप आहे. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें. हे विनंती.

----

**A. R. No. 12.**

९ मोहरम ११९१ हिजरी
१७ फेब्रुवारी १७७७

पैाा छ २१ मोहरम सन ११९१ हिजरी रविवार

श्रीनिवास.

पोष्य हैबतराव गोपाळ साा नमस्कार विनती. उपरि येथील वर्तमान ताा छ ९ मोहरम मंगळवार पर्यंत स्वामीचे कृपेकरून क्षम जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. पूर्वीं छ ४ मोहरमीं छटु मिरध्याचे विद्यमानें यजमानास अर्जी व विनतीपत्र सेवेसी पाठविलें, तें पाऊन वर्तमान कळलें असल. त्या उपरी इकडील वर्तमान पृथक विनतीपत्रांत लिहिलें आहे, त्यावरून सेवेसी श्रुत होईल. हरीपंत फडके यांचें कूच होऊन हैदर नायकाचे रुखावर जाण्यास सिलेदार व हुजुराती लोकांची समजावीस होऊन येकदिल जाहले पाहिजेत व मोहिमेस गेल्यानंतर खर्चाची सरंजामी छाववणीस कोणे प्रकारें होईल याची तरतूद व मुबारुजुलमुलुक बहादर व हुजूरचे सरदार नाईक माराचे तंबीस कोणते प्रकारें रवाना होत आहेत, इतकी इंतजारी आहे. याच प्रकारें करनल इपटैन यांस रुखसत होऊन येक महिना जाहला. मुंबईहून इंगरेजाच्या वकील येऊन रघुनाथरायांचे समजाविसीचा ज्वाबसाल

कुरसीनिसीन जाहल्या वितिरिक्त करनल मार येथून कूच करीत नाहीं. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें. हे विनंती.

-----

पो छ २१ मोहरम सन ११९१ हिजरी रविवार.

श्रीनिवास

अखबार पुरंदर अज इा छ ४ मोहरम लगायत छ ९ मोहरम मंगळवार सन ११९० हिजरी. राजश्री बाळाजी जनार्दन फडनीस आपले लग्नाकरितां छ ७ माहे मारीं पुरंदरीहून कूच करून चिचवडास गेले. घांटाखाले कोंकणात खोंपवलीस वधूचा निश्चय जाहला आहे. माघ वद्य द्वितीया छ १५ मोहरमीं लग्नाचा निश्चय जाहला आहे. श्रीमंत पंतप्रधान यांचे चौलाचा निश्चय पूर्वील पत्रीं लिहिला होता. सांप्रत छ ८ माहे मार माघ शुध दशमीस चौल संस्कार जाहला. सेवेसी श्रुत होय.

रा हरीपंत फडके यानीं विसाजीपंतासमागमें मानाजी फांकडे व मालोजी घोरपडे वगैरे तीन हजार फौज देऊन कृष्टणराव पानसे व परशरामपंत मिरजकर यांचे कुमकेस रवाना करून हुजुराती वगैरे सिलेदारांचे समजाविसीकरितां व मुबारुजुलुमुलक बहादर वगैरे हुजूरचे सरदारांचे रवानगीचा निश्चय होऊन रवाना व्हावे याकरितां पुण्याहून तीन कोसी घोरपडीसमीप उतरले आहेत. लोकांची समजावीस होऊन हुजूरचे सरदारांचे रवानगीचा निश्चय जाहल्यानंतर पंत मार कूच करतील. तोपर्यंत मुकामात आहेत. दुसरें कारण रघोजी भोंसल्यानीं नागपुरीहून कूच केलें व श्रीमंत पेशव्यांचे दर्शनाकरितां पुरंदरास येणार हें वर्तमान पूर्वीं लिहिलें होतें. त्याअर्थीं भोंसले आल्यानंतर हरीपंत कूच करून जाणार हांही नेम रा कृष्टणरावजी बोलत होते. रघोजी भोंसले गंगातीरास आजीपर्यंत आले असतील. सत्वरच येणार म्हणोन येकिलें. रामचंद्र गणेश व बाजीपंत तीन हजारपर्यंत

जमावसुधां मिरजेसमीप आहेत. पुरंदरीहून हजार बारासे स्वार कुमकेस गेले आहेत. पुन्हा हजार स्वार रवाना होणार. पांच सात हजार स्वार जमाव जाहल्यावितरिक्त येसाजी सिंद्याचे मुकाबल्यास जावयाचा मकदूर नांहीं.

कृष्टणराव पानसे व परशरामभाऊ मिरजकर मुलेहलीसमीप आहेत. धारवाडेस महमदअली कुमदान होता. येथील मुतसद्याचे मुखें यैकिलें कीं धारवाडचे मोरचे उठऊन कुमदान बांकापुरास गेला व जनवदंता यैकतों कीं कुमदान मार अद्यापि धारवाडेसमीप मोरचे लाऊन बसला आहे व हैदरनायकाचा लेंक टिपू कुमदनदानाचे कुमकेस येणार किंवा आला असेल.

कृष्टणराव बलाळ मोरोपंत फडनीस यांचे मध्यस्तीचें निमित करून पुण्यास गेले आहेत. प्रस्तुत पुरंदरी राव मारनुलेंस विशेष काम नांहीं व गोविंदराव पुत्र व गोविंदराव हस्तक उभयतां येथें आहेत व दिवस उष्ण-काळाचे याकरितां रावजी पुण्यांतच राहणार. जरूरीस पुरंदरास येतील.

करनल इपटैनास रुखसत होऊन येक महिना जाहला. अद्यापि येथोन कूच होत नांहीं. याचें कारण रघुनाथराव मुबईस इंगरेजाचे आश्रयानें आहेत. राव मारनुलेचे यैक्यतेचा ज्वाबसाल लागला आहे. तामस माष्टी मुंबईकर इंगरेजांचा वकील पुरंदरास येणार तो आल्या-नंतर करनल माराचें कूच होईल. येतसामुदिन मुनसीचे जुबानीं वर्तमान यैकिलें कीं पांच साता दिवसांत येथोन कूच होईल. परंतु सांप्रत येतसामुदिन मुनसीचे बोलण्याची अप्रमाणिकता दिसते.

राजश्री सखारामपंत बापू सेवकासीं कृत्रिम भाषण करीत नांहींत. त्यांचे बोलण्याचा भाव रघुनाथरायांकडील निश्चये जाहल्या वितरिक्त करनल कूच करून जात नांहीं. याचप्रमाणें हरीपंतासही विलंब सापेक्ष आहे.

सेवेसी शृत होय हे विनंती.

---

**A. R. No. 13.** (पो.ता.) १३ मोहरम ११९१ हिजरी
२१ फेब्रुवारी १७७७

पैा छ १३ रोज शनवार माहे मोहरमं सन ११९१ हिजरी वख्त दोन घटका रात्र प्रथमं.

श्रीनिवास

श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी. पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार विनती. उपरी येथील वर्तमान स्वामीचे कृपेकरून क्षेम असे विशेष. मौजे लांक पाो वैजापूर हुजूरचे सनदेप्रमाणें व मौजे चितली पाा आळंद श्रीमंत पेशव्यांचे तर्फेनें कैलासवासी सख जोसी यांस पुत्रपौत्रादि वंशपरंपरा इनाम आहे. सांप्रत पाा माारचा अमल हुजुरांत श्रीमंता नियाज केला ते समई दोन्ही गांव वजा करून जागीर दिल्ही व यादीचे पटांत वजा केले म्हणून फडनिसांनीं सांगितलें. त्यावरून सख जोसी यांचे बंधु वो गंगाधर जोसी यानीं श्रीमंतांचें पत्र स्वामीचे नांवें घेतलें व कारभाऱ्यांनी मजलाही सांगितलें. त्यावरून सेवेसी विनती लिहिली आहे. यादीचा पट श्रीमंताचे मोहरेनसीं राजश्री जिवाजीपंत घेऊन गेले आहेत. जोसी बावा समर्थ व धर्मकार्याविषंई स्वामी तत्पर आहेत. श्रीमंतांचे पत्राप्रमाणें हुजुरांत अर्ज करून दोन्ही गांव निर्वेध गंगाधर जोसी यांजकडें चालवावे म्हणून श्रीमंत राजश्री बापू व नानानी सांगितल्यावरून विनती लिहिली असे. राजश्री केशो भिकाजी दातार यांची वरात कैलासवासी राजे जगदेव यानीं राजश्री बालाजी केशव यांजवर देविली ते बाळाजीपंत सुभेदारांनी कबूल करून वरातेप्रमाणें रुो घ्यावे यैसा करार करून रुपये देत नांहींत, हें वर्तमान रा. केशोपंतानी स्वामीस श्रुत केलें व सेवकानेंही विनती केली होती. राजश्रीचा स्नेह स्वामीचें सेवेसी अकृत्रिम व आपली कृपा त्यांजवर विशेष. राजश्री बालाजीपंत सुभेदारास सूचना केलियां ते अमान्य करणार नांहींत. बहुत काय लिहिणें. हे विनती.

---

**A. R. No. 14.** १०मोहरम ११९१ हिजरी

१८ फेब्रुवारी १७७७

पैा छ २१ मोहरम सन ११९१ हिजरी रविवार.

श्री

विनंती विज्ञापना. यथील कुशल ता। छ १० माहे मोहरम मुा का सासवड येथास्थित जाणौन स्वानद लेखनआज्ञा करीत असिले पा. विशेष. यथील वर्तमान छ माारी दोप्ररा छट मिरधे याचे जोडी समागमे विनंतीपत्र सेवेसी रवाना केले. ते पावोन सविस्तर वर्तमान विदित होईल. तदनतर यथील वर्तमान नाना लग्न करावयास गेले, लग्न करून सत्वर येणार, राजश्री हरीपताचे कूच येका दो दिवसानी होणार. कूच जालिया लेखन केले जाईल. श्रीमतास सेडी छ ८ माहे माारी राखली. उभयेता कारभारी यानी पाच पाच से रुपये पावेतो आहेर केला. येकयेक दोन दोन रकम ज्यवाहेर दिल्हे. कृष्णरावजी पुन्यासच अद्याप आहे. दोचौदिवसा येथे येणार छ माारी मिरध्याकडील जोडी रवाना जाली. त्या समागमे विनंती पत्र लिहिले आहे. त्याजवरून अक्षरशाहा वर्तमान शृत होईल. बहुत काय लिहिणे. कृपा लोभ कीजे. हे विज्ञाप्ती.

-----

**A. R. No. 15.** (पो. ता.) १ सफर ११९१ हिजरी

११ मार्च १७७७

पैा छ १ माहे सफर सन ११९१ हिजरी मंगलवार साईकाल मये दारोग

श्रीनिवास

पु॥ श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. छ ५ जिल्हेजीं रामजी व शंकराजी जासूद पत्रासहित सेवेसी रवाना केले

त्यास शंकराजी परतोन आला व यानें सांगितलेंजे रामजी जासूद श्रीमंत राजश्री भाऊसाहबांचे कारखान्यांत नौकर राहिला. त्यास या प्रांतीचे लोक बहुत हरामजादे. जबरदस्तापासीं साळसूदीने वर्तणूक करीत आहेत. च्यार पांच जासूद दुखण्याचा बहाना करून गेले. त्याचे यैवजी दुसरे ठेविले. त्यास तगीरी व बहालीविषई यैवज मुबादला करून दुसऱ्यास ठिंवांवें हे परवानगी जाहली. यांत सेवकाचा बच्याव जाहला नांही. तरी बहुत फजीती होती. सांप्रत रामजी वलद गंगाजी निकम छ १४ शवाली यैवजी जासूद ठेविला व आगाऊ रुपये ४ च्यार दिधले. प्रथम येकवार सेवेसी रवाना केला होता. तो उतरें घेऊन आला. प्रस्तुत श्रीमंत भाऊसाहेबांचे जासूदांचे कारखान्यांत राहिला आहे व दरमाहे रुपये ६ साहा प्रमाणें मवाजिब केला म्हणोन त्याच जोडीदारानें येथें सर्वत्रांस सांगितलें त्यावरून समग्र जासूदास स्वामीचे सेवेसी किवा अन्यत्र स्थली चाकरीस रांहांवें हे इछा उत्पन्न जाहली आहे व रामजीकडे तीन च्यार रुपये फिरतात त्यास सदरहू रुपये रामजी जासूदापासून द्यावे. यांत दुसऱ्यावर जप्त बसतो. स्वामी मुख्तार आहेत व रामजी श्रीमंत भाऊसाहबांचे कारखान्यात आहे. सूचनार्थ विनती लिहिली असे. हे विनती.

----

**A. R. No. 16.** — १६ मोहरम ११९१ हिजरी
२४ फेब्रुवारी १७७७

पैा छ १ माहे सफर सन ११९१ हिजरी मंगळवार साइंकाल मय दारोगे.

श्रीनिवास

अखबार पुरंदर अज इ॥ छ १० मोहरम लगायत छ १६ माहे मा॥र सन ११९० हिजरी माघ वद्य ३. मंगळवार अस्तमानपर्यंत.

राजश्री बाळाजीपंत फडनीस आपले लग्नाकरितां कोकणांत गेले आहेत हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. फडनीस मजकूर अजिपर्यंत पुण्यास आले नाहींत.

राजश्री मोरो बाबूराव फडनीस यांची समजाविश कराव-याकरितां रा॰ कृष्टणराव बलाळ पुण्यास गेले हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे त्यास रा॥ फडनीस मजकूर श्रीमंत पंतप्रधान स्वामीचा जन्म जाहला ते समईं पुरंदरास आले आहेत ते समईं मोरो-पंतांचा पैगाम होता कीं नाना फडनीस व सखारामपंत ज्या प्रमाणं मदारुलमहाम आहेत त्या प्रमाणें आपल्यास शरीक करून फौजेचें काम सांगावें ते समईं सखारामपंतांचे प्रत्यास गोष्ट आली नाहीं व उत्तर केलें कीं बतरीक मुसाहबाप्रमाणें राहांवें व आम्हीं सांगू त्या प्रमाणें वर्तणूक करावी. या प्रकारचें उत्तर मोरोपंताचे ध्यानास न आलें व पुणें व जुनेरीं राहून कालक्रमणा केली. सांप्रत मोरोपंताची समजाविस करून त्यांस शरीक कामांत करांवें हें बापू व नाना उभयतांचे तजविजीस पसंद येऊन रो॰ कृष्टणरायांस पुण्यास पाठविलें आहे.

राजश्री हरीबल्लाळ यानीं बापू व नानाचे आज्ञेप्रमाणें अजिपर्यंत सरदारी केली व पुढेंहीं उभयतांचे अनुमतानुरूप हरीपंताची चाल आहे त्यास हरीपंताचा नेक सलूक सिपाही लोकांसीं बहुत व दाब नांहीं याकरितां सिलेदारांची समजा-विस पडत नांहीं व पंत मजकूर रुपयावितरिक्त सीरीं जुबानी-नें समजाविस करितात अजिपर्यंत लोक समजले. सांप्रत साल-झाडयाची बाकी झाडून दिधल्या वितिरिक्त सिपाही लोक समजत नांहींत. याकरितां कित्येक लोकांचे जुबानीं वर्तमान यैकिलें कीं हरीपंतास हजार स्वाराची सरदारी सांगोन फौजेचे सरदारीचें काम मोरोपंतास सांगावें या प्रकारचा निश्चय येथील कारभाऱ्यांचा आहे म्हणोन खारिज वर्तमान यैकिलें. जे गोष्ट अमलांत येईल ते सेवेसी विनती लिहीन.

मुंबईकरांकडील वकील आल्यानंतर कर्नेल इपटैनाचें कूच होईल हें वर्तमान पूर्वी लिहिलें आहे. त्यास सांप्रत कलकत्त्याहून पत्रें श्रीमंतास आलीं. त्यांत मार आहे कीं श्रीमंतांचा व आमचा जो करार होऊन करारनामे जाहले आहेत त्यांत सरेमो तफावत होणार नांहीं. रघुनाथराव मुंबईस गेला आहे त्यास भयें करून जो आमचे आसऱ्यास येईल त्यास मीं अभय देऊन ठेवितों हा कायदा कदीम आमचा आहे. रघुनाथराव आसऱ्यास आला आहे. त्याची कुमक करून पेशव्यांसी बिगाड करणें सर्वथैव होणार नांहीं. तुम्हीं राव माराची समजाविस करून घेणें याविषयीं इंगरेज मानेमुजाहिम सर्वथैव होणार नांहींत. कर्नल इपटैन यांस एक वर्ष होऊन गेलें. अद्यापि रुखसत केलें नांहीं याचें कारण काय? प्रस्तुत कर्नल मारास सत्वर रुखसत करणें. सखारामपंत सेवकासीं बोलिलेजे, नाना फडनीस पुरंदरास आल्यानंतर सात आठ दिवसाचे संधीत कर्नलास निरोप देतों. कलकत्तेकरांचीं पत्रें कर्नलास व मुंबईचे जरनलास होती. मुंबईकरांची पत्रें मुंबईस पाठविलीं. उतर येण्याची मार्गप्रतीक्षा आहे. उतर आल्यानंतर कर्नल इपटैन मुतसद्यांचा निरोप घेऊन कूच करून हुजूर येईल.

रा॰ हरी बलाळ फडनिसांचे गुमास्ते व काम सरदारीचें करीत आहेत. याकरितां मोरोपंतास हरीपंताविषईं आजुर्दगी बहुत आहे. रा॰ हरी बलाळ यानीं एकदां पुरंदरास यांवें या विषईं बापू व नानाची आज्ञा आहे. बहुशा बालाजी जनार्दन आल्यानंतर येतील.

महादजी सिंदे बिडास जाऊन माघारा जामगांवास आले. पेंडगांवास येणार. बाळाराव दिवाण नि॰ सिंदे सिद्याकडें मामलत संबंधीं बाकी आहे. त्याची तडमोड करावयास व रघुनाथरायाकडील स्नेहाचें ज्वाबसालांत पूर्वीपासून राव मार आहेत याकरितां छ ११ मोहरमीं बाळाराव सासवडास आले. वटेश्वरासमीप उतरले आहेत. शंभर स्वार समागमें आहेत. तुकोजी होळकर जेजारीस आहेत. पुरंदरास येणार.

रामचंद्र गणेश व बाजीपंत मिरजेसमीप तीन हजार स्वारानसीं आहेत. श्रीमंताकडील तोफा व फौज मातबर गेल्यावांचून येसाजी

सिद्याचे रुखावर जात नांहींत. सिदा मा।र रामचंद्र गणेशावर गालिब आहे.

परशरामपंत मिरजकर व कृष्टणराव पानसे मुलेहलीसमीप आहेत. दाहाबारा हजारपर्यंत फौज जमा जाहली आहे म्हणोन यैकतों. महमद अली कुमनदान यानें धारवाडेस वेढा घातला होता. परशरामपंतासमीप जमियत भारी. येकाने मोरचे उठऊन च्यार पांच कोसी हुबलीस जाऊन उतरला म्हणोन तहकीक व कलमीं वर्तमान यैकिलें त्याप्रमाणें सेवेसी विनती लिहिली असे. श्रुत होये. हे विनती.

---

**A. R. No. 17.** १७ मोहरम ११९१ हिजरी
२५ फेब्रुवारी १७७७

पौ। छ १७ सफर सन ११९१ हिजरी मंगळवार साइंकाळ मये दारोगे.

श्रीशंकर

विनती विज्ञापना येथील कुशल ता। छ १७ माहे मोहरम मु। का। सासवड स्वामीचे कृपावलोकणे करूण यथास्थित जाणौन स्वानंद लखज्ञा करीत असिले पाहिजे विशेष. यथील वर्तमान छ १० माहे मोार रोज ब्रुधवारी विनंतीपत्रे दोण, यक छेटू मिरधे याचे जोडीसमागमे व दुसरे रा। हयेबतराव याचे जाडीसमागमे, यकून दोण पत्रे सेवेसी रवाणा केली ते पाऊण सविस्तर वर्तमाण विदित जाले असेल. तदनंतर यथील वर्तमाण बापूकडे दरबार वगैरे जाला होता विदित होये. छ ११ माहे मोारी रोज गुरवार रा। हरीपंत यांचा मुकाम अद्याप पुन्याहून दीड दो कोसावर घोरपडीवर आहे. लोकाचा देण्याचा दंगा विशेष दोण वरशे नालबंदी वगैरे नाही

याजमुले लोक म्हणतात की मागील आमचे फडचे करून द्यावे. फडचे जालियानंतर आम्ही आपले हमराहच आहो ऐसा जाबसाल आहे. यास्तव हरीपताचे कूचांस दिवसगत आहे. हरीपंतही लोकाची समजायश बहुतां प्रकारे करितांत. परतु विण्या पैसया वांचून लोकाची समजायश होये ऐसा प्रकार नाही. प्रस्तुत नाना आपले लग्न करावयास कोकनात गेले आहेत तेही दो चौ दिवसा यथ येणार. आलियानतर लोकाचे काहीं समजुती करूण उपरातिक हरीपताचे कूच होणार ऐसे आहे. पुढे काये निश्चये होऊण हरीपंताचे कूच होईल ते लखन केले जाईल. हरीपंताचे कूचास रा॰ कृष्णरावजी बहुंत बाजिदी करितांत की ये विशयी आम्हास नवाबसाहेब इनायेतनामे वरचेवर पाठवितांत. शृत होये. छ १२ माहे मजकूर रोज शुकरवार ममईहून वकील येणार होता. तो आलिया नतर उपरांतिक यथून करनेल वकील याही कूच करावे ऐस आहे. त्यास वर्तमाण आहे की ममईहून वकील प्रस्तुत यत नाही. जो परियेत ममईकराचा वकील येत नाही तो परियत करनेल वकील याचेही येथून कूच होत नाही. श्रीमंत दादासाहेब ममईस बाहिर बागात आहे. वर्तमाण आहे की त्यांपासी दोण तीन पलटणे जमा जाली आहेत. ममईवालाही कांही नवनिगादास्त करितो म्हणून येथे वर्तमाण आहे. ममईवाल्याने दोन तीन जहाज तयार केली आहेत. आंगरयाचे मुलकांत उपद्रव करणार आहे म्हणून वर्तमाण आहे. शृत होये. रा॰ भिवराव पानशे कोकनात कल्यान प्रांती आहेत. त्याचे येथे फालगुन मासी लग्न आहे. उभयता कारभारेचे मर्जीस आहे की त्यांही लग्नांस न यावे परंतु भिवराव लग्नास येणार. आल्यावर लेखन केले जाईल. हयेदरनाइकाची फौज बंकापुरास दाहा बारा हजार आहे व दाहा पंधरा हजांर बारही आहे. आनिकही नाईक मजकुराही पांच सात हजांर फौज कुमकेस बंकापुरास पाठविली म्हणून वर्तमान आहे. श्रीमंतांकडील फौज परसरामपंत भाऊ गोपालराव याचे बंधू फौजसहित धारवाड प्रांती बंकापूरचे शहावर आहेत. परसरामपताचे कुमकेस फौज पाठवयांची योजना करितांत. पाठविलियास लखन केले जाईल. विदित होये. छ १३ माहे म॥र रोज शणवार रा॰ यसाजी

सिंदा पनाळ प्रांती तीन च्यार हजार फौजनसी आहे. त्या प्राती त्याणे बहुत उपद्रव मांडला आहे. त्याचे शहावर रा। रामचंद्र गणेश दो ती हजार फौजनसी आहे. रामचद्र गणेशाकडील दोन च्यारशे लोक खाया खर्चा वांचून उठून आले. शृत होये. रा। हरीपताचे फौजेच्या देण्याचा बंदोबस्त करून लौकर हरीपताचे कूच करवावे या उद्योगात कारभारी आहेत. निश्चये आहे की नाना आलियावर हरीपताचे कूच व्हांवे. मधे ऐसही वर्तमाण आहे की दो ती कोसाचे कूच करूण हरीपंत थेवरास जाणार. परंतु नाना आलिया विरहित कूच होईल ऐस नाही. तथापि कूच जालिया लेखन केले जाईल. नानाही सत्वरच येणार. शृत होये. तुकोजी होलकर विठलवाडीहून दोण तीनशे लोकानसीं माघी पौनिमची दिवसी जेजुरीचे यात्रेस आले आहेत. देवदेव करून पुन्हा विठलवाडीस फौजंत जाणार. शृत होये. छ १४ माहे मा।र रोज अदितवार रा। महादजी सिंदे पारनेराजवल जामगावांस आहे. येथे यणार आहे म्हणून वर्तमाण आहे. सिंद्याकडील बालाराव पांच च्यार दिवस जाले येथे आले आहे. बालाराव यांसी व बापूसी यक दोन खिलवत जाला. खिलवताचा भाव की पेशकशेपैकी बापू म्हणतांत की दाहा लक्ष रुपये द्यावे. होलकराही दाहा लक्ष रुपये दिल्हे त्या प्रमाणे तुम्हीही द्यावे. ये विशई बालाराव यानी उतर केले कीं सरदारीस खर्च भारी. यंदा कोकन प्रांतींही तोतियाची स्वारी जाली यास्तव खर्चवच भारी पडला. ऐस असून स्वामी आज्ञा करितांत ये विशई आम्ही माहदजी सिंदे यांस लिहितो. त्याचे उतर आलियावर विनंती करूं. बालाराव पुन्यास हरीपंताकडे यका दो दिवसा जाणार. विदित होये. छ १६ रोज सोमवार रा। जिवाजीपताचे पत्रे डाकेबरोबर रा। कृष्णरावजीकडे नित्य यका दिवसा आड येत असतांत. पत्राचा भावगर्भ कांही ऐकिलियात येत नाही. वर्तमाण आहे की नवाब जफरदोला बाहादर यांची व येजमान साहेबाची मुलाजमत जाली म्हणौन वर्तमाण आहे. शृत होये. छ १६ माहे मा।र रोज मगलवार हरीपंताचे कूच विना नाना आल्यावाचून होत नाही. नाना आलियावर सिबदीचा काये फडच्या होईल तो पाहावा परतु सिबदीचा गवगवा भारी आहे.

विदित होये. प्रस्तुत हरीपताचे कूचास दिवसगत आहे. शृत होये. छ २७ माहे जिल्हेजचे आज्ञापत्र हैबतराव याचे जोडीसमागमे पाठविल ते छ १२ माहे म॥री पावले. बहुत संतोश जाला. आज्ञा की हजूरचा दरज्यवाब इनायेतनामा मागून पाठवून देऊन नवाब विकारुःदौला बहादुर याचे ज्यवाब दोन पाठविले आहे. ते पावतील. तें पावेल. फालगुन मासी सेवकाचे पुत्राचे लग्न आहे. आज्ञा विशई पूर्वीचे विनतीपत्रात सविस्तर लेखन केले आहे त्याजवरून ध्यानास येईल. गतवर्शी मुलीचे लग्न जाले. तेव्हाही जाणे न जाले. कृपाकरून महिन्या दिडा महिन्याची आज्ञा आल्यास लग्न प्रसगास जाऊ. विनंती मान्य करावी. सर्व भरवसा स्वामीचे चरनाचा आहे. विदित होय. बहुत काये लिहिणे. कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 18.** २१ मोहरम ११९१ हिजरी
१ मार्च १७७७

पै॥ छ ६ माहे सफर सन ११९१ हिजरी, रविवार.

श्रीनिवास

पोष्यें हैबतराव गोपाळ सां। नमस्कार विनती उपरी. येथील वर्तमान ता॥ छ २१ मोहरमपर्यंत स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. पूर्वी छ १७ माहे मा॥रीं राणोजी पुंड वगैरे हरकारे यांजसमागमें छटूचे विद्यमानें पत्र पाठविलें तें पाऊन सविस्तारें वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्या उपरी स्वामीचें कृपापत्र छ ६ माहे मा॥रचें हुजूरचे इनायतनाम्यासहित जासूदांचे ततमे तलब आखर शवालपर्यंत मो॥ रुपये १३४॥ पैकीं हुंडनावळ बा॥ रुपेये ३ तीन वजा करून बाकी रुपेये १३१॥ येकसें साडे यकतीसा रुपयाचे हुंडीसहित पाठविलें तें छ १८ माहे मा॥रीं पाऊन सविस्तारें

वर्तमान कळोन संतोष जाहला. इकडील राजकी वर्तमान पृथक पत्रीं सविस्तारें लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल. हरकाऱ्यांचें कबज आखर शवालपर्यंत घेणें म्हणोन आज्ञा त्यास इप्तदाय निगाहदास्ती-पासून यैवज मुबादला बहुतांचा जाहला आहे व स्वामीनीं पूर्वील इस्मनवीसीवर खास दसखत करून घेतले आहेत. त्याचप्रमाणें सिलसिला चालविला आहे व आखर शवालपर्यंत हिशोब करून पाठविला त्यास मोहरमांत रुपये आले. दोन महिन्याची तलब चढली व इकडील लोकांस श्रीमंतांचे दरबारचा सिरस्ता किंवा त्यांची समजूत पडेल त्याप्रमाणें समजाऊन द्यावें लागेल. सांप्रत स्वामीचे आज्ञेप्रमाणें जासूदांचे नायकाचे नांवचें कबज व वरकड लोक त्याचे सिकमात लिहून घेतों. मानूरावर तनखा घेऊन पाठवितों म्हणोन आज्ञा केली. उतम असे. जिलकादेपासून तनखा माह बमाहीची पाठवावी. च्यार हरकारे नवे ठेविले म्हणोन आज्ञा तरी चौघें जासूद यैवजी ठेविले आहेत. या चौघापैकीं येक रामजी नामे हैदराबादेंत श्रीमंत राजश्री भाऊसाहबांचे सरकारांत राहिला म्हणोन यैकिलें. त्यास जासूद यैवज मुबादल्यावितरिक्त नांहींत ब स्वामीनीं सेवकाचे विनती-प्रमाणें पूर्वींच हुजूरचे दसखत यैवजीविषईं करून घेतले आहेत. साल आखरीं पुन्हां राजीनामे घेऊन बहाल व बरतफ करावे लागतील. वर्षाचे करारानें लोकांस ठेविलें आहे. सविस्तारें वर्तमान स्वामीस श्रुत व्हांवें याकरितां विनती लिहिली असे. बहुत काय लिहिणें. हे विनती. वेदमूर्ती राजश्री विश्वंभरदेवास अनुष्ठानाचे आरंभाविषईं सांगितलें आहे. हे विनती. यतसामुदी मुनसीचा रुका नवाब विकारुदौला बाहदरांचे अर्जींत घातला असे.

———

पैा छ ६ सफर रविवार, सन ११९१ हिजरी.

श्रीनिवास

अखबार पुरंदर अज इ॥ छ १७ मोहरम लगायत छ २१ माहे

म॥ र सन. ११९० हिजरी माघ वद्य अष्टमी रविवार राजश्री बाळाजी जनार्दन फडनीस स्वकीय विवाहाकरितां कोंकणांत गेलें म्हणोन पूर्वीं लिहिलें होतें. सांप्रत लग्न सिधी करून छ २० माहे माार शनिवारीं पुण्यास आल्याचें वर्तमान यैकिलें. राजश्री कृष्टणराव बलाळहीं पुण्यांत आहेत. उभयतां येकत्र पुरंदरास येतील. मोरोपंत फडनिसांचे यैक्यतेंचें वर्तमान शोध घेऊन माघाहून लिहून पाठऊं.

रा॰ हरी बलाळ फडके पुण्यासमीप आहेत. सिलेदारांस आजीपर्यंत रोजमरे पावले नांहीत. सालझाडा व नालबंदीची चर्चाहीं नांहीं. सारांश रघुनाथरायांकडील वेध सुटून पनाळेकराचे मुकाबल्यास मातबर फौजेची नेमणूक होईल. ते समईं हरीपंत किवा अन्यत्र फौजेसुधां मोहिमेस जातील. दरकूच जाण्याचा निश्चय जाहल्यानंतर सिपाही लोकांस सालझाड्याचा यैवज व रोजमरे द्यावे हा निश्चय व मसलत येथील कारभाऱ्यांची दिसते. सांप्रत सिलेदार लोकांचा दंगा आहे.

कर्नल इपटैन यांचे कूचाच्या निश्चय राजश्री बाळाजी जनार्दन फडनीस पुरंदरास आल्यानंतर होईल. येतसामुदीन मुनसीनें सेवकाचे रुक्यावर ज्वाब लिहिला आहे. तोच रुका बजिनस सेवेसी पाठविला असे.

रा॰ बाळाराव दिवाण नि॥ सिंदे सासवडासमीप आहेत. फडनीस आल्यानंतर सिंद्याकडून मामलत समंधी रुपये यण्याचा निश्चय होईल. तुकोजी होळकर श्रीजेजोरीस आहेत. फडनिसाचे आगमनोतर येतील.

सौ॥ वती आनदीबाई धारेहून नर्मदातीर मंडळश्वरास आली म्हणोन वर्तमान आलें.

रा॰ परशरामपंत मिरजकर व कृष्टणराव पानसें दाहा बारा हजार फौजेनेसीं मुलेहलीसमीप आहेत. महमदअली

कुमदान नि॥ हैदरनाईक धारवाडेहून पांच सात कोसी हुबलीसमीप आहे. कुमदान म॥राचे कुमकेकरितां हैदरनायकाचा पुत्र टिपू येणार म्हणोन पूर्वीं लिहिलें होतें. सांप्रत यैकिलें कीं पांच हजार फौज व पांच हजार बार कुमकी येऊन पावला. पंधरा वीस हजारपर्यंत स्वार व बार कुमदानासमीप जमियत जाहली. परशरामपंत मिरजकरास मुनहलीसमीप राहणें बहुत कठिण आहे. पर्जन्यकाळापर्यंत श्रीमंतांची मातबर फौज त्या प्रांती न गेलियां कृष्टणेपर्यंत नाई(क) म॥राचा अमल होईल यैसें दिसतें. रामचंद्र गणेश व बाजीपंत तीन च्यार हजार स्वारानसीं मिरजेसमीप आहेत. विसाजीपंत नि॥ हरीपंत फडके व मालोजी घोरपडे हजार दोन हजार लोकानसीं पुण्याहून गेले होते ते व रामचंद्र गणेश येकत्र जाहले परंतु येसाजी सिंदे नि॥ राजे पनाळेकर गालब आहे याकरितां रामचंद्र गणेशांची शक्ती मुकाबिल लढाई विषईं नांहीं. येसाजी सिंदा नि॥ राजे पनाळेकर कोल्हापुरीं पांच सात हजार स्वार व प्यादे सुधां आहे व तीन च्यार हजार प्यादा व तीन हजार स्वार रामचंद्र गणेशाचे तोंडावर मिरजेपासून सात आठ कोसी वडगांव म्हणोन ठाण्याचा गांव आहे ते स्थलीं आहे. समग्र पनाळे प्रांत बेचिराग करून मिरज प्रांतांत खंडणी घेत आहे व गांव पाहून खंडणी घेणें असलियां रुपये घेतो किवा लुटितो. धामधूम फार मांडली आहे. येसाजी सिद्यांचा सिलसिला हैदरनायकांसी आहे हें वर्तमान पूर्वींच सेवेसी लिहिलें असे.

राजश्री जयवंतराव पानसें यांचें लेंकाचे लग्नाचा निश्चय फालगुण शुध्दांत आहे. शरीरसंमध पुरंदऱ्यासी जाहला आहें. लग्नानिमित्य राजश्री भिमराव पानसे जरीदे यणार म्हणून यैकिले.

रघुजी भोंसले श्रीमंताचें भेटीकरिता येंणार म्हणून त्यांचे वकीलाचे जुबानी वर्तमान यैकिले होतें ते लिहिले होतें. सांप्रत विशेंष यैंकिल्यात आले नांही. शोध घेऊन माघाहून लिऊन पाठऊ.

---

**A. R. No. 19.**

२२ मोहरम ११९१ हिजरी
२ मार्च १७७७.

पैा छ ६ माहे सफर सन ११९१ हिजरी रविवार.

श्री

विनंती विज्ञापना येथील कुशल ताा छ २२ माहे मोहरम मुकाम सासवड स्वामीचे कृपावलोकनेकरून यथास्थित जाणौन स्वानंद लेखज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष यथील वर्तमाण छ १७ माहे म।। र रोज बुधवारी विनंतीपत्र छेटु मिरधे याचे जोडीसमागमे रवाना केले ते पाऊण सविस्तर वर्तमान विदित जाहले असेल. तदनंतर येथील वर्तमान छ १८ माहे मोर रोज गुरुवार राजश्री हरीपताचा मुकाम पुन्याहून दीड कोस घोरफडीवर आहे. फौजेचे देन्याचा दंगा आहे. कूचाचे अद्याप ठीक नाही. फौजेचे लोकास प्रस्तुत वीस पचवीस लक्ष रुपये द्यावयास पाहिजेत. तेव्हा लोकाची समजुती पडल लोक मागील दो वर्शाचे फडचे करून मागतात. पुढे रोजमुरे वगैरे याची सोये करून द्यावी याप्रमाणे लोकाचा जाबसाल पडला आहे. काही येक फौजेची समजुती जाल्यावाचून हरीपताचे कूच होत नाही. नाना फडनीस कोकनात लग्न करावयास गेले आहेत. ते पुन्यास आलियावर काही लोकाची समजू(त) करणार म्हणौन वर्तमान आहे. नानाहीं येक दो दिवसा पुन्यास सत्वरच येणार कारन की राजश्री मोरोबादादा फडनीस यास समाधान वाटत नाही. दुसरे फौजेचे लोकाची समजुती करणे यास्तव लवकरच येणार. आलियावर लेखन केले जाईल. नाना पुन्यास आलियावर लोकाची समजुती जालियावर हरीपताचे कूचाचा निश्चये होणार. नाना पुन्यास आलियावर लोकाची काये समजू करितात हे वर्तमान कललियावर मागाहून लेखन केले जाईल. हरीपताचे कूचास दिवसगत आहे. पुढे मुल(ख)गिरीचे दिवसही थोडे राहिले. काये निश्चये होऊन हरीपताचे कूच जाल्यास लेखन केले जाईल. शृत होये. छ१९ माहे म।।र रोज शुकरवार ममईस फिरंगी सिबदी वगैरे ठेवितो. ज्याहाजे वगैरे दोन तीन

तयार केली. आगऱ्याचे तालुक्यास उपद्रव करणार हे वर्तमान पूर्वीचे विनंतीपत्रात लेखन केले होते त्याजवरून ध्यानास आले असेल. त्यास आगऱ्याचे मुलकास ममईकर उपद्रव करणार अन करितो यैसे वर्तमान आहे. दादासाहेबही ममईस बागात आहे. काही लोक वगैरे ठेवितात म्हणोन वर्तमान आहे. ममईकडून वकील येथे येणार होता तोही अद्याप आला नाही. वकील आल्यावाचून येथून करनेल अपैन वकील याचेही जाणे होत नाही. शृत होये छ २० माहे म।। र रोज शनवार हैदरचे लोक बाकापूर प्रांतात आहेत. याजकंडील राजश्री परसरामपंत भाऊ वगैरे फौजेसहितं धारवाड प्रातात आहेत. उभये-ताचे अतर पचवीस तीस कोसाचे आहे. त्याचे व याचे लोकाची परस्परे चोटपेट होते म्हणोन वर्तमान आहे. शृत होये. सध्याकाली बापूकडे दरबार वगैरे जाला होता. विदित होये. सध्याकाली नाना पुन्यास येणार म्हणोन वर्तमान आले. शृत होये. मछली-बदराहून करनेल वकील यांजकडे पत्रे घेऊन जोडिली. मछली-बंदरचे फिरंग्यानी करनेल यास लिहिले आहे की तुम्ही श्रीमतापासून रुखसत होऊन दीड पावणे दोन महिने जाले अद्याप तुम्ही तेथे मुकाम करून राहिला अंहा याचे कारन काये? काये तुम्हास अटकाव जाला आहे हे लिहून पाठवावे की त्याप्रमाणे तजवीज करू याप्रमाणे पत्र लिहिले आहे. शृत होये छ २१ माहे म।। र रोज रविवार नवाब सुज्यायेन-मुलक बहादुर याजकडून शुतरस्वार आदोनीहून पत्रे घेऊन त्याचे वकीलाकडे आला शृत होये. राजश्री बालाराव सिद्याकडून पुन्यास जाणार होते ते गेले नाहीत. येथेच आहेत. सिदे जाबगावासच आहेत. येथे यणार. होलकर विठलवाडीवर मुकाम करून आहेत. राजश्री नाना फडनीस लग्न करून काल सध्याकाली पुन्यास आले. पुढे हरीपताचे फौजेचे लोकाची काये तजवीज करून कूच करवितील ते मागाहून लेखन केले जाईल. नानाचे चितात आहे की काही पुन्याचे सावकारापासून येवज कर्जाऊ घे(ऊ)न फौजेस द्यावा येसे आहे. विदित होये. छ ६ माहे म।।रचे आज्ञापत्र हैबतरावजीचे जोडीसमागमे रवाना केले ते छ १७ माहे म।।री पावले. विनंतीपत्रे दोन तीन वरचेवर पावले.

म्हणोन लेखन केले. आज्ञापत्र पाऊन बहुत संतोश जाला. आज्ञापत्री आज्ञा की सरकारचा ज्यवाब इनायेतनामा पाठविला आहे. पावला. स्वामीचे लिहिल्याप्रमाणे इनायेतनामा पावला. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल तें सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काय लिहिणे. कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 20.** २२ मोहरम ११९१ हिजरी
२ मार्च १७७७.

.पैा छ ९ सफर सन ११९१ हिजरी रोज बुधवार च्यार घटका दिवस राहता पावले.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां॥ नमस्कार विनती उपरि येथील वर्तमान ता॥ छ २२ मोहरम माघ वद्य नवमीपर्यंत मो सासवड स्वामीचे कृपे करून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष स्वामीनीं छ ६ मोहरमचें पत्र हुजूरचे इनायतनाम्यासहित व जासूदांची ततमा तलब आखर शवालपर्यंत मो रुपये १३४॥· पैकीं हुडणावळ वजा करून बाकी रुपये १३१॥ येकसें साडे येकतीस रुपयाची हुंडी पाठविली ते पाऊन पत्राचें प्रत्योतर छ २१ माहे मारीं लिहून छटूचे विद्यमानें लिफाफे रहमायारखान दारोगे हरकारे यांजकडें पाठविले. तो लिफाफा स्वामीस पाऊन वर्तमान कळलें असल. पत्रें पाठविल्यानंतर गडावर राजश्री सखारामपंत बापूची भेट जाहली व बापूचें मुखें तथ्य वर्तमान यैकिलें तें यजमानांस व स्वामीस श्रुत व्हांवें याकरितां सविस्तारें पृथक लिहिलें असे. सारांश हरीपंत फडके यांजकडून फौजेची सरबराई होईना व येक रुपयापासून

लाखोपर्यंत विन्हां बापू व नानानी सरजामी केल्या वितरिक्त काररवाई न होय. याकरितां रो। हरीपंतांची सरदारी मवकूफ करून रो। मोरो बाबूराव फडनीस यांस सांगावी हा निश्चय बापू व नानानी करून कृष्टणराव बलाळ यांस पुण्यास मोरोबाचे मध्यस्तीस पाठविलें आहे. तह कोणे प्रकारचा ठराव जाहला हें वर्तमान अद्यापि निश्चय कळलें नांहीं. बापूनीं काररवाईवर द्रिष्ट देऊन मोरोपंतास शरीक करावयाचा उद्योग कला आहे. आरंभ सुखावह आहे. परिणाम कोणे रीतीनें होईल हें पाहांवें. बहुत काय लिह्णें. हे विनती.

---

पैाा छ ९ सफर सन ११९१ हिजरी रोज बुधवार च्यार घटका दिवस राहता पावले.

श्रीनिवास

अखबार पुरंदर अज इ।। छ २१ मोहरम लगायत छ २२ माहे म।।र सन ११९० हिजरी सोमवार माघ वद्य

रो। बालाजी जनार्दन फडनीस लग्न करून पुण्यास आल्याचें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत यैकिलें कीं मोरोबाबा फडनीसांचे समजाविशीचा निश्चय करून पुरंदरास येणार. बहुशा सिवरात्रीचें पारणें करून येतील. कृष्टणराव बलाळहीं राजश्री समागमेंच येतील.

हरीपंत फडके याजकडून फौजेचे कामाची सरबराई होईना व मोरो बाबूराव फडनीस यांचा मुदा श्रीमंताचे हुजूर मुख्तारीचे काम करावें किंवा कैलासवासी त्र्यंबकराव यांजप्रमाणें फौजेची सरदारी करावी यास्तव रो। सखारामपंत बापू व बाळाजी जनार्दन फडनीस यांचे विचारानें हरीपंताकडील सरदारी काढन मोरोपंतास सांगावी हा

निश्चय जाहला व सांप्रत नाना फडनीस व कृष्टणराव बलाळ पुण्यांत आहेत. बहुशा मोरोपंतास पुरंदरास घेऊन येतील. रघोजी भोंसले यांचें पत्र छ १७ मोहरमचें जालनापूरचे मुकामीहून आलें, पैठणचे मार्गे येणार. अजीपर्यंत गंगा उतरोन आले असतील. फालगुण शुध द्वितीयेस छ ३० मोहरमीं भोंसले मा।र पुरंदरास येणार म्हणोन तहकीक वर्तमान बापूनीं सांगितलें.

रघुनाथरायांचे स्नेहाचा प्रकार करनल इपटैन कूच करून गेल्यानंतर निश्चय होईल. करनलास कूच करुन जावयाची त्वरा व रघुनाथराव तलवन मिजाज याकरितां माष्टी व करनलाचे रूबरू नेम होऊन करनल मा।र पुरंदरीहून कूच करुन जातील. करनलाचे रुखसतीकरितां सत्वर यांवें म्हणोन बापूनी नाना फडनीसास लिहून पाठविलें आहे. येसाजी सिद्यासमीप दाहा बारा हजार स्वार व प्यादे जमाव जाहला व रामचंद्र गणेशावर गालिब आहे, हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत यैकिलें कीं शंकराजी घोरपडे वगैरे याज-बरोबरी पांच साहा हजार फौज देऊन रामचद्रपंताचे मुकाबल्यास वडगांवास पाठविलें. वडगांवीहून सात आठ कोसीं मिरज आहें. मिरजे-समीप कृष्टणातीरीं रामचंद्र गणेश व बाजीपंत व विसाजीपंत नि।। हरीपंत एकत्र आहेत.

परशरामभाऊ मिरजकर व कृष्टणराव पानसे दाहा बारा हजार फौजेनसीं मुनहलीसमीप आहेत. महमदअली कुमनदान नि।। हैदर-नाईक धारवाडेहून कूच करुन हुबलीस गेला. कुमनदान मा।र यास दाहा हजार फौज स्वार व बार नाईक मशारनुलेकडून कुमक आली. पंधरा सोळा हजार फौजेनसीं हुबलीसमीप आहे. टिपू हैदरनायकाचा लेंक दाहाहजार स्वार व दाहाहजार बारानसीं बिदनूर प्रांती कुमनदानाचे पुस्तीस सिध आहे. श्रीमंताकडील फौज न गेल्यापक्षीं वैशाख जेष्ठांत कृष्टणातीरास नायकाची फौज येईल.

माहदजी सिंदे यानी दुसरें लग्न माघमासी केलें. सांप्रत जामगाव परगणें पारनेर येथें आहेत. तुकोजी होळकर जेजोरीस आहेत. रघुना१ -

रायांची स्त्री सौ।।वती आनंदीबाई धारेहून उजनीस आली व उजनीहून नर्मदातीर मंडळेश्वरास राहावयास येणार होती. आली असेल.

आजी छ २२ माहे मारीं पुण्याहून वर्तमान आलें कीं हरीपंताचे समागमेची फौज पुण्याभोंवतालें सात आठ कोसी गवत व कडबा समग्र भरून नेला पुण्याचे मंगळवार व सोमवार पेंठेंत गवत व कडबा लोकांनी गजी करून ठेविला तो व लकडवाल्यांच्या गजी होत्या त्या समग्र लुटून नेल्या. गवत व कडब्याबरोबर लोकांचे दाणे लुटले गेले.

---

**A. R. No. 21.** २३ मोहरम ११९१ हिजरी
३ मार्च १७७७.

पैा छ ९ सफर सन ११९१ हिजरी रोज बुधवार च्यार घटका दिवस राहता पावले.

श्रीशंकर

विनती विज्ञापना. यथील कुशल ताा छ २३ माहे मोहरम मुा काा सासवड स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानद लेखन आज्ञा करीत असिले पाा विशेष. येथील वर्तमान छ २२ माहे मजकूर रोज सोमवारी विनतीपत्र प्राथःकाली छटू मिरधे याचे जोडीसमागमे रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान अवगत होईल. तदनतर यथील वर्तमान राजश्री नाना फडनीस लग्न करुन पुन्यास आले हे वर्तमान प्राथःकाली विनतीपत्र सेवेसी रवाना केले त्यात लेखन केले आहे त्याजवरुन ध्यानास येईल. राजश्री हरीपत वगैरेचे वर्तमान त्यात सर्व लेखन केले आहे. हरीपताचे फौजेचे देन्याचा गवगवा विशेष. नाना आलियावर काही फौजेचे लोकाचा देन्याचा फड(शा) करावा यसा (नि) श्चये हरीपतानी

केला आहे. प्रस्तुत नानाही आले. लोकाची काये समजुती करितात हे ध्यानास आणून मागाहून सविस्तर लेखन केले जाईल. विना लोकाची देन्याची समजूती जाल्यावाचून हरीपताचे कूच होत नाही. नानाचे चितात आहे की पुन्याचे सावकारापासून दाहा पाच लक्ष रुपये कर्जाऊ घ्यावे अनिही महाल वगैरेचे यैवजी पाच च्यार लक्ष रुपये घेऊन थोडा बहुत हरीपताचे फौजेचा गवगवा वारून हरीपताचे कूच करवावे यैसे आहे. पुढे ये विशई काये निश्चये होऊन हरीपताचे कूच होईल ते लेखन केले जाईल. फौजेचे लोक सिलेदार व सरदार वगैरे म्हणतात की मागील आमचे दो सालाचे फडचे करून द्यावे. पुढे रोजमुरे वगैरेची सोये करून द्यावी. तेव्हां आम्ही हरीपता-समागमे जाऊ यैसी भवति न भवति आहे. प्रसग तो दिसतो की लोकाची देन्याघेन्याची समजूती करावयास व लोकाची समजूती पडावयास आठपधरा दिवस पाहिजेत. तो परियेत काही हरीपताचे कूच होता दिसत नाही. पुढे मुल(ख)गिरीचे दिवसही थोडकेच राहिले. याप्रमाणे येथे कितिक लाहान थोर लोक म्हणतात. मग काये निश्चये होऊन कूच होईल ते लेखन केले जाईल. ममईकरही सिबदी वगैरे ठेवितो. राघोजी आगरे याचे तालुक्यास उपद्र(व)करणार यसे वर्तमान आहे. दुसरे श्रीमत दादासाहेबही तेथे आहेत. ममईकर सिबदी वगैरे ठेवितो हाही अदेशा येथे यास जाला आहे. शृत होये. करनेल अपैन वकील अद्याप येथेच आहे. विना ममईहून वकील आल्यावाचून करनेलचे जाणे होत नाही. विदित होये. राजश्री रामचद्र गनेश येसाजी सिदे याचे शहावर आहे. राजश्री परसरामपंत भाऊ गोपालराव याचे बधु वगैरे फौजेसहित धारवाडप्राती आहे. हैदरची फौज बाकापुराजवळ आहे. तमाम करणाटक प्राताचे सवस्तानिकापासून हैदर लोक खडन्या वगैरे घेतात म्हणोन वर्तमान आहे. शृत होये. राजश्री माहादजी सिदे जाबगावास आहेत त्याचे दिवान बालाराव येथे आहेत. उभयेता कारभारी बालाराव यासी पेशकसीचा जाबसाल करितात. बालाराव यानी सिद्यास लिहिले आहे. ये विशई काये जाबसाल होईल तो ध्यानास आलिया लेखन

केले जाईल. शृत होये. होलकर फौजेसहित विठलवाडीवरच मुकाम करुन आहेत. विदित होये. राजश्री कृष्णरावजी अद्याप पुन्यास आहेत. नाना समागमे येथे येणार. विदित होये. फारसी अखबार लिहिणारास समाधान नाही, म्हणोन लिहिलिया अखबारेची फारसी करवून हजूरात व नवाब विकारू:दौला बहादुर यास गुजरानावी. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काय लिहिणे कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ति.

---

**A. R. No. 22.** २४ मोहरम ११९१ हिजरी

४ मार्च १७७७

पाौ छ १२ माहे सफर शनवार सन ११९१ हिजरी दोन घटका दिवस राहता.

श्रीनिवास

पोष्य हेबतराव गोपाळ सांा नमस्कार विनती उपरि. येथील वर्तमान ताा छ २४ मोहरम माघ वद्य येकादसी बुधवारपर्यंत माो सासवड स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ २२ माहे माारीं छटूचे विद्यमानें व छ २३ मोहरमी भींवजी व धोडी जासुदांसमागमें स्वामीचे सेवेसी हुजूरचे अर्जीसहित पत्रें पाठविलें तें पाऊन सविस्तारें वर्तमान कळलें असेल. सांप्रत पूर्वील पत्रीं वर्तमानें लिहिलीं त्याचा गोशवारा दाखल पृथकपत्रीं वर्तमान लिहिलें असे. आजी छ माारीं रघोजी भोंसले समीप आल्याचें वर्तमान यैकिलें. त्यावरून भोंसल्याचे भेटीचे उदेशं श्रीमंत पंतप्रधान स्वामीचे डेरे गडाखालें जाहले. पूर्वील निश्चय यैकिला होता कीं फालगुण शुध द्वितिया छ ३० मोहरमीं भेटी होणार. बहुशा याच

नेमाप्रमाणें भेटी होतील. जासुदांची तनखा माहबमाही जिलकादापासून स्वामीनीं आपले पत्रासहित पाठवावी. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पौ छ १२ माहे सफर शनवार सन ११९१ हिजरी दोन घटका दिवस राहतां.

श्रीनिवास

अखबार पुरदर अज इ॥ छ २३ मोहरम लगायत छ २४ माहे माार सन ११९० हिजरी.

राजश्री बालाजी जनार्दन फडनीस व कृष्टणराव बलाळ मोरो बाबूराव यांचे समजाविसीचा सिधांत करून पुरंदरास येणार.

रा॥ हरीपंत फडके यांजकडोन फौजेची समजावीस होत नांहीं याकरितां रा॥ मोरो बाबूराव यांस सरदारी सांगोन मोहिमेस रवाना करांवें म्हणोन राा॥ बापू व नानानीं योजना केली आहे.

माअली कुमनदान नि॥ हैदर नायक हुबलीवर आहे. नाईक माराकडोन स्वार व प्यादे कुमकेस आले. पंधरा सोळा हजार पर्यंत जमा जाहला आहे. परशरामभाऊ मिरजकर व कृष्टणराव पानसे मुनहलीसमीप आहेत. दाहा बारा हजार फौज मारनुले समीप आहे. श्रीमंताकडील कुमक गेल्यावितरिक्त कुमनदानाचे मुकाबिल्याविषयीं परशरामपंताचा मकदूर नांहीं.

येसाजी सिंदे नि॥ राजे पनाळेकर यांची फौज वडगांव मिरजेहून सात कोसी पांच हजार पर्यंत रामचंद्र गणेशांचे मुकाबिल आहे व सिंदे मार काल्हापुरी पनाळे प्रांत समग्र उध्वस करून मिरज प्रांती

खंडणी घेत आहे. रघोजी भोंसल्याची पत्रें छ १७ मोहरमीची जालनापूरचें मुकामीहून आली. छ ३० मोहरमी पुरंदरास येणार आहेत. आजी छ २४ माहे माारीं श्रीमंताचे डेरे गडाखालें जाहलें. भोंसले माार सत्वरच येतील.

करनल इपटैन यांची रवानगी सत्वरच होणार. रा नाना फडनीसानीं सत्वर यांवें याविषईं सखारामपंतानी पत्र पाठविलें आहे. बहुशा भोसल्याचे भेटीनंतर करनलास निरोप देतील.

या उपरि ज वर्तमान नवल अपूर्व होईल तें माघाहून लिहून पाठऊं हे विनंती.

पुण्याची सोमवार पेठ व मंगळवार पेठ गवताचे हंगाम्या-करिता लुटंली गेली हे वर्तमान पूर्वी लिहिले असे त्याजवरून श्रुत जाहले आसेल.

-----

**A. R. No. 23.** २५ मोहरम ११९१ हिजरी
५ मार्च १७७७

पौ छ ११ माहे सफर शुक्रवार सन ११९१ हिजरी जासूदाचे जोडीबराबर.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सा। नमस्कार विनती उपरि येथील वर्तमान ता। छ २५ मोहरम माघ वद्य द्वादसी गुरुवासर मो। सासवड स्वामीचे कृपे करून क्षम जाणोन स्वानंद लेखनाज्ञा कीजे. विशेष येथील वर्तमान छ २४ पर्यंत लिहून सेवेसी पत्र पाठविलीं तें पावलीं असतील. विशेषार्थ करनल इपटैन यानीं जावयाकरितां बहुत निकड केली त्यावरून काल छ

२४ माहे मारीं अस्तमानी राजश्री सखारामपंतबापू करनलाचे डेन्यास जाऊन उदईक छ २६ मोहरम शुक्रवारीं कूच करून जांवयाचा निश्चय करून गेले. आजी त्रितिय प्रहरीं करनल इपटैन गडाखालें श्रीमंतानी ड़ेरा उभा केला आहे त्या स्थलीं जाणार व उदईक येथोन स्वार होऊन दरकूच हुजूर येतात म्हणोन येतसामुदीन मुनसीनं सांगितलें व पूर्वी नवाब विकारुदौला बाहादर यांनी मुनसीस पत्र पाठविलें होतें त्याचें प्रत्योतर सांप्रत पाठविलें आहे. नवांबास पावतें करावें व करनल इपटैन यांस हुजूरचे मनसबदारांचे प्रांतापासून प्रत्यही ज्याफतीचें साहित्य करविलेंच असल. सांप्रत येतसामुदीन मुनसी यांनी करनलाचे इतल्यानें मजला चिठी पाठविली होती की प्रत्यही दर मजलीस तीन हातीस दाणा वगैरे व कडबा हजार पुले व काष्टें दाहा मण येणें प्रमाणें सरजाम पावता होत जावा. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विनती. राजश्री बालाजी जनार्दन फडनीस यांनी सत्वर यांवें या विषयीं बापूची पत्रें गेली होतीं. करनलाचे जाण्याकरितां रो फडनीस आजी प्राथःकाळची च्यार घटका रात्र असतां गडास आले. सेवेसी श्रुत होय. व जे कृष्टणाजी देवाजी यांनी प्रातःकालींच छटूचे विद्यमानें पत्र पाठविले याकरितां सांप्रत सेवकानें सूचना केली असताही पत्र पाठविलें नांही हे विनती.

----

**A. R. No. 24.** २५ मोहरम ११९१ हिजरी

५ मार्च १७७७.

पाौ छ १२ माहे सफर शनवार सन ११९१ हिजरी दोन घटका दिवस राहतां.

श्रीशंकर

विनती विज्ञापना येसीजे. येथील कुशल ताा छ २५ माहे मोहरम स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणोन स्वानद

लेखन आज्ञा करीत असिले पा. विशेष. येथील वर्तमान छ २३ माहे मार रोज मगलवारी विनतीपत्र राजश्री हैबतराव याचे जोडी समागमे प्राथःकाली रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान विदित जाह्ले असेल. तदनतर येथील वर्तमान पुन्यात नाना एक दोन दिवस जाळे आले. हरीपताची व नानाची भेट जाली. हरीपतानी फौजेचे देन्याचे व गवगव्याचे वगैरेचे वर्तमान सर्व नानास सागितले की लोक दोवर्शाचा फडच्या करून मागतात. पुढे रोजमुरे वगैरे याची निशा मागतात. याप्रमाणे लोकाची समजूती पडल्यास लोक चाकरीस हजर आहेत. हे न जाल्यास गवगवा मात्र आहे ये विशई नानाचे व हरीपताचे खलवत जाले. खलवत होऊन नानानी हरीपतासी उतर केले की आम्ही पुरधरास जातो. बापूची व आमची भेट जाली. यावर लोकाचे देन्याची हरयेक तजवीज करून तुमचे कुचाचा निश्चये केला जाईल. नानाही उदईक येथे येणार. शृत होये. छ २४ माहे मार राज बुधवार उभयेता कारभाऱ्याचे चितात की राजश्री मारोबादादा फडनीस यास आपनात मेलऊन घ्यावे ते व आपन येक्या विचारे कारभार करावा. त्याचे व आपले अतरयाम येकच. परतु ज्यनामधे की याचे व कारभाऱ्याचे चित शुध नाही. यामुले कितीक राज्यभाराचे कामास बखेडा पडत जातो यामुले त्यानी व आम्ही येका विचारे असून कारभार करावा. याअर्थी उभयेता कारभाऱ्यानी राजश्री कृष्णराव बलाल यास पुन्यास मोरोबादादाकडे पाठविले. मोरोबादादा सिवराव मार यासी पाच च्यार खिलवत जाले. खिलवताचे भाव यैकिन्यात आले की राव मार यानी मोरोबादादास बहुत बोधाच्या गोष्टी सागितल्या की उभयेता कारभारी व आपन येकत्र होऊन राज्यभार चालवावा. द्वईत न दाखवावे. दुसरे सर्वत्र फौजेची सरदारी आपन करावी. फौज घेऊन आपन मुल(ख)गिरीस निघावे. राजश्री हरीपंत आपले समागमी मात्र राहातील. ज्या प्रमाणे आपन आज्ञा करतील त्या प्रमाणे वर्तणूक करतील. त्याजवरून मोरोबादादानी राव मार यासी उतर केले की आम्ही आपले स्वस्त श्नानसध्या करून

आहो. कोन्हाचे बऱ्या वाईटात किमपि नाही व आमचे चितात द्वईत काडी मात्र नाही. यैसी भवति न भवति येक दोन दिवस जाली. सेवटी मोरोबानी म्हटले की फौज घेऊन सरदारी करावी. त्यास आम्ही आपले स्वाधीनचा कारभार करू. दुसरे श्रीमत दादासाहेबाची समजूती करावी. तिसरे फौजेच्या देन्याचा दगा पचवीस तीस लक्ष रुपयें देणे हे वारावे. या प्रमाणे जाल्यास कबूल करू. त्याजवरून राव मार यानी उतर केले की दादाचे समजूतीचा प्रकार घडता घडता घडल. प्रस्तुत होत नाही. फौजेचे मात्र देन्याची वाट आपन व कारभारी येक होऊन करावी व सरदारी कबूल करावी याप्रमाणे जाबसाल आहे. त्यास हे काम कबूल करावयास थो(डा) बहुत मोरोबा हमवार जाले आहेत. त्यास रावजीनी मोरोबास म्हटले की फौजेची देन्याची वाट कोन्याप्रकारे काहाडावी. त्यावरून मोरोबानी उतर केले की प्रस्तुत फौजेस पचवीस लक्ष रुपये पाहिजेत. त्यास दाहा लक्ष रुपये याची तजवीज आम्ही करून देऊ व दाहाची तजवीज नानानी करावी. पाच बापूनी द्यावे. या प्रमाने जाल्यास फौजेचा गवगवा वारल. याप्रमाणे भवति न भवति राव मार याचे विद्यमाणे होते. मग काये निश्च(य) ठरेल तो पाहावा. श्रुत होये. रावजी आज येथे येणार होते. मोरोबाचे बोलन्याचा भाव बापूस सर्व समजावावा. नानास तो सर्व भाव पुन्यास समजाविला त्यास मोरोबानी रावजीस चिठी पाठविली की येकदान दिवस पुन्यास राहाणे त्याजवरून राव मार दोन तीन दिवस पुन्यास राहाणार. राव मार येथे आलियावर मोरोबाचा विचार कारभाऱ्याचे मते काये ठरेल तो ध्यानास आलिया लेखन केले जाईल. विदित होये. ममईहून पूर्वी वकील येणार होता तो रहित जाला होता. येथून करनेलने ममईकरास दाहापाच पत्रे लिहिली की वकील आल्यावाचून आमचे जाणे होत नाही. त्याजवरून कोन्ही वकील येणार म्हणौन वर्तमान आहे. शृत होये. राजश्री मुधोजी भोसले प्रा सेवगावावर आले. फाल्गुन शुध ३ येस श्रीमताची भेट होणार म्हणोन वर्तमान आहे. आनिक मागाहून याचा शोध करून लेखन केले जाईल.

शृत होयें. होलकर यानी तुलजापुरास जावयाचा उद्योग केला होता. येक दोन मजल कूच करून गेले होते. उपरातिक माघारा विठलवाडीवर आले. शृत होये. पुन्याजवलील खेडीपाडी वैरनीमुले हरीपताचे फौजेनी उज्याड केली देखील. पुन्याबाहेर पेठेतील वैरनी हरीपताचे फौजेचे लोक नेतात. विदित होये. राजश्री माहादजी सिदे जाबगावास आहेत. आनिक दुसरें लग्न केले. पारनेरचे पाटलाची मुल केली. शृत होये. राजश्री भिवराव पानसे सडे मात्र लग्नाकरिता घरास आले. फौज वगैरे सरजाम कोकनप्राती ठेविला शृत होये. राजश्री नाना फडनीस छ माारी दोन घटका दिवस पूर्व येता पुरधरास आले शृत होये. मुधोजी भोसले दाहा पध (रा) कोसावर आले. उदईक त्याच्या भेटी होणार. उदई छ २६ सावीस भेट न जाली तर फालगुन सुध ३ त्रियेस भोसल्याच्या भेटी होणार. शृत होये. बहुत काय लिहिणे कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 25.** २६ मोहरम ११९१ हिजरी

६ मार्च १७७७.

पौा छ १२ माहे सफर शनवार सन ११९१ हिजरी.]

श्रीशंकर

विनती विज्ञापना. यथील कुशल ताा छ २६ माहे मोहरम मुाा काा सासवड स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणोन स्वानंद लेखन आज्ञा करीत असिले पाा. विशेष यंथील वर्तमान छ २६ माहे माार रोज गुरुवारी प्रहर दिवस पूर्व येता विनतीपत्र छटू मिरधे याचे जोडीसमागमे रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान विदित होईल. तदनतर यथील वर्तमान ममईकराची जोडी पत्रे श्रीमतास व करनल

वकील यास घेऊन आली. ममईकरानी श्रीमतास लिहिले की करनेल वकील यास निरोप द्यावा. ते गेलियानतर आम्हीही वकील तुम्हाकडे पाठऊन देतो. कोन्हेही प्रकारे आम्हाकडील आपन शंशये न आनावा. पूर्वीचे तुमचे आमचे कराररमदार जे जाले आहेत त्यात अतर पडनार नाही. त्याजवरून करनेल यास रुखसत करावे यैसा निश्चये जाला. तिसरे प्रहरी गडाखाले उभयेता कारभाऱ्यानी डेरा देविला. च्यार घटका दिवस शेष राहाता करनल वकील व मेघफरसन स्वार होऊन श्रीमताचे डेऱ्यास गडाखाले कारभाऱ्याचे रुखसतीस गेले. दोन घटका दिवस शेष राहाता उभयेता कारभारी गडाखाले डेऱ्यास आले. उभयेता कारभारी व करनेल वकील याचा खिलवत च्यार घटका रात्र पावेतो जाला. उपरातिक करनेल वकील व मेघफरसन यास कारभाऱ्यानी रुखसत केले. श्रीमतापासून तो पूर्वीच रुखसत जाले होते. ममईहून जाबसाल आलियानतर कारभाऱ्यापासून रुखसत व्हवा येसे ठरले होते. प्रस्तुत ममईकराची पत्रे आली त्याजवरून करनैल वकील यास रुखसत केले. करनेल वकील यास कारभाऱ्यानी च्यार वस्त्रे व येक रकम सिरपेच देऊन रुखसत केले. याच प्रमाणे मेघफरसन यास दिल्हे. सा घटका रात्र पूर्व जाता करनेल रुखसत होऊन आपले डेऱ्यास गेले. उपरातिक उभयेता कारभारी गडावर गेले. उदईक करनेल वकी (ल) कूच करणार.|छ|मारी करनेल वकील यानी ती कोसाचे कूच करून कोकेडीस मुकामास गेले. कूच दरकूच येज्यमान साहेबाकडे येतात. ममईकरास करनेल वकील यानी लिहिले की आम्ही कूच करून नवाब साहेबाकडे गेलो. श्रीमतानीही ममईकरास पत्रे लिहिली की करनेल वकील यास रुखसत केले, कूच करून गेले. ममईकरास श्रीमतानी दोन डाल्या अगुराच्या पाठविल्या. ममईहून वकील आलियावर लेखन केले जाईल करनेल व

२

पौ छ १२ माहे सफर शनवार सन ११९१ हिजरी.

कील यासमागमे श्रीमताकडील सेवकराम म्हणोन वकील जातो. वकीलासमागमे कलकतेकरास श्रीमतानी येक हाती वस्त्रे

व काही ज्यवाहेर रकमा दिल्या आहेत. शृत होये. मुधोजी भोसलेही लवकरच येणार म्हणोन वर्तमान आहे. आलियानतर लेखन केले जाईल. विदित होये. राजश्री कृष्णरावजी पुन्याहून येथे येक दो दिवसा येणार विदित होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काय लिहिणें हे विज्ञाप्ती.

**A. R. No. 26.** २६ मोहरम ११९१ हिजरी
६ मार्च १७७७

पाौ छ १२ माहे सफर शनवार सन ११९१ हिजरी.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार विनती उपरि. येथील वर्तमान ताा छ २६ मोहरम शुक्रवार माघ वद्य त्र्ययोदसी पर्यंत मेाा सासवड स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. करनल इपटैन आजी छ माारी पुरंदरीहून कूच करून हुजूर यावयाचे उदेशें दंरमजल येतात म्हणोन हुजूरांत अर्जी व नवाब विकारुदौला बहादर यांस पत्र व लेखकांचे पत्र वकारपूर्वकास लिहून पिराजी व संताजी खांसगत जोडी सेवेसी छ २५ माहे माार गुरुवारी दोन प्रहरा रवाना केली ते सेवेसी पाऊन वर्तमान श्रुत जाहले असेल. त्यानंतर येक घटका दिवस असतां छ २५ गुरुवारी करनल इपटैन व मेघफरसन व मुनसी उभयतांचे श्रीमंत पंतप्रधानाचे डेऱ्यास गडाखाले उभा केला होता ते स्थलीं गेले. तेच समईं बालाजी जनार्दन फडनीस गडाहून उतरून डेऱ्यास आले. त्याउपरि एक घटका रात्रीस रा सखारामपंतबापू गडाहून डेऱ्यास आले. दोन घटका रात्रपर्यंत गडाखाले डेऱ्यांस नाना फडनीसांचे लग्नाच्या व अन्यत्र गोष्टी सांगत बसले होते. त्यानंतर खिलवतेचे डेऱ्यांत जाऊन दोन घटका येकांत केला. पुन्हां डेऱ्यांत आले. पूर्वी श्रीमंताकडील रुखसत व जवाहर व वस्त्रे करनलास दिल्ही होतीं. उभयतां कारभाऱ्यांकडील वस्त्र देणें बाकी

होते याकरितां नानां व बापूकडील वस्त्रे करनल व मेघफरसन व मुनसीस दिल्ही.

| करनल इपटेन | | | बापू नाना | | मेघफरसन |
|---|---|---|---|---|---|
| बापू | नाना | | | | |
| ८ | ८ | महमूदी थाने | ६ | ६ | महमूदी थाने |
| १ | १ | किमखाब | १ | १ | किमखाब |
| १ | १ | शालजोडी | १ | १ | शालजोडी |
| १ | १ | सिरपेच मुरसा | १ | १ | सिरपेच |
| ११ | ११ | | | | |

याचप्रमाणे येक खोन बापूकडील व एक खोन नानाकडील सदरहू प्रमाणे उभयतांस वस्त्र व जवाहर व उभयता मुनसीस पैठणी सेला व मुडासी व येके येक महमूदी देऊन रुखसत केलें. करनल इपटैन पांच घटका रात्रीनंतर डेऱ्याहून स्वार होऊन आपले डेऱ्यास गेला. मार्गी जातां भिवडीसमीप करनलाचे डेरे होते. तो मार्ग सोडून रूद्रमाळा-समीपचा जेजोरीचा रस्ता धरून दोन कोस वाट चुकोन गेले. पुन्हां आडमार्गाने वाटेचा शोध करून आपले डेऱ्यास आले. रा॰ बापू व नाना करनल गेल्यानंतर दोन घटका डेऱ्यांत बसून उपरांतिक गडावर गेलेजी छ २६ माहे माार शुक्रवारीं करनल इपटैन यानीं पुरंदरा-पासून पांच कोसी कूच करून गेले. श्रीकृपे करून

पा॰ १२ माहे सफर शनवार चेतुरदशी सन ११९१ हिजरी.
पु॥ श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी

दरकूच सत्वरच हुजूर येतील. रा॰ बालाजी जनार्दन फडनीस करनलाचे निरोपाकरितां पुण्याहून सत्वर आले. मोरोबा फडनीसाचे समजाविसीचा निश्चय पुरता जाहला नांही. रा॰ कृष्टणराव बलाळ पुण्यांतच आहेत. शोध घेऊन तहकीक लिहून पाठवितो.

सिपाही लोकांचा हगामा हरीपंतावर बहुत आहे. गवताचे निमित्तानें सोमवार मंगळवार पेंठ लुटली. हें वर्तमान पूर्वी लिहिलें होतें. त्यास लोकांस रोजमरा पावत नांहीं. याकरितां मनस्वी जाहले आहेत. हुकुमांत नांहींत. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

**A. R. No. 27.** ३० मोहरम ११९१ हिजरी
१० मार्च १७७७.

पाौ छ १७ सफर सन ११९१ हिजरी गुरवार साइंकाळी

श्रीनिवास

पोष्यें हैबतराव गोपाळ साा नमस्कार विनंती उपरि येथील वर्तमान ताा छ ३० मोहरम फालगुण शुध २ मंगळवारपर्यंत मे।।सासवड स्वामीचे कृपे करून क्षेम जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. पूर्वी करनल इपटैन इंग्रेज याचे कूचाचें वर्तमान व इतर अखबारेसहित छ २५ माहे माारी खांसगत जोडी व छ २६ रोज शुक्रवारीं छटूचे विद्यमानें हुजूरांत व वकारपूर्वकांस व स्वामीस अर्जीसहित पत्रें पाठविली तें पाऊन सविस्तारें वर्तमान कळलें असल. त्या उपरि इकडील नवल विशेष वृत पृथकपत्रीं हुजूरांत व नवाब विकारुदौला बहादर व स्वामीस विनंती लिहिली आहे त्यावरून सेवेसी श्रुत होईल. हुजूरांत व वकारपूर्वकास फारसीपत्र लिहिले आहे त्यात न्यून असलियां स्वामीनी पूर्ती करावी. मुख्यार्थ राजश्री सखारामपंतबापू कैलासवासी नीलकंठराव आबा पुरंदरे यांचे स्त्रीनें बहिणीची कन्या दत घेतली तिचा संबंध रा॥ भीमराव पानसे यांचे बंधू जयवंतराव पानसे यांचे पुत्रासी जाहला आनि द्वितीया मंगळवारी लग्न केलं. या लग्नाचे साहित्यास व्याही मुख्य सखारामपंत याजकरितां माघ वद्य १४ शनिवार छ २७ मोहरमी सिवरात्रीस श्रीवटेस्वरासमीप येऊन उतरले व काल सोमवारीं गांवात आपले हवेलीस येऊन राहिले. लग्नाचे

उत्सहानंतर गडास जातील. रो रघोजी भोंसले सेनासाहब सुभा कालीं छ २९ माहे मारीं सासवडासमीप येऊन उतरले. आजी बापू व नानाची भेट जाहली. येथोन कूच करून कोडितासमीप करहातीरीं जाऊन उतरले. श्रीमंताचे भेटीचा व गडास जाऊन भोजनाचा आजीच नेम होता त्यास मातोश्री गंगाबाई अस्पर्श जाहली. श्रीमंत प्रधान बाईवितरिक्त गडाखालें येऊन प्रहर दहा घटका स्वस्थ राहतील किंवा न राहतील हा भरवसा नांहीं. याकरितां आजीच्या भेटी राहिल्या. या उपरि बहुशा छ ३ सफर शुक्रवारीं किंवा येक दिवस न्यून अधिक भेटी होतील. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विनती.

श्रीनिवास

पु॥ अखबार छ ३० मोहरम विनतीजे. रो सखारामपंत बापूचे मतें रघुनाथरावदादास समजाऊन आणांवें व हरीपंताकडून रुपयाचे सरबराईचें काम होत नांहीं याकरितां व मोरोपंतासी स्नेह करावा म्हणून फौजेचे सरदारीचें काम मोरोबादादास सांगांवें हा निश्चय आहे. त्याप्रमाणें रो कृष्टणराव बलाळ मोरोबाचे समजाविसीकरितां पुण्यास गेले होते त्यास मोरोपंतानी रघुनाथरावदादास आणांवें हा मुख्य पैगाम घालून परस्परें कोणे रीतीनें चालांवें व कामकाज व सलाह मसलतींत त्रिवर्गाचा येकोपा असावा व आणखीं कितेक मतलबाचे मुदे घातले आहेत. याकरितां राजश्री कृष्टणराव बलाळ व गोपाळ नाईक तांबेकर उभयतां पुन्हां पुरंदरास आले आहेत. निश्चय कोणता होईल तो सेवेसी विनती लिहीन. सारांश राजश्री बापूचे मर्जीचे डौलाप्रमाणें आजीपर्यंत कारभार जाहला व पुढेहीं यांचेच सूत्रानें वलवट चालणार. काही येक नवल विशेष वर्तमान रो भीमराव पानसे यांनीं आजीच सेवकास सांगितलें ते माघाहून खांसगत जोडीसमागमे लिहून पाठवीन हे विनती.

पौ छ १७ सफर सन ११९१ हिजरी गुरुवार साइंकाळी

---

**A. R. No. 28.** १ सफर ११९१ हिजरी

११ मार्च १७७७.

पौ छ १७ सफर सन ११९१ हिजरी गुरुवार साइंकाळी.

श्रीनिवास

अखबार पुरंदर अज इ॥ छ २७ मोहरम लगायत छ ३० माहे मार सन ११९० हिजरी मंगळवार फालगुण शुध. करनल इपटैण छ २६ माहे मारीं स्वार होऊन हुजूर जावयाचे उदेशें कूच करून गेले हें वर्तमान पूर्वील पत्रावरून श्रुत जाहलें असल.

कैलासवासी नीलकंठराव पुरंदरे यांचे दत गृहीत कन्येचा विवाह भीमराव पानसे यांचे बंधू जयवंतराव पानसे यांचे पुत्रासीं जाहला. पुरंदरे मार यांचे सरदारीचें व घरचें काम रा॰ सखारामपंतबापूचे विद्यमानचें याकरितां छ २७ माहे मारीं गडाहून उतरोन वटेश्वरासमीप येऊन उतरले. छ २८ रोजी देवासमीप राहिले. छ २९ सोमवारीं सासवडीं आपले हवेलीस येऊन उतरले. लग्नाचे समाप्तीनंतर पुन्हा गडास जाणार. राजश्री भीमराव पानसे लग्नाकरितां येणार म्हणोन पूर्वील पत्रीं लिहिलें होते. त्यास कल्याणीसमीप फौज ठेऊन राजश्री पानसे मार छ २७ रोजीं सानोरीस आले. गडास श्रीमंतांचे व कारभाऱ्यांचे भेटीस गेले होते. सांप्रत मंडलीसहित लग्नाकरितां सासवडास आले आहेत.

राजश्री कृष्टणराव बलाळ व गोपाळ नाईक तांबेकर छ २९ माहे मार सोमवारीं पुण्याहून गडासमीप येऊन उतरले. मोरो बाबूराव फडनीस यांजकडील मार पृथक पुर्वणींत लिहिला आहे.

राजश्री हरीपंत फडके यांजकडील सरदारी काहडून मोरोबादादा फडनीसास सांगावी हा निश्चय व वर्तमान प्रसिध जाहलें आहे. याकरितां हरीपंत उदासीन व लोक बहुत बेमुरवत जाहले आहेत. सिबंदीचा

हंगामा फार आहे. रोजमऱ्याकरितां तिघे सिलेदार मुसलमान रा। सदासिवपंत करमरकर गुमास्ते फडनीस हरीपंताचे तैनातीस होते त्यांसी उतर प्रत्योतर करितां सदासिवपंतानीं सख्त उतर केलें यास्तव सिलेदारांनीं तलवारेनें सदासिवपंतास जखमी केलें. च्यार घटका जिवंत होता. त्या उपरि समाप्त जाहला. सदासिवपंतासमागमे येक दोघें कारकून जखमी जाहले म्हणोन यैकिलें. तिघें सिपाही यापैकीं दोघांस जिवें मारलें व येकास धरलें किंवा लपला आहे म्हणोन पुण्याहून काल छ २९ म्हणजे तिसांवें तारखेचे रात्रीस गडास वर्तमान आलें. सिपाही लोकांचा दंगा फार आहे.

छ २९ माहे मारीं रघोजी भोंसले व दिवाकरपंत दिवाण नि॥ भोंसले दोन हजार स्वारानसीं सासवडासमीप येऊन उतरले. छ ३० मंगळवारीं उभयतां कारभारी व श्रीमंतांचे भेटीचा निश्चय होता त्याप्रमाणें छ ३० मंगळवारीं गडाखालें डेरा उभा करून सतरांवे घटकेस श्रीमंतानी खाले उतरांवे हा निश्चय जाहला. रा। सखारामपंतबापूस लग्नाची गडबडी होती याकरितां प्राथःकालीच स्नानसंध्या करून भोंसल्याचे लष्करासमीप गेले. रघोजी भोंसले व देवाजीपंत पुढें इस्तकबाल येऊन भेटले. बालाजी जनार्दन फडनीस इस्तकबाल येतील. श्रीमंतांचे भेटीस जांवें, आपण लग्नाकरितां जातों याप्रमाणें बोलून माघारा आपले घरास गेले. त्यानंतर रा। नाना फडनीस बालाजी जनार्दन पुरंदरे यांचे घरास आहेराकरितां आले. बापूची व त्यांची भेट ते स्थलीं होऊन येकांतीं बोलणें जाहलें. मातोश्री गंगाबाई रजस्वला, याकरितां श्रीमंताचें येणे गडाखालें होत नांहीं. भोंसल्याच्या भेटी राहिल्या. हा निश्चय करून बालाजी जनार्दन भेटीस गेले. सांप्रदायाप्रमाणें भोंसल्यांची व नाना फडनीसाची भेट जाहली. त्याउपरि फडनीस गडास गेले व रघोजी भोंसले कूच करून कोडीत कऱ्हातीरीं जाऊन उतरले.

रामचंद्र गणेश व बाजीपंत व विसाजीपंत वगैरे मिरजेसमीप होते. पनाळेवाले येसाजी सिंद्याची फौज वडगांवी होती. त्यास रामचंद्र गणेश

यांनी दोन तीन कोसी कूच करून गेले म्हणोन वर्तमान आलें. परंतु येसाजी सिंदा रामचंद्र गणेशावर गालब आहे व रामचंद्रपंत बहुत हुशयारीनें व खबरदारीनें राहात आहेत.

परशरामपंत मिरजकर व कृष्टणराव पानसे मुनहलीसमीप आहेत. महमदअली कुमनदान हुबलीसमीप सोळा सतरा हजार फौजेनसीं आहे व खंदक व बातेऱ्या लष्कराचे गिर्दनवाह बांधल्या म्हणोन खबर आली आहे.

रा॥ हरीपंत फडके यांजवर सरदारी कायम न रहावयाची मसलत करारांत आली व याउपरि पंत मा॥रनुलेकडून सरदारीचे कामाची सरबराई घडून येणें बहुत दुस्तर आहे. बहुतकरून मोरो बाबूराव ठरतील. त्यानंतर सिलेदारांची समजावीस होऊन कदाचित चैत्र वैशाखमासीं श्रीमंतांकडील सरदार व फौज कूच करून गेले तर कृष्टणातीरपर्यंत जतील. कृष्टणापार जावयाची शकल दिसत नांहीं. या उपरि जें वर्तमान घडेल तें लिहून पाठवीन हे विनती.

पा॥ छ १७ सफर सन ११९१ हिजरी गुरुवार साइंकाळी मयेदारोगा

श्रीनिवास

पोष्यें हैबतराव गोपाळ सा॥ नमस्कार विनंती उपरि. येथील वर्तमान ता॥ छ १ सफर फालगुण शुध त्रितिया बुधवारपर्यंत वास्तव्य सासवड जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष रघोजी भोंसले पुरंदरासमीप आले व उभयतां कारभाऱ्यांची भेट जाहली व मातोश्री गंगाबाई रजस्वला, याकरितां श्रीमंताची भेट मवकूफ जाहली इत्यादिक वर्तमान लिहून जोगू व सेरी जासूद यांस छ १ किवा छ २ सफर फाल्गुण शुध त्रितिया बुधवारीं सेवेसी रवाना केले ते पावले असतील. त्यानंतर रा॥ कृष्टणरावजीची भेट जाहली. रावजीनीं गोष्ट सांगितली कीं सरदारी विन्हा हरीपंत दुसरा कोण करणार आहे. हरीपंतच सरदारी करतील. मोरो बाबूराव यांचे सम-

जाविसीचा निश्चय सांप्रत राजश्री बापू गडास गेल्यानंतर होईल म्हणोन रावजीचे मुखे यैकिले. राजकी वर्तमान पूर्वील पत्रीं तपसीलवार लिहिलें आहे. सांप्रत विशेष यैकिले कीं रा॰ हरीपंत फडके यानीं पुण्याहून दीड कोस घोरपडीवर होते तेथोन दोन कोस कूच करून तीन कोस खडीमांजरीवर मुकाम केला. थेऊरास जाणार. सारांश कूच करावे म्हणोन केलें. भीमापार जाहल्यानंतर हरीपंत फौजेस घेऊन येतील हा निश्चय होईल. रा॰ रघोजी भोंसले सेनासाहब सुभा यांस मेजमानी मा॰ रुपये ५००० पांच हजार गडाहून आजी नक्त थैल्या पाठवून दिधल्या. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणे हे विनती. पूर्वील पत्रीं सेवकानें रा॰ भीमराव पानसे यांचे जुबानी वर्तमानाची पुर्वणी लिहिली हे सत्य असे हे विनंती.

श्रीनिवास

पु॥ श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. छटू मिरध्याकडील जोडी रवाना करितों म्हणोन मिरधे मा॥र व कृष्टणाजी देवाजीनी सांगोन पाठविलें त्यावरून कागद लिहून सिध केले त्या उपरि त्यानीं जोडी रवाना करणें मवकूफ केली यास्तव विलंब लागला व खांसगत जोडी जोगू व सटवाजी दोघें जासूद सेवेसी विनतीपत्रासहित रवाना केले. इकडील विशेष वर्तमान माधाहून लिहून पाठवीन म्हणोन पूर्वील पत्रांत लिहिलें होतें त्यास प्रस्तुत जोडी स्वामीसमीप पावणार याकरितां विनती लिहितों. राजश्री भीमराव आबा पानसे सखारामपंताचे बहुतच यैक्यतेंत. आबाचे मुखें वर्तमान यैकिलें कीं हरीपंत फडके यानीं सखारामपंताचे बरखिलाफमर्जी वर्तणूक बहुत केली व फौजेंत लोकांच्या बोल्या चितास येतील त्या प्रमाणें केल्या व सेवटीं लोकांचा गवगवा आजीपर्यंत पडला याकरितां बापूनीं हरीपंताचे विषई वैषम्य भाव चितांत आणिला व मोरो बाबूराव यांसीं व हरीपंतासीं यैक्यता नव्हती याकरितां मोरोपंतासीं स्नेह बापूनीं केला व हरीपंताकडे मदारुलमाहामीं व फौजेची यख्तियारी नसावी. सरदार दुसरा करावा, हे तजवीज करून मोरोपंताचे यैक्यतेचें राजकारण करीत आहेत व

बापूचे चितापासून रघुनाथरावदादाची यैक्यता कराव. हरीपंत दादाचे श्नेहाविषई नेषजन आहेत याकरितां मोरोबासीं यैक्यता करून दादाचा श्नेह करावा हे मुख्य मानस बापूचें आहे. या प्रकारचें वर्तमान बहुत रहस्याचें यैकिलें तें सेवेसी विनती लिहिली असे. यजमानाचे सेवेसी व वकारपूर्वकास हेच पुर्वणी वाचून याचा खुलासा व अर्थ विनती करावा. फारसी पत्रांत हा मार लिहिला नांहीं. दुसरा प्रकार मोरोबादादा फौजेची सरदारी कबूल करून यावर्षीं मोंहिमेस जात नांहीत याप्रमाणें मोरोपंताकडील साफ उतर जाहलें. दुसरा कोण ठरतो हें पाहांवें हाहीं मार आबानीं सांगितला. सेवेसी श्रुत होय. वकारपूर्वकाकडून गोष्ट बोलण्यांत येत असलियां युक्तीनें त्यांस विनती करावी कीं सेवकाचं नांव व भीमरायाचें नांव जिवाजीपंत अथवा दुसरे कोण्हासमीपहीं उचार न करावा हे विनती.

पौ छ १७ सफर सन ११९१ हिजरी गुरुवार साईकाळी.

श्रीनिवास

विनती जे पुण्याकडील पुन्हां वर्तमान यैकिले कीं सदासिवपंत करमरकर, गुमास्ते फडनीस यांस ज्या लोकानी मारलें त्यापैकी दोघाचे सिरछेद केले व दोघांचे हात तोडले. सेवेसी श्रुत होय हे विनती.

पौ छ १७ सफर सन ११९१ हिजरी गुरुवार साइंकाळी.

---

**A. R. No. 29.**

२ सफर ११९१ हिजरी
१२ मार्च १७७७

पौ छ १७ सफर सन ११९१ हिजरी गुरुवार साइंकाळी मयेजोडी दारोगा.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना, यथील कुशल ता॥ छ २ माहे सफर मु॥ क॥ सासवड स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणोन

स्वानद लेखन आज्ञा करीत असिले प॥ विशेष. यथील वर्तमान छ २६ माहे मोहरम रोज शुकरवारी विनतीपत्र च्यार घटका दिवस शेष राहाता कर्नेल वकील फिरगी येथून कूच करून गेल्याचे वगैरे वर्तमान लेखन करून सेवेसी छटू मिरधे याजकडील जोडी रवाना केली ते पावोन सविस्तर वर्तमान विदित जाहाले असेल. तदनतर यथील वर्तमान राजश्री रघोजी भोसले मोरेस्वरास जेजुरी पलीकडे साहा कोस आले म्हणोन वर्तमान आले. विदित होये. छ २७ माहे मोहरम रोज शनवार उदईक बापू सिवरात्रेस वटेस्वरास येणार व दुसरे आबा पुरधरे याचे सालीची कन्या राजश्री भिवराव पानसे याचे पुत्रास दिल्ही. लग्न माहे मारी सुध २ येचे आहे. लग्न समारंभ करून उपरातिक बापू गडास जाणार. राजश्री येसाजी सिदे पनाल प्राती आहे त्याजपासी पाच च्यार हजार फौज आहे. त्याचे शहावर राजश्री रामचद्र गनेश आहेत. रामचद्र गनेश याजपासी फौज थोडकी म्हणोन येथून दोन तीन हजार फौज त्याजकडे पाठविणार. येसाजी सिद्यानी त्या प्राती बहुतच उपद्रव माडला आहे. या अर्थी फौज आनिख पाठविणार. पाठविल्यावर लेखन केले जाईल. शृत होये. हरीपताचे लस्करचे वर्तमान येथे आले की तमाम लाहान मोठे सरदार पाटनकर व घोरफडे व निबालकर वगैरे मिलून हरीपताचे डेऱ्यास गेले. हरीपतासी जाबसाल केला की पुन्याजवल कोठवर बसावे. वैरन वगैरे मिलत नाही. सरकारातून पैका मिलत नाही. तुम्ही तो गोड बोलून आजची उद्यावर करिता. नाहीतो आम्हास आज्ञा द्यावी. दुसरे, आमचे देन्याचे फडचे करून द्यावे याप्रमाणे सरदार व सिलेदार वगैरे यानी जाबसाल केला त्याजवरून हरीपतानी उतर केले की काही तुम्हाविशई धन्यासी जाबसाल करीत नाही यैसा प्रकार नाही. तुम्ही व आम्ही कूच करून धन्याकडे जाऊ. उभयेता कारभाऱ्यास समजाऊन सागून बदोबस्त करून घेऊ. प्रस्तुत स्वारी करणाटक प्रातची आहे यैसी भवति न भवति हरीपतासी व सरदार वगैरे यासी जाली. त्याजवरून हरीपंत कूच करून येथे कारभाऱ्याजवल येणार. कारभाऱ्याजवल येऊन जाबसाल करून उपरातिक कूच करून सिधटेकापावेतो जावे यैसी वंदता आहे.

मग येविशई काये निश्चये ठैरल तो सेवेसी लेखन केले जाईल. परतु हरीपतांचे येथे येणे व कूच होणे हे दीर्घसूत्री आहे. दुसरे भोसलेही येका दो दिवसा येथे येणार यैसे आहे. शृत होये. छ २८ माहे मोहरम रोज रविवार दीड प्रहर दिवस येता सिवरात्र म्हणोन राजश्री बापू बटेस्वरास आले. रात्री तेथेच राहिले. दुसरे दिवसी भोज्यन करून सासवडास आले. माधवराव निलकठ याचे वाडचात जाऊन देव-देवक बसविले. उदईक भीवराव पानशाचे यथील लग्न येणार. राजश्री बापू पाच च्यार दिवस लग्नप्रसगास राहिलें. लग्नप्रसग जालिया उपरातिक गडास जाणार. शृत होये. हौलकराकडील पेशकसी बा। दाहा लक्ष रुपये द्यावे यैसा करार ठैरला. यैवज हरीपताकडे देविला आहे. त्यापैकी दो ती लक्षाची निशापत्री जाली आहे. श्रुत होये. छ २९ माहे मोहरम रोज सोमवार राजश्री रघोजी भोसले सासवडास दाखल जाले. समागमे फौज दोन अडीच हजार आहे. देवाजीपंत चोरघोडेही समागमेच आहेत. उदईक कूच करून गडाखाले भिवडी व कोडीत या मैदानीत राहाणार. शृत होये. च्यार सा घटका दिवस शेष राहाता राजश्री कृष्णराव बलाल पुन्याहून पुरदरास आले. आपले डेऱ्यास न जाता तैसेच गडावर नानाचेभेटीस गेले. नानाचा व राव मा।र याचा खिलवत दोन तीन घटका रात्रपूर्व पावेतो जाला. उपरातिक राव मा।र आपले डेऱ्यास आले. शृत होये. सध्याकाली राजश्री भीवराव पानसे याचे लग्न सासवडास आले. वराचे श्रीमतपूज्यनास गावातून बापू व बज्याबा वगैरे गेले होते. श्रीमतपूज्यन जालिया बापू आपले घरास आले. बज्याबा वरास व भीवरावजीस समारंभे करून जानवशास प्रहररात्रपूर्व जाता घेऊन आले. उदईक लग्न मगलवारी सुध द्वितीयेस चवदावे घटकेस दिवसा आहे. शृत होये. राजश्री बालाराव सिद्याकडील यासी कारभारी जाबसाल करितात की होलकरानी पेशकसी बा। दाहा लक्ष रुपये दिल्हे. त्याप्रमाणे प्रस्तुत तुम्ही दाहा लक्ष रुपये द्यावे. अद्याप निश्चयात आले नाही. सिदे आलियावर निश्चये काये होणे तो होईल. श्रुत होये. राजश्री हरीपताजवल सदासिवपंत करमरकर फौजेचे फडनीसीचे कामावर होते. त्यास कुदबी साहेबाचे पुत्राकडील

पाच च्यार बारगीर रोजमुरा मागावयास सदासिवपंत फडनीस याजकडे गेले. ते बारगीर रोजमुरा मागू लागले. बारगीर मुसलमान होते. सदासिवपंत त्यासी धड जाबसाल करीनात. काही बारगीरास न्यून्यपूर्ण बोलले त्याजवरून त्या बारगीरानी सदासिवपतास कटारीने जेवच मारले. लस्करात येक गुल जाला. ते बारगीरही तेथेच हरीपताचे लोकानी जिवे मारिले. सिबदीचा गवगवा हरीपतावर बहुत आहे. हरीपताचे कूच होत नाही. शृत होये. छ १ माहे सफर राज मगलवार राजश्री भीवराव याचे पुत्राचे लग्न चवदा घटका दिवसात लागले. प्राथःकाली च्यार घटका दिवंस येता बापू रघोजी भोसले याचे भेटीस गेले होते. भेटेउ घेऊन बापू घरास आले. दीड प्रहर दिवस येता नाना गडाहून भोसल्याचे भेटीस आले. भेट घेऊन भिवराव याचे येथे लग्नास आले. लग्न लाऊन मागती नाना गडास गेले. भोसले माार यानी सासवडाहून कूच करून कोडीतावर मुकामास गेले. श्रीमताची व भोसल्याची भेट येका दो दिवसा होणार. शृत होये. राजश्री कृष्णरावजी गडाहून बापूचे भेटीस सासवडास आले होते. बापू निलकठ माहादेव याचे वाड्यात लग्नात होते. बापूचा व राव माार याचा सध्याकाल पावेतो खिलवत जाला उपरातिक रावजी गडाखाले आपले डेऱ्या

(अपूर्ण)

---

**A. R. No. 30.** १६ सफर ११९१ हिजरी
२६ मार्च १७७७

अखबार अज इ।। छ ९ सफर लगा (का. फा.) सन ११९१ हिजरी

रो हरी बलाळ फडके यांस श्रीमंत पंतप्रधाना (का. फा.) जाहली जे होळकरा बाा रुपये दाहा लक्ष फौजेस रो(का.फा.)ऊन कूच दर कूच जाणें त्याजवरून पंत माार यानीं लोंकास रोजमऱ्याचा यैवज देऊन कच करून भीमातीर सिधटेंकास गेले. आजी छ मारीं

सिधटेंकीहून कूच करून पंढरपुरापर्यंत जाणार म्हणोन वर्तमान यैकिलें. कृष्टणराव बळवंत अद्यापीं पुणें व सासवडीं आहेत. त्यांचे जावयाचा निश्चय नांहीं. रा॰ दिवाकर पुरुषोतम नि॥ रघोजी भोंसले हरीपंताचे भेटीस छ ९ माहे मारीं गेले होते. छ १० रोजीं हरीपंतानी ज्याफत करून वस्त्रें देऊन रुखसत केलें. पुन्हां पुरंदरासमीप सैन्यास आले.

छ १२ सफरीं रघोजी भोंसले व दिवाकर पुरुषोतम गडावर श्रीमंताचे दर्शनास गेले होते. श्रीमंतांनी भोजनांचें आतिथ्य केलें. बापू व नाना व भोंसले व दिवाकरपंतांसी दोन घटका येकांत जाहला. त्याउपरि भोंसले निरोप घेऊन डेऱ्यास आले. छ १५ माहे मारीं रघोजी भोंसले व मुतसदीमंडली तमाम (का. फा.) स श्रीमंताचे सूचनेप्रमाणें भोजनास गेले होते. भोज(का. फा.)जी जनार्दन फडनीस व बाबूराव वकील व दिवाकर (का. फा.) टका येकांती बसले होते. गंगथडीस घांसद(का. फा.)आज्ञा द्यावी म्हणोन भोंसले. . . . . . . . . . . .
कोल्हापूर प्रांती जावें याप्रमाणें (का. फा.)स आहे. सिंदे मार पेडगांवास येणार होते. तुकोजी होळकर पुण्यांत आहेत.

परशरामपंत व कृष्टणराव पानसे मुरंबासमी (का. फ़ा) मद अली कुमनदान हुबलीसमीप आहे. पर्जन्य का(का. फा.)मार्गप्रतीक्षा हैदरनायकास व परशरामपंतास आहे. मृग प्रवेशानंतर परशरामभाऊस कुमक न गेलियां कृष्टणापार राहात नांहींत व हैदरनाईक शानूर प्रांती येणार. याउपरि जें नवल विशेष वर्तमान होईल तें लिहून पाठवीन हे विनती.

पौ छ २९ माहे सफर मंगलवार सन ११९१ हिजरी, अडीच प्रहर.

श्रीनिवास

पोष्यं हैबतराव गोपाळ सां॥ नमस्कार विनती उपरि येथील वर्तमान ता॥ छ १६ सफर फालगुण वद्य त्रितीया बुधवारपर्यंत मा॰

सासवड स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वीं छ ९ माहे मारीं विनतीपत्र हुजूरचे अर्जीचेसहित पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्याउपरि इकडील ताजें वर्तमान पृथक पत्रीं लिहिलें आहे त्यावरून विदित होईल. रा। हरीपंत फडके यांचे जाण्या (का. फा.) बहुत उत्पन्न जाहला होता. परंतु मोरो बाबूराव फडनीस यांनी मोहिमेस जाणें अंगीकार केला नांहीं व हैदरनायकाचें पारपत्य व त्याजवर दाब फौज गेल्या वितरित्क पडत नांहीं व रा। जिवाजी रघुनाथ यांचीं पत्रें वरचेवर आलीं कीं हरीपंताची रवानगी सत्वर करावी याविषईं हुजूरची आज्ञा आहे त्याजवरून येथील कारभाऱ्यांचे सूचनेनुरूप रा। हरीपंतानीं थेऊरचे मुकामीहून कूच करून मजल दरमजल सिधटेक भीमातीरास गेले. तेथोन पंढरपुरास जाणार. प्रस्तुत हरीपंत स्वतंत्र जाहले आहेत. श्रीकृपेकरून फौज फेरोजीसीं येकत्र होतील यैसें वाटतें. अमलांत येईल तें सत्य. हुजूरचा इनायतनामा अंताजी भगवंत याचें कर्ज गोंदीचे पाटलावर आहे. त्याचा रोखा व करारमदार जाहला असतां पाटील रुपये देत नांहीत याकरितां येथील मदारुलमहामास सागोन पाटलास ताकीद करून रुपये देववावे म्हणोन आला होता. त्याप्रमाणें रा। कृष्टणरावजी व उभयतां कारभाऱ्यांस वर्तमान सांगितलें व रा। जिवाजीपंतानीं रावजीस सविस्तारें लिहिलें होतें. याचें उतर येशवंत गंगाधर नि॥ होळकर यांचे सागितल्याप्रमाणें बापूनीं केलें कीं आसल रुपये पांच सातसें बाकी राहिली आहे. साल गु॥ जबरदस्ती करून पाटलांपासून कबुलीयत लिहून घेतली आहे तरी वाजबी मनास आणून फैसला करावा. वाजबीचे रुयीनें जे रुपये निघतील ते गांवकरास ताकीद करून देऊं. याच अन्वयानें कारभाऱ्यांनीं हुजूर अर्जी पाठविली आहे. पुन्हां हुजूरची आज्ञा येईल त्याप्रमाणें अमलांत आणतील. दुसरा हे (का. फा.) जूरचा निर्णय वगैरे माहाल जागीर मुबारुजुलमुलुक बहादर येथील चौथ व सरदेशमुखी व बाबती व साहोत्रा माफ करून माफीची सनद श्रीमंत पंतप्रधानांची पाठवावी. माफ करण्यांत बहुत नुकसानीं जाणून न करतील तरी ममता करून

पाठवावा. त्याप्रमाणें रुपये सरकारातून देऊं या मारिाचा व कृष्टणराव बलाळ यांस इनायतनामा सादर जाहला त्याची नकल व मुबारुजुल-मुलुक बहादरानीं आपलें पत्र सेवकास छ २८ मोहरमचें पाठविलें तें आजी छ १६ माहे मारिीं रो गोविंदराव भगवंत नि॥ कृष्टणराव बलाळ यानीं पावतें केलें त्यास रो कृष्टणरावजी बारामतीस गेले आहेत. रो बाबूजी नाईक यांचे प्रकृतीस स्वस्थता जाहली. रावजी सत्वर येतील. सेवक उदईक गडास जाऊन बापू व नानास वर्तमान सांगोन कृष्टणरायांचे इनायतनाम्याचा मारिार श्रुत करितों. श्रीकृपे-करून रावजी आल्यानंतर कार्य होईल. सांप्रत हुजूरीत व मकार-पूर्वकास अर्जी व पत्र पाठविलें तें वाचून.

( अपूर्ण )

---

**A. R. No. 31.** (पो. ता.) ४ रबिलाखर ११९१ हिजरी
१२ मे १७७७

पा। छ ४ रबिलाखर सन ११९१ हिजरी सोमवार येक घटिका रात्रीस.

श्रीनिवास

पु॥ श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी, विनतीजे, मौजे मदनूर वगैरे पा कौलास जागीर सेवकाची, येथील च्याहारुम विषईं तकयुद फार आहे, व स्वामींनी हुजूरांत सेवकाचे विषईंचा मारिार अर्ज केला, व बहुता दिवसाची बाकी राहिली म्हणोन आज्ञा केली, त्यास स्वामीनीं येकदां मजला सांगितलें होतें कीं च्याहारुमचा तकाजा आहे. माफ करून घेणें. परंतु ते समईं प्रधान होते, याकरितां उपेक्षा जाहली. सांप्रतचा प्रकार तर मदनूर वगैरे गांवचा रुपया तनख्या-प्रमाणें समग्र येतो. त्याजवर प्रपंचे चालतो. निळें वगैरे गांवा-पासून गतवर्षी तेरासे रुपये आले. सालहालीं काय वसूल येईल तो आखर सांली कळेल. श्रीमंताकडून स्वामीनीं पैठण परगण्यात

गांव देविला आहे. तथील पांच सातसें रुपये गत वर्षी आले. त्यापैकीं दोन तीनसे रुपये खर्चून जरूरी दिखाऊ एकदोन वस्त केली, व वरकड रुपये सासवडीच खर्च जाहले. सांप्रत तरी त्रिवर्ग चिरंजीव व भाचा व जामात व कन्या व स्त्री व शालक व वैदिक ब्राह्मण व पाकांचा व उदकाचा ब्राह्मण इतका समुदाय पंक्तीस भोजनाचा. यावितरिक्त ती।। आनंदरावजीचा पुत्र व मुकुंदराव येशवंत बीडकर रोजगाराचे तलाशास आले ते येथेंच आहेत, याविरहित शूद्र मनुष्यें येणेप्रमाणे आहेंत. तीर्थरूप राजश्री नानास्वामी माघमासी खेडास गेले. कनिष्ठबंधु सहकुटुंब खेडीं व मध्यम बंधु सहकुटुंब मदनूरीं येणेंप्रमाणें तीन स्थलीं खर्च आहे. सौ।। वती मातोश्री व चिरंजीव रघोतमरावदादाची स्त्रीस आणविले आहे. ते येणार. जगत्कुटुंबी श्री स्वामी तो सर्वांचा निर्वाह करितो, परंतु बाहृचात्कारें यजमानाचे परवरसेवर अन्नवस्त्राचा निर्वाह होतो. मदनूर वगैरे गांवची च्याहारुम माफ व्हावी याविषई स्वामीनीं अर्ज केला व मी अर्जी व येक खुष्क फर्द मोहरी सेवेसी पाठविला आहे. तो पावला असेल. हे उपाय मात्र आहेत, कृपा करणें यख्तियार यजमानसाहबाचा. मनसब असल व इजाफा पांचसदी आहे. त्या हिशोबीं कांही तलबहीं बाकी निघते. त्या यैवजांत च्याहारुम इनायत व्हावी किंवा कृपा करून माफ करावी. स्वामीचा यत्न न चाले व यजमानाची मर्जी नसल्यास सर्वस्वें जागीर व मीं आपले शरीरें करून यजमानाचा आहे. जे आज्ञा करतील ते सर्वस्वें मान्य व च्याहारुम किंवा दरोबस्त जागीर मागतल्यास संतोषासच कारण. ज्याचें देणें त्यानें नेल्यास खेद किमर्थ? परंतु माघील तकाज्यास सर्वथैव उपाय नांहीं. समग्र जागीर सोडून तीर्थयात्रेस जाणें प्राप्त होईल. पुढें मागतील तर त्यास उपाय आहे. च्यार रुपयाचें वस्त्र घेत होतें ते दोन रुपयाचें घेऊन कालहरण करूं. यांत भूषण व कीर्ती यजमानांची आहे. सारांश हा सर्व अर्थ वकारपूर्वकासहीं सांगावा. स्वामीचे यत्नास जे साध्य होईल ते करावें. कुटुंबातील गणना, तेव्हां घरचे सर्व वर्तमान कळलें पाहिजे म्हणोन लिहिलें असे. कार्तिक मासापासून स्मार्त

सिंध केलें आहे. प्रपंच आटोपाया योग्य स्त्रीची प्रौढ (पुढील एक अक्षर अस्पष्ट) नांहीं. जेष्ठ श्नुषा आल्यानंतर तिची परीक्षा कळेल.

२

पु।। श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी, खेड व बीड प्रांती दीड मण किंवा सवा मण म्हणजे मापी सोळा वीस पायल्याची धारण, व सासवड पुण्यांत पांच साहा पायल्या त्रिगुण (का. फा.) अंतर पडतें. खर्च भारी. इतके समुदायाचा निर्वाह होणें बहुत कठीण. परंतु च्यार वर्षे समाप्त होऊन पांचवें लागलें. लेंकी व सुना व बंधूची भेट नांहीं. याकरितां येथें आणवणें प्राप्त जाहलें. वर्षास येक महिना घरास जावयाची परवानगी जाहलियां फार उपयोगी. परंतु गतवर्षी स्वामीनीं यजमानास अर्ज केला व त्यांनी आज्ञा दिधली नांहीं. पुन्हां विनती किमर्थ करावी? सेवा म्हणजे शरीराचा विक्रय त्यास उपाय काय? राजश्री कृष्टणाजी देवाजी स्वामीचे आज्ञेप्रमाणें लग्नाकरितां गेले आहेत. व त्यांचा गुमास्ता येथे आहे. याजप्रमाणें मजला सोडणूक असती किंवा होईल तर फार उपयोगी. सारांश यजमानांचें अन्न भक्षून त्यांचे सेवेत येकनिष्ठ राहिल्यांत सर्व सुख व भूषण आहे. या निश्चयावर येक सेवा मुख्य करून, इतर सुख याचे योगें जाणून निश्चित व संतोष वृतीनें आहे. सविस्तारें वर्तमान स्वामीस विदित आहे. पुन्हां ध्यानारूढ व्हांवें याकरितां विनती लिहिली आहे. बहुत काय लिहिणें हे विनती.

पौ छ ४ रबिलाखर सन ११९१ हिजरी सोमवार यक घटिका रात्रीस.

श्री

विनतीजें हरकाऱ्याचे तनख्याविशंई हुजूरचा इनायतनामा राजश्री नारायणराव बापूचे नांवचा येईल. परंतु परस्परेंही त्यास आज्ञा ल्याहंवीजें जासूदांची तनखा माहबमाह देत जाणें, हे विनती,

रामजी जासूद दुर्गादासासमीप आहे तो येक मास राहिला असेल. त्यास तलब पावली. त्याचा हिशोब माघाहून लिहून पाठवितों हे विनती.

पौ छ ४ रबिलाखर सन ११९१ हिजरी सोमवार येक घटिका रात्रीस.

---

**A. R. No. 32.** ( पो. ता. ) ४ रबिलाखर ११९१ हिजरी
१२ मे १७७७

पौ छ ४ रबिलाखर सन ११९१ हिजरी, इंदुवार मये नागोनाथ

श्रीनिवास

श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी.

पोष्य हैबतराव गोपाळ सांा नमस्कार विनती उपरि. येथील वर्तमान स्वामीचे कृपे करून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. राजश्री नरसिंगराव खटांवकर जागीरदार सरकार आलीचे, व प्राचीन मनसबदार उमदे खानदानचे, त्यास पेशव्यांकडील सरदाराचे उपद्रवाकरितां तीन चार वर्षें बहुत पेंचात आले. राजश्री भीमराव आबा पानसे यांचे शरीरसंमधी , याकरितां आबानीं बहुत साहित्य केलें व करीत आहेत. सांप्रत हुजूरीहून नजरेचा तगादा रो नरसिंगराव यास लागला आहे. प्रथमतां येकदां नजर घेतली आहे. जागीरीचा बंदोबस्त असतां व चाकरीस हाजर नसते तरी तगादा लागावा. या अर्थी आबानीं स्वामीस पत्र लिहिलें आहे व मजला बहुता प्रकारें सांगितलें कीं नरसिंगरावजी बहुत पेंचात आहेत. यांजविषई जे साहित्य स्वामीकडून होईल तें करून हुजूरीहून नजरेचा तगादा न लागे. तो अर्थ जाहला पाहिजे म्हणून त्यास आबाचा व स्वामीचा स्नेह अकृत्रिम. त्या अर्थी राजश्रीचे साहित्याविषईं जो प्रयत्न तो स्वामीकडून अमलांत येईल, विशेष काय लिहिणें, हे विनती.

---

**A. R. No. 33.** २४ रबिलावल ११९१ हिजरी

२ मे १७७७

पाौ छ ११ माहे रबिलाखर सोमवार सन ११९१ हिजरी. खासगत जासूदाचे जोडीबराबर सा घटका दिवस येताना.

श्रीनिवास

पोष्यं हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान ता।। छ २४ रबिलावल चैत्र वद्य येकादसीपर्यंत, वास्तव्य सासवड, स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून, स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ १८ माहे माारीं भिवजी धोंडोजी जासूदांसमागमें विनतीपत्र हुजूरचे अर्जीसहित पाठविलें तें पाऊन वर्तमान सेवेसी श्रुत जाहलें असेल. सांप्रत स्वामीकडील पत्रें सेवकाचे पत्राचे रसीदीची हुजूरचे इनायतनाम्यासहित, जटचरल्याचे मुकामचीं, छ १ रबिलावलचें व छ ११ रबिलावलचं पाठविलें तें छ १६ व छ २४ रबिलावलीं पाऊन सविस्तारें वर्तमान कळलें. यापूर्वी येक जोडी शंकराजी व सेटी राऊत जासूद जोडी छ ९ सफरीं येथील अखबार व विनतीपत्रासहित रवाना केली, ते स्वामीसमीप पावली किवा न पावली? ते जासूद परतोन येथें आले नांहींत. ठिकाणदार आहेत त्यांचे घरीं शोध घेतला, घरीं नांहीत, त्यास ईश्वर क्षेम कर्ता! पत्रें हुजूर पावली नांहीत. खबर फौत जाहलियाविषई सेवक लाच्यार आहे. सांप्रत छ ११ रबिलावलचे पत्रीं माार होता कीं रो नारायणरावजी यांस इनायतनामा जासुदांचे तनख्याविषई पाठविला आहे व रावजी बहुत रसिक आहेत, माहबमाही रुपये देतील. आज्ञेप्रमाणं परवान्याची नकल व इनायतनाभा रावजीकडें पाठऊन दिधला. कबजहीं लिहून पाठविलें आहे. राजश्री भीमराव आबाची पत्रें पाठविलीं ते अवलोकन करून लिफाफियास गोंद लाऊन जिवाजीपंतनानास पत्र पावतें करावें. त्यांचा माार तपसीलवार लिहिला आहे. स्वामीचे नांवं व सेवकांचें नांवेंही रुपये आबानी देणारास दिधले. परंतु समग्र रुपये खग्रास जाहले आहेत. राजकी विशेष वर्तमान मुख्तसर मुसारे सिवालियर सालूबे फरासीस

छ २२ रबिलावलीं पुरंदरासमीप येऊन उतरला. भीमराव पानसे इस्तकबाल गेले होते. श्रीमंताचे कारभाऱ्यांची व फरासीसाची भेट उदईक छ २५ रोजीं होणार. रघोजी भोंसल्यांचे डेऱ्यास श्रीमंत पंतप्रधान आले आहेत. बहुमान जवाहर व वस्त्रें सर्वत्र मंडलीस अपूर्व दिधलीं. छ २६ रोजी रघोजी भोंसले श्रीमंताचा निरोप घेणार व जेउरीं श्री देवीदर्शन घेऊन नागपुरास जाणार. देवाजी पंताचे राहावयाचा गुता राहिला नांहीं. माष्टी वकील येथेंच आहे. फरासीस त्याजवर दडपण आणले आहेत. सविस्तारें वर्तमान अखबारेंत लिहिलें आहे. यजमानसाहबांस व वकारपूर्वकास विनती करावी. बहुत काय लिहिणें. हे विनती.

-----

पौ छ ११ माहे रबिवलाखर सोमवार सन ११९१ हिजरी.

श्रीनिवास

पु॥ पत्र श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी.

विनंती जे छ २५ माहें रबिलावली मुशोर सिवालीयेंदे सालुबें फराससीसाकडील येंलची याचे भेटीस्तव राजश्री सखारामपंतबापू व बाळाजी जनार्दन गडाहून उतरोन त्रितीय प्रहरीं गडाखालें डेरा उभा आहे त्या स्थळास आलें. त्या उपरि संकेताप्रमाणें फरासीसही डे-यास आला. रा॰ कृष्टणराव बलाळ व रा॰ माधवराव सदासिव वगैरें मंडली आली होती. परस्परे भेटी होऊन बेच्योब्यात उभयता कारभारी व माधवराव सदासिव कृष्टणराव बलाळ व फरासीस सरदार व दोघे दुभासे खलवतेस बसले होते. च्यार घटका येकांत करून अतर पानदान देऊन रुखसत केले. उपरांतिक बापू नाना गडास स्वार होऊन गेलें व फरासीस आपले डेऱ्यास आला. खलवतेतील मार अद्यापीवर कळला नांहीं. शोध घेऊन माघाहून लिहून पाठवीन.

छ मारी रा॰ रघोजी भोसले सेनासाहेब सुभा रा॰ भीमराव आबा पानसे यांचे घरास सोनोरीस भोजनास

दाहा वीस लोकासहित गेले होते. राजश्री भीमराव यानीं भोसले मार यांस पैठणी शेला पागोटे बेश किमती व येक सिरपेंच मुरसा दिधला. समागमीचे मातबर सिपाई लोकास पैठणी शेला पागोटी मध्यम प्रतीची पाच असाम्यास दिल्ही. भोजनास बेवीस आसाम्या गेल्या होंत्या, भोजनोतर अतर पानदान घेऊन भोंसलें आपले डे-यास आले. सेवेसी श्रुत होये. फरासीसाचे भेटीचा मार ल्याहावयाकरितां येक दिवस जासूद जोडी राहिली. आजी छ २५ माहे मारी सेवेसी रवाना केली आहे हे विनती.

-----

पौ छ ११ माहे रबिलाखर सोमवार सन ११९१ हिजरी.

श्रीनिवास

पु॥ पत्र श्रीमंत राजश्री नानास्वामीचें सेवेसी, विनतीजें. विठलराम यानीं श्रीमंताकडून सरदेशमुखी व बाबती वगैरें मामलती केल्या आहेत, व पांढरें यांचे तालुकियाची जत्फीही होती. हुजूरांतून सरगराचे तालुकियाची जत्फी अजीमुदौला बाहादर यांजकडे जाहली आहें. यास्तव बाहादर मवसुफ पालिब वगैरे तालुकियांत आलें. सरगरांचे कारभारी यांचे दरखास्तीप्रमाणे रोज साडे पांचसे रुपये कबूल करून मदतीस विठलराम आलें. मार्गीं येताना मौजे झोलपिंपरी पा पालिब हा गांव नवाब शर्फदौला बाहादरानीं चिंरंजीव राजश्री कृष्टणराव दाजी यांचे तनख्यात दिल्हा आहें. पिंपरी सेवकाकडील गांव जाणून विठलरामजी कांहीं इलाका नसतां तीनसे रुपये मौजे म॥रापासून घेतलें. तीर्थरूप नानास्वामीनीं पत्र पाठविलें असतांही यैकिले नांहीं. यास्तव तीर्थरूपजीनीं वर्तमान मजला लिहिलें. सेवकाने राजश्री कृष्टणरावजीस व श्रीमंत राजश्री बापू नानास श्रुत केले. त्याजवरून उभयतानीं श्रीमंत पंतप्रधानस्वामीचे पत्र प्रखर देविले आहे कीं सेवकाकडील गांवापासून जे रुपये घेतले असतील ते माघारा देणे. व राजश्री रावजीनीं तों बहुता प्रकारें प्रखर लिहिले

आहे. परंतु राजश्री रावजी म्हणत होते कीं विठलराम हुजूर जाणार यास्तव विनती जे. याजविषई जे विठलरामास आज्ञा करावयाची असेल ते करावीं. श्रीमंताचा दस्तावेज सेवकासमीप आहे. आज्ञा जाहलियां सेवेसी पाठऊन देईन. विठलराम हुजूर जाईल म्हणोन नाना फडनीस व कृष्टणरावजीनीं सांगितलें त्यावरून विनती लिहिली असे. हे विनती.

विठलरामाचा मार राजश्री जिवाजीपंतनानास लिहून पत्र लिफाफा खुला पाठविला असे. व रहमायारखानाचा सिलसिला असावयास्तव त्याजला सदैव पत्रें लिहितों. सांप्रतचे पत्रीं तुमचे पत्राचें उतर येत नांही म्हणोन लिहिलें आहे हे विनती.

-----

पौ छ ११ माहे रबिलाखर सोमवार सन ११९१ हिजरी.

श्रीनिवास

पु।। श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी, विनतीजे, राजश्री भीमराव पानसे यांचे दुमोहरी सनदेचा मार स्वामीनीं लिहिला होता कीं विन्हा पेशकस बादशाही सनद व जमीनीची सनद होत नांही हा मार भीमराव आबास तपसीलवार सांगितला. त्यास येथील मार आबांनी तपसीलवार सांगितला, व मजला शफतपूर्वक सांगितलें की याची प्रसिधता न व्हावी. व स्वामीस विनती करून पेशकसीचा यैवज हुजूर घ्यावा. व सनद सिध करून पाठवावी. त्यास मजला जें वर्तमान कळलें तें स्वामीसच कळल्याप्रमाण. आपले चक्षू व श्रोत्र दोन्हीं इंद्रियें सेवक. यास्तव यैकिलें वर्तमान सविस्तारें लिहिलें असे. स्वामीनीं या पक्षीचे मंडलीसमीप किमपी उदगार न करावा. येथोन दरबार खर्च/व नजर पेशकसीचा यैवज अकरा हजार रुपये भीमरायानी दिधले. त्याचा तपसील हुजूर नजर पेशकसी बा व

दरबार खर्च--

२००० नजर हुजूर　　४००० श्रीमंताकडील मुतसदी

३००० दरबार खर्च हुजूरचे मुतसदी　　२००० मध्यस्त

　　२००० रायरायाजी　　१००० वकील श्रीमंत

　　१००० रायनानकराम　　५०० गकारपूर्वक

　　३०००　　५०० हैबतराव गोपाळ

　　२०००

५०००　　६०००

११०००

सदरहू रुपयाची नक्त निशा भीमरायानीं दिधली. व कृष्टणराव-जीनीं आबासीं नेम केला आहे कीं तुम्हीं निश्चित राहणें. दुमोहरी सनद आणून देवितों. दरबारी खर्च आमचे चितास येईल त्यास देऊं व करूं. याप्रमाणें उतर करीत आहेत. आबानी मजला सागितलें कीं दोन हजार रुपये पेशकस हुजूरची घेऊन सनद सिध करवावी. जि़वाजी रघुनाथ रुपये देतील याप्रमाणें वर्तमान सांगितलें. व येथील मुतसद्यांचे नांवं बहुत श्रमी. परंतु उपाय नांहीं. याकरितां कांहीं उच्चार करीत नांहींत. सांप्रत पूर्वील सनदेच्या नकला खास मोहरी व दुमोहरी व कयफियत व स्वामीस व जिवाजीपंत व नागोपंतास येकून तीन पत्रें मजकडे पाठविलीं. व पत्रें वाचून लाखोटे करून पाठवणें म्हणोन लिहून पाठविलें. त्यास सेवकानें जिवाजी-पंताचं पत्र खुलंच पाठविलें आहे. अवलोकन करून गोंद लाऊन जिवाजीपंतास पावता करावा. येथील मंडली आबारी सगट हाती गिळणार हें स्पष्ट आपणास विदित आहे. शूचनार्थ विनती केली असे. बहुत काय लिहिणं हे विनती.

----

पौ छ ११ माहे रबिलाखर सोमवार सन ११९१ हिजरी.

श्रीनिवास

अखबार पुरंदर अज इ॥ छ १८ माहे रबिलावल सन ११९१ हिजरी लगायत छ २४ माहे मार सन ईले शनिवार राजश्री सखाराम-

पंत बापू सासवडास श्राधाकरितां आले होते. छ १९ व छ २१ तीन दिवस होते. त्या उपरी छ २२ रोजीं पुन्हां गडावर गेले.

फरासीसाकडील येलची मुशारे सिवालियदे सालुबे छ २२ माहे माार गुरुवारीं पुरंदरास येणार, यास्तव श्रीमंत पेशव्यांचे आज्ञेप्रमाण भीमराव पानसे इस्तकबालास गेले होते. फरासीस मााराची भेट जाहल्यानंतर भीमराव व भीमरायाचे बंधु चिमापास वस्त्रें च्यार पारचे प्रमाणं देऊन उभयतां समागमें आले. सासवडाचे व पुरंदराचे मध्यें अंबराईत डेरे दिधले होते. ते स्थलीं फरासीस माार येऊन उतरला, कारभाऱ्यांचे व श्रीमंताचे भेटीस मुहूर्त सापेक्ष याकरितां दोन तीन दिवस भेटी राहिल्या. रघोजी भोंसले सेनासाहब सुभा यांचे डेऱ्यास श्रीमंतानी यांवें, हा मनोदय भोंसले मााराचा होता, यास्तव छ २२ माहे माार गुरुवारी त्रितीय प्रहरीं श्रीमंत पेशवे मातोश्री वितरिक्त गडाहून स्वार जाहले, नाना फडनीस वगैरे समागमें होते रा॥ सखारामपंत वगैरे मंडली सासवडाहून परस्परें भोंसल्याचे डे-र्यास गेले. पांच घटका दिवस राहतां श्रीमंताची स्वारी भोंसल्याचे लश्करासमीप आली. रघोजी भोंसले घोडयावर स्वार होऊन इस्तकबालास गेले. श्रीमंत पालखींत स्वार होते, भोंसले मााराचा पालखींतून हात धरून डेऱ्यापर्यंत आले, पसीना वगैर येण्याचे अयासाकरितां बेचोब्यांत अर्ध घटका विश्रांत करून सदरेस येऊन बसले. समागमें तमाम मुतसदी व सरदार होते. नाच व कवालांचे गायन व अरायश मजलसी बहुत चांगली केली होती. नदीचे कांठी आंब्याचे झाडाखाले डेरे उभे केले होते.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | श्रीमंत पेशवे | १ | माहदाजी नीलकंठ पुरंदरे |
| १ | सखारामपंत | १ | राघो लक्ष्मण पुरंदरे |
| १ | बालाजी जनार्दन | २ | कृष्टणराव बलाल मय पुत्र |
| १ | त्रिबकराव मामाचा नातू | १ | धोंडो आपा पुरंदरे |
| १ | गोविंद सिवरामाचा लेक व बंधु | २ | भीमराव पानसे व त्यांचे बंधुसहित |

१ बालकोबा तात्याचा पुत्र
१ त्रिंबकराव चिटनीस
१ नारायणराव मुनसी
१ माहादाजीपंत मुजुमदार
१ बालाजीपंत पोतेनीस
१ जवाहरखान्याचे दारोगे
१ कृष्टणराव बलवंत
२ कृष्टणरायाचे दोघे पुत्र
१ गणपतरायाचे पुत्र

१५

१ मलबा पानसे बक्षी
१ फरासखान्याचे दारोगे
१ मुतबखचे दारोगे जनोबा
१ मोरोपंत भावे
२ भगवंतराव मेडेकर
२ माधवराव सदासिव पितापुत्र

१५

३०

१५ ब्राह्मण मंडली नि॥ श्रीमंत
१५ सुद्र सरदार
१५ नि॥ नाना फडनीस
१० नि॥ सखारामपंत
५० सिलेदार नि॥ श्रीमंत

१०५

४ वकील मंडली
१ हैबतराव गोपाल
१ नारोपंत नि॥ सिंदे
१ नि॥ भवानराव
१ दिगंबरपंत नि॥ जाफरुदौला बहादर

४

१०९
३० किता
११ किता

१५०

सदरहू प्रो मंडली होती. त्यास सर्वत्रां पैठणी मुंडासी मरातबाप्रमाणें सात आठापासून पंचेवीसापर्यंत. व सेले पैठणी आठ रुपयापासून शंभर रुो पावेतो, व किमखाब व मशरू व बऱ्हानपुरी पोषाक व कळसपाकीं व शालजोड्या शंभरपर्यंत सर्वत्रास दिधल्या. सेवकास शालजोडी व पैठणी मुंडासे दिधले. श्रीमंतास व मुतसद्यास वस्त्रांचा व जवाहराचा तपसील १ श्रीमंत पंतप्रधान.

१० पोषाक बादली भरजरी किमत रुा २५०० अडीच हजार.

२ चिरे
२ ज्यामेवार थानें
२ किमखाब बेश किमत विजारा
२ चादर भरजरी
२ शालजोड्या
१०

३ जवाहर मुरसा किंमत रुा १५०००

१ सरपेच
१ कंठी मोतीं व पाचाचे दाणे

सुमार मोतीं, पाच पदक अलमास
२५ १० १
१ लोलक मोती
३७

१ तुरा मोतीयाचा सर १२ दर
सरास मोती सुमारे दाणे ४०

३ हाती छांवा किंमत रुा ४०००
पैकी किमत दोन हजार हो-
तील निमच्या येक कबजा.

सखारामपंत

पोषाक छीटी ब-हानपुरी

२ जामेवार थानें
१ मुंडासे
१ सेला
१ किमखाब थान
१ सरपेच मुरसा
६

बालाजी जनार्दन फडनीस

पोषाक छीट ब-हानपुरी

२ जामेवार थान
१ मुंडासे
१ सेला

१ किमखाब थान
१ सरपेच मुरसा
६

१ माहदाजी नीलकंठ पुरंधरे पोषाक छीटी ब-हानपुर्र
२ जामेवार थान
१ मुंडासे
१ सेला
१ किमखाब
१ सरपेंच मुरसा
६

या वितरिक्त सखारामपंत व बालाजी जनार्दनास हाती देणार म्हणोन यैकिलें. सेवकास सखारामपंत बापूनीं पाचारिले याकरितां गेलों होतों.

श्रीमंत पेशवे येक घटका बसले होते. उपरांतिक स्वार होऊन गडास गेले. त्यानंतर सखारामपंत व नाना फडनीस च्यार घटका बसले होते. सर्वत्रांस वस्त्रें व विडे व अत्तर व पानदान दिधल्यानंतर येक घटका रात्रीस स्वार होऊन गेले. बापू व नाना गडाखाले वरकड समुदाय आपले आपले स्थळास गेले.

फरासीसांचे भेटीस व भोंसल्याचे रुखसतीस मुहूर्ताकरितां तीन च्यार दिवस अवकाश जाहला. फरासीसांची भेट उदईक होणार व भोंसले श्रीमंतांचे रुखसतीस छ २६ रबिलावल सोमवारीं गडावर जाणार. व येथौन कूच करून जेऊरनजीक सातारा तेथें जाणार, तेथोन नागपूरास जातील.

माष्टी तामस नि।। इंगरेज मुंबई पुरंदरासमीप उतरला. मध्यस्तीस माधवराव सदासिव त्यांचे विद्यमाने उतर प्रत्यौत्तर होत आहे. हैदरनायकाचे पारपत्यास इंग्रजांनी शरीक व्हावें व रघुनाथ-रायांस आश्रय न द्यावा हे दोन मतलब श्रीमंताचे आहेत. इग्रेजांकडील निश्चय अद्यापीवर नांहीं.

परशरामपंत मिरजकर व कृष्टणराव पानसे मुनहलीसमीप आहेत. कुमनदान पांच सात कोसी आहे.

रामचंद्र गणेश पनाळच्यापासून दाहा कोसी पांच हजार लोकानसीं आहेत. येसाजी सिंदे पनाळच्यास आठ हजार लोकानसीं आहे. शंकराजी घोरपडे सिंदे मा।रासमीप आहे. त्यानें क-हाडप्रांतीं कांही गांव लुटले व खंडणी घेतली. मिरजकरांचे वकिलाचे जुबानीं वर्तमान यैकिलें; कीं हैदर नायकानें पनाळेकरास लाख रुपये पाठविले आहेत. लोकांसी तलब झाडून दिधले पुढें निगाहदास्त करीत आहे. श्रीमंताकडून माहदाजी सिंदे पनाळेकरांचे पारपत्यास जाणार. परस्परें जातील म्हणोन बापूनी सांगितलें. दुसरी चर्चा यैकिली कीं सिंद्याचे मतें पुरंदरास येऊन पनाळयाकडें जांवं. छ १ रबिलाखरी मुहूर्त पनाळच्याचे रुखें जाव. याउपरि जे वर्तमान होईल तें लिहून पाठवूं हे विनंती.

छ २० रोजी रो सखारामपंत बापू देवाजीपंत नि।। भोसले याचे डे-यास गेले होते. पंत मा।रनुलेची प्रकृती पोटदुखीकरितां अस्वस्थ होती याकरितां गेले होते. छ मा।री रो नाना फडनीसही गेले होते. छ २१ रोजी कृष्टणराव बलाळ गेले होते. छ १९ माहे मा।री रो देवाजीपंत बापूचे घरास भोजनास आले होते. वस्त्रें व सरपेच दिधला वस्त्रें पाच पारचे दिधले.

पौ छ ११ माहे रबिलाखर सोमवार सन ११९१ हिजरी.

श्रीनिवास

पु।। श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी, विनतीज. का खेड विसाद येथें वाडा बांधला आहे व गोदातीर यास्तव तीर्थरूप राजश्री नानास्वामीं वास करून राहिले आहेत. कसबे मा।रचा अमल हुजूरांत आल्यानंतर तेथील काम सेवकाकडें सांगावे व तीर्थरूप स्वामीचे नांवं सनद पाठवावी, म्हणोन स्वामीनी आज्ञा केली. त्यास

सेवकास इतर रोजगार करावा हे इच्छाच नांहीं. तीर्थरूप स्वामीनीं तर सर्व प्रपंच्याचा त्याग करावा हेच इच्छा धरून स्नानसंधेंत सदैव आसक्त. यास्तव कामाचा अंगिकार केला नांहीं. सांप्रत तीर्थरूप स्वामीचें पत्र चैत्र शुध सप्तमी सोमवारचें खेडाहून आलें व सौ।।वती मातोश्री व तिघी सुना व नात व यादवराय भतीजे याची स्त्री याप्रमाणें मंडली येथे आलीं. तीर्थरूप स्वामीनीं पत्रीं मार लिहिला त्याची नकल पृथक पाठविली आहे. ते मनन करून मर्जीस येईल त्याप्रमाणं राजश्री नारायणराव बापूस स्वामीचं पत्र परस्परं जावं, हे विनती आहे. याउपरि जे मर्जीस येईल त्याप्रमाणं तीर्थरूप स्वामीचा गोदातीरीं निर्वेध वास होय तो अर्थ करावा. जयवंतराव नामे सेखदार दि।। नारायणराव बापू कसबे खेडांत आहेत त्यांची रीति फार उन्मत्ततेची. पूर्वीं श्रीमंताकडील कमाविसदार होते ते बहुत सन्मान रक्षीत होते. दावरजंगाकडील आठसे रुपयाचा रोखा आला. पांचसे रुपये नवाब विकारुदौला बहादरांची जागीर खतगांव वगैरे पासून दावरजंगानी घेतले. व चिरंजीव सदासिवरायांकडून देविले. ते देणें प्राप्त, याकरितां अंगिकार केला, त्यास पांचस्यापैकीं साडेतीनसे रुपये येने व दीडसे रुपये गुंडो माहादेव नामे कारकून, यानें मधें आपले केले होते. तहकिकातेचे समईं कारकुनीचे रुपये जाणून साडेतीनसे रुपये दिधले, व बाकीचे रुपये १५० दीडसे गुंडो माहादेवास दिधले नांहींत. सांप्रत गुंडो माहादेव खेडास येऊन जयवंतराव नायब दि।। नारायणराव बापू यांसी यैक्यता करून रुपये मागायाची तीर्थरूपांसी बहुत सख्ती केली. तीर्थरूपांनी त्यास उठोन दिधले ते समईं जयवंतरायानी बहुत अमर्यादायुक्त भाषण करून, प्यादे घरास पाठवीत होते. वेंकटराव नामे सायरचे इजारदार आप्तविषयांत. त्यानीं जयवंतरायांचें शातवन केलें व उपाधि मवकुफ करविली, सांप्रत पाण्याची पखाल येत आहे ते पखाल परस्परें नेतात. व दाणें घराऊ खर्चाकरितां बाहेरून येणें त्यास हासल देणें म्हणोन तगादा करितात. याप्रमाणें उपद्रव त्यांचा बहुत आहे. याअर्थीं स्वामीचे आज्ञेनुरूप च्यार दिवस अन्यत्र स्थलीं राहणें योग्य असलिया तीर्थरूप व वरकड मंडली

राहील. व जयवंतरायाची सेखदारी अक्षई राहणार नांहीं. ते जातील ते समई राहतील. या विषई आज्ञेनुरूप वर्तणूक होईल हे विनंती.

पौ छ ११ माहे रबिलाखर सोमवार सन ११९१ हिजरी.

श्रीनिवास

नकल तीर्थरूप राजश्री नानास्वामीचे पत्राची आसीर्वाद उपरि. गुंडो माहादेव नि॥ लछीराम आमिल तरफ खतगांव याजपासून दावरजंग बहादरानीं रुपये घेतले होते. ते पुन्हां मदनूर वगैरे गांवापासून दावरजगानी रुपये घेतले. तो यैवज रोखा सौभाग्यगिरी, चेला दौलतगीरीचा, यास रुपये आठसें व गुंडो माहादेवाचे विद्यमानें पांचसे रुपयेचा रोखा लछीरामास लिहून दिधला. त्यास श्रीमंत राजश्री नानाजीपंत नानाचे कृपेकरून, आठसें रुपयाचा रोखा माघारा आला. पांचसे रुपयापैकीं पावणेच्यारसे रुपये लछीरामाचे देणे, ते देऊन लछीरामाचे मोहरेनसीं रसीद घेतली. बाकी सवासे रुपये लछीरामास विदित नांहीत. गुंडोपंताचे पोटीस्थाचे त्याविषई गुंडोपंतानें मदनूरीं वेरझारा करून चिरंजीव भाऊपासून पंचेवीस रुपये घेतले. पुन्हां येकदोनदां येऊन पांच रुपये घेतले. येकूण तीस रुपये पावले असतील. त्यापासीं आपला दस्तायैवज नांहीं. रोखा होता तो उमा ज्या समई कलबुरग्यास गेला ते समई परतोन घेतला. दावरजंगाकडून पांचसे रुपये उगवतील ते समई तुमचे रुपये देऊं म्हणोन गुंडोपंतासीं बोलत होतों. चिरजीव दादा मदनूरीं होते ते समई गुंडोपताने कांहीं उपाधि केली, तेव्हां काहडून दिधला. सांप्रत खेडास येऊन, पांचसात दिवस राहोन खटपट केली. सामोपच्यारानें सांगितल्यास त्याचे ध्यानास येईना. त्याउपरि येथील नूतन सेखदार राजश्री नारायणराव बापू, दिवाण नवाब शर्फदौला बहादर, यांचे नायब जयवंतराव दबडघाव येथें आले आहेत. त्यांचे आचरण व व्यवहार त्यासमान. जे त्यासच मान्य. उन्मत यवनाप्रमाणं व्यवहार दिसतो. राजे जगदेव याचे शालक सदासिवरायाचे पधतीचे ग्रहस्त म॥रनुलेकडें गुंडो माहादेवानें जाऊन त्यासी साह्य

केली. व येके दिवसीं येऊन उपोषण केलें व मनस्वी उन्मताप्रमाणें बोलूं लागला. ते समईं काहडून दिधला. त्यानें कचेरीस जाऊन जयवंतराव सेखदारास वर्तमान सांगितलें व सेखदाराचें आश्वासन हें आम्हांस ठाऊक नांहीं, सेखदारानें जे न बोलावयाचें तें भाषण केलें. अस्तु. तो हाकीम म्हणजे बादशाही बंदा व आम्हीं केवळ मुनिवृतीनें ये स्थलीं. उपाय काये? सेवटीं घरावर प्यादें पाठवावयाची तजवीज केली. ते समईं वेंकटराव दबडघाव सायरचें इजारदार चिरंजीव कृष्टणराव दाजीचे स्नेहित यानीं बहुता प्रकारें समजाऊन सांगितलें व प्यादे मना करविले. व दुसरे दिवसी गुंडो माहादेवास घेऊन घरास आले. ते समईं आपण उतर केले कीं दावरजंगा बाा आठसे रुपयाचा रोखा परतोन आला. पांचसे रुपये येणें आहेत, ते रुपये उगवल्यावर देऊं किवा पावणेच्यारसे रुपयाची रसीद लछीरामाची आहे, बाकीचे सवासे रुपयाची रसीद लछीरामाचे मोहरेनसीं आणून देणे. रुपये देऊं ते समईं कायल होऊन गेला. सारांश येथील सेखदाराची रीती मुनिवृतीनें स्वस्थ राहूं हा हेत त्यास हे उपाधि प्राप्त होती. तुमचे चितास आलियां श्रीमंत राजश्री नानासह वर्तमान लिहून पाठवांवे, अथवा रा नारायणरावजीस ल्याहावें: व त्यांची पत्रें प्रखर सेखदारास यांवी कीं व्यापारी ग्रहस्त व ब्राम्हण भिक्षुक क्षेत्रीं राहात आहेत. त्यास सर्वथैव उपद्रव न लावणं व हुकुमतीची रीति त्यांस न दाखवण. दुसरा प्रकार हेल्यावर पखाल पाण्याची येते ते नित्यशाह घेऊन जातो. व बाहेरून धान्य येणं त्यास अटकाव करितो इत्यादिक उपद्रव फार आहेत. तुम्हांस कळांवें म्हणोन लिहिलें आहे.

पाौ छ ११ माहे रबिलाखर सोमवार सन ११९१ हिजरी.

श्रीनिवास

पु।। श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनंतीजे. हरकाऱ्यांचे तनख्याचा परवाना माहबमाहीचा खास मोहरी रा नारायणराव बापूचे नांवचा पाठविला, तो पावला. याचें उतर छ १८ माहे रबिलावलीं पाठविलें, तें सेवेसी पावलें असल. इनायतनामा

निशानीसुधां पाठवितों म्हणोन पत्रीं आज्ञा होती. याकरितां आजीं छ २४ माहे रबिलावलपर्यंत मार्गप्रतीक्षा केली. आजी छ २४ माहे मारीं हुजूरचा इनायतनामा रो नारायणराव बापूचे नांवचा स्वामीनीं पाठविला, तो पावतांच परवान्याची नकल, काजीचे मोहरेनसी, व मीं आपलें पत्र व हुजूरचा इनायतनामा, व कृष्टणाजी वगैरे जासूदांचे नांवचें कबज, अज इ॥ छ १ जिलकाद लगायत आखर रबिलावल, पांच महिने पै॥ तलब रुपये ३७५॥=, सदरहू रुपयांचें कबज लिहून, जासूद बीडास पाठविला आहे. राजश्री नारायणराव बापूचे श्नेहाची रीती व कारवाई व गार्हस्थ सांप्रदाय अपूर्व म्हणोन स्वामीनी लिहिलें, त्यास आपले योगें मजलांही थोडासा बापूचा सहवास जाहला आहे. परंतु मामलतीचें काम व रुपयाची भीड, व देणेंघेणें हा प्रकार स्वामीवितरिक्त इतरास बहुत बत्ध करीत आहे. स्वामीची उपमा स्वामीसच योग्य. सांप्रत हुजूरची आज्ञा व स्वामींनी परस्परें सूचना केली, त्यापक्षीं किमपि गुंता राहणार नांहीं. श्री-कृपेनें उतर येईल त्याप्रमाणं सत्वरच विनती करीन. हे विनती. विनती जे आठ जोडचा पूर्वीं ठेविल्या होत्या, त्याची इस्मनविसी व ते हरकारे आहेत, सांप्रत दोन जोडचा नव्या ठेविल्या. त्यांची इस्मनविसी छ १८ रबिलावलचे पत्रीं लिहिली होती. व सांप्रतहीं फर्द आलाहिदा दोन जोडचाची इस्मनविसी बकयद तारीख लिहून पाठविली असे. स्वामीनी खास दसखत करवावें, व दोन जोडचाचे तलबेची तनखा करून पाठवावी, हे विनती.

---

**A. R. No. 34.** [२६ रबिलावल ११९१ हिजरी
४ मे १७७७

श्री

विनंती विज्ञापना यैसीजे येथील कुशल तागाईत छ २६ माहे रौवल, मु॥ पुणे, स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणोन

स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे, विशेष येथील वर्तमान छ २२ रोज मंगलवारी, त्रितीये प्रहर दिवसा, अखबारपत्र सरकारचे डाकेवरून सेवेसी रवाना केले. ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनंतर येथील वर्तमान रोज मा।री राजश्री हरीपंत फडके याणी राजश्री फत्तेसिंग भोसले अकलकोटकर याजला मेजमानी केली. दिढा प्रहरा दिवसा भोसले मजकूर व दिवान व कारभारी वकील वगैरे मानकरी आसामी पंचवीस तीस भोजनास आले होते. भोजने जाल्यावर त्याजला वस्त्रे वगैरे दिल्ही. उभयेता बंधु भासले मा।र यास सिरपेच २ व वस्त्रे वरील प्रो व कासीराव आपाजी दिवान यास वस्त्रे च्यार वरकड मानकरी वकील याजला पैठणी सेले पागोटी पंधरा आसामियास या प्रो दिल्हे. अतर पानदान व विडे देऊन दोन घटिका नाच जाला. सवादो प्रहरी भोसले मा।र याणी निरोप घेऊन आपले डेऱ्यास माघारे गेले आणि पहिले जागेवरून कूच करून भवानीपेठेचे भवानी सांन्निध्धे जाऊन उतरले. या उपर मा।र निले आपले गावास जाणार. भोसले मा।र याचे तीर्थरूप शहाजी भोसले मृत्य पावले. त्याचे नावचा सरंजाम चालत होता तो हाली चिरंजीव फत्तेसिंग भोसले याचे नावे बहाल करून सनदापत्रे जाली पाहिजेत. ते करून घेऊन वस्त्रे द्यावी याकरिता मा।रनिले येथे आले होते. त्यास त्याचा जाबसाल सरकारात होऊन साबिक बदस्तूर बहालतेच्या सनंदा याच्या नावे करून दिल्हचा. त्याजकरिता श्रीमंताची नजर सात लक्ष रुपये ठरले. सिवाय दरबार खर्च व अंतस्ते वगैरे खर्च तीन साडेतीन येकूण साडेदाहाचे घरास गेले. नजर वगैरे यैवज हप्तेबंदीने व वराता या प्रो निशा घेतली. त्रितीये प्रहरी मदारुलमहाम याचे वाड्यात राजश्री हरीपंत फडके व बहिरो रघुनाथ मेहेदळे व मुत्सदी व दरकदार वगैरे सर्वत्र आले होते. त्यास राजश्री नाना फडनवीस व हरीपंत तात्या या उभयताचे खिलवत च्यार घटिकापर्येंत जाले. नंतर मेहेदले मा।र याजला खिलवतात बोलाऊन अस्तमितपर्येंत त्रिवर्गाचे खिलव (त) होऊन उपरांत फडके आदिकरून आपलाले घरास गेले. खिलवताचा भाव

ध्यानास आला की कार्तिक वद्ये ५ पंचमीस मुहूर्ते करून राजश्री हरीपंत फडके याची स्वारी कर्नाटक प्रांती जावयाचे डेरे बाहेर होणार, यैसे वर्तमान होते. त्यास येविंसीचा माार या प्रो तपसील-वार मसलत प्रकर्णीचे बोलणे, की मदारुलमहाम याचे मानस राजश्री हरीपंत तात्या याणी स्वारीस निघावे, म्हणोन मसलत होत होती. यैसियासी फडके याणी उत्तर केले की पेशजी प्रांत मजकूरचे मोहिमीस जाऊन आलो, ते समईचे फौजेचे लोकाचे देणे तीस लक्ष रुपये निघाले होते, ते त्याजला अद्यापि पावले नाहीत. हाली मोहिमीस जावयाचे आपण म्हणतात. त्यास सदरहू मागील देण्याचा फडशा फौजेचा करून दिल्हा पाहिजे आणि पुढे वीस पंचवीस हाजार फौज बराबर यावी लागेल, त्यास नालबंदी वगैरे द्यावयाची तो सोय पडतच नाही. परंतु तूर्त दोन रोजमरे आधी पदरी घातले पाहिजेत. आणि सम-जाविश करावी तेव्हा फौज बराबर येईल, आणि न्यावयाचेही साआर्थ आहे नाहीतर हे दोण्ही प्रकार न घडल्यास आमचे जावयाचे कैसे घडेल ? त्याजवरून मदारुलमहाम याणी सागितले की मागील तिसा लक्ष्या पाौ बारा लक्ष रुपयें व हालीचे रोजमऱ्यापैकी आठ लक्षे रुपये येकूण विसा लक्षाचा भरणा करून देऊ. स्वारीस जावे. त्यास फडके मजकूर याचे शरीर पोटदुखीमुळे ठीक नाही व फौजेचे मनोगतानरूप यैवज त्याचे पदरी पडत नाही. या संध्धिक्ततेकरिता निश्चंये ठरला नाही. म्हणोन राजश्री आपा बलवंत याजला पाठवावे त्यास त्याणी उत्तर केले की सालगुदस्ता गुजरात प्रांतीचे स्वारीस जाण्याची नेमणूक आमची करून रवाना केले होते. त्यास च्यार सा महिने बाहेर डेऱ्यात राहून मागती गावात आलो. मोहिमीस जाणे जाले नाही. आता कर्नाटकप्रांती जावयाची आज्ञा आपण करितात, त्यास जरीपटका व दाहा पंधरा हाजार फौज देऊन स्वतंत्रच पाठवावे, परंतु राजश्री परशराम रामचंद्र याचे तैनातीस पाठऊ नये या रदबदलीकरिता त्याचेही जाणे तूर्त राहिले. यैसियासी इंग्रेजाचे मसलत प्रकर्णी हुजूरची पत्रे पयेदरपये येतांत व इंग्रजाचे म्हंणे बाजिदीचे आणि मिरजकरही मदतेविसी वरचेवर लिहितात. तेव्हा

फाजचा रवाणगी सरदार नेमून केली पाहिजे. यैसे बोलणं जाल्यावर राजश्री माहादाजीपंत बेहेरे याजला पाठवावे. बराबर अठरा वीस पागा व सरंजामी व सिलेदार व इतलाखी वगैरे दाहा हाजारा फौजेची भर्ती करावी, पाच तोफा व मुसामुतरम् फिरंगी या प्रा सरजाम देऊन जलद रवाना करावे यैसे ठैराविले. श्रुत होये. छ २३ रोज बुधवारी पहिले साहा घटिका दिवसा, राजश्री माहादाजीपंत बेहेरे याजला घेऊन, राा नारोपंत चक्रदेव बक्षी मदारुलमाहाम याचे वाडयात आले. त्यास मदारुलमाहाम याणी बक्षी माार याजला सागितले की बेहेरे यासी सरकार वाड्यात घेऊन जावे. श्रीमंताणी आज्ञा केली आहे त्याजवरून बेहेरे याजला स्वारीस पाठवावयाचे ठैरले आहे. त्यास येविसी श्रीमंतास विनंती करून बेहेरे याजला रुकसतीचे विडे देवावे. त्या प्रा चक्रदेव श्रीमंतापासी बेहेरे माारास घेऊन जाऊन विनंती केली, आणि माहादाजीपंत बेहेरे कर्नाटकचे स्वारीस जावयाचे म्हणोन श्रीमंताणी रुकसतीचे विडे दिल्हे आणि ततःक्षणीच उभयेता मागती राजश्री नाना फडनवीस याजवल येऊन वर्तमान निवेदन केले. तेव्हा मदारुलमाहाम याणीही विडे मशारनिलेस देऊन निरोप दिल्हा. बेहेरे माार आपले घरास गेले. त्रितीये प्रहरी मदारुलमाहाम याचे वाडयात सर्वत्र आले होते. राजश्री हरीपंत फडके आल्यावर उभयेताचे खिलवत मसलत प्रकर्णी च्यार घटिका जाले. नंतर राजश्री नाना व फडके उभयेतां निघोन ते भिकाजीपंत पाळंदे अलीबाहादर याचे फौजेचे फडनवीस स्वारीबराबर हिंदुस्थानात गेले होते. त्यास पावटयाचे गढीवर लढाई जाली. तेथे पाळंदे माार यास गोली लागून मेले. हे वर्तमान येथे आले. सबब त्याचे मातुश्रीचे समाधानाकरिता त्याचे घरास जाऊन तेथोन फडके मजकूर निघाले. ते मागती राा नानाचे वाड्यातच आले. आणि मदारुलमाहाम परभारा बेलंबागात जाऊन साइंकाली आपले घरास आले. तो मागती फडके व राजश्री नाना व मेहेदले यैसे बसोन दोन घटिका रात्रपावेतो बोलणे केले. यावर तिसरीचे आमलात सर्वत्र आपलाले घरास गेले. रा माहादाजीपंत बेहेरे याचे महूर्त रोज मारी

आकरा घटिका रात्रीस डेरे दाखल व्हावयाचे होते. सबब ते समई बेहेरे मार महूर्ते करून आपले येथोन निघाले ते गारपीरावर डेरे दिल्हे होते तेथे जाऊन राहिले. उदईक तेथून कूच करनार. श्रुत होये .छ २४ रोज गुरुवारी येकादसीस प्राथःकालीच श्रीमंत पर्वतीस गेले होते. येका प्रहरात देवाची पूज्याविधी करून माघारे येताना बेलबागात येऊन श्री विष्णूंचे दर्शण घेतले आणि तैसेच निघोन सवा प्रहरा दिवसा आपले वाड्यात दाखल जाले. राजश्री नाना फडनवीस मागील दोन घटिका रात्र शेष राहता आपले वाड्या-तून निघोन नव्या वाडयात गेले. श्नानसंध्यादिक तेथे करून उपरांत बेलबागात आले. श्रीविष्णुमूर्तीचे पूजन दाहा घटिकापर्यंत जाल्यावर आपले घरास आले. त्रितीये प्रहरी श्रीमंताचे वाडयात दरबार जाला. मदारुलमाहाम व हरीपंत फडके व मुत्सदी व दरकदार व मामलेदार सुभे आदिकरून सर्वत्र आले होते. श्रीमंत आर्शे माहालात आल्यावर दोन घटिका माली मुल्की कामे जाली. नंतर श्रीमंत उठोन सातखणीवर गेले. मागाहून मदारुलमाहाम व फडके व मेहेदले यैसे तेथे गेल्यावर, श्रीमंतासी खिलवत च्यार पाच घटिकापर्यंत मसलत प्रकर्णी जाहालें. उपरांत श्रीमंत मागील दोन घटिका दिवस शेष राहता, सातखणीवरून माहालात गेले. आणि मदारुलमाहाम याणी रा नारोपंत चक्रदेव बक्षी यास बोलाऊन, बेहेरे याचेबराबर फौजेचे रवानगीकरिता, पागा वगैरे सरंजामीची नेमणूक करावयाची त्याच्या यादी दोन घटिका रात्रपर्यंत बसोन पाहिल्या.नंतर तीन घटिका रात्र होता रा नाना आदिकरून आप-लाले घरास गेले. रा माहादाजीपंत बेहेरे याणी गारपीरावरून कूच करून रा बालाजी ना भिडे याचे बागाजवल जाऊन उतरले. पागा वगैरे फौज जमा होऊन पुढे लौकरच जाणार. राजश्री फतेसिंग भोसले याणी भवानी पेठेचे देवीचे जवळ मुकाम केला होता. तेथून कूच रोंज मारी करून लोणीस मुकामास गेले. श्रुत होये. छ २५ रोज शुकुरवारी त्रितीये प्रहरी मदारुलमाहाम याचे वाड्यात मुत्सदी व दरकदार वगैरे सर्वत्र आले होते. राजश्री हरीपंत फडके

आल्यावर उभयेता व मेहेदले यैसे मसलत प्रकर्णी बोलत बसले होते. नंतर रा नारोपंत चक्रदेव याजला बोलाऊन पागे व सरंजामी याच्या यादी निवडून फौजेची नेमणूक बेहेरे याजबरोबर द्यावयाची ठरवीत आहेत. कर्नाटक प्रांतीचे वर्तमान सोदे बिदनूर येथील राजे संस्थानिक याजकडे हे दोण्ही संस्थाने होती. ते टिपूनी घेऊन राज्यास परागंदा केली. म्हणोन राजे गोकाकास जाऊन राहिले होते. हाली या मसलतीची शुरुवात होऊन फौजा कर्नाटक प्रांती गेल्यावर कृष्णेपासून तुंगभद्रेपलीकडेपर्यंत व चहूकडील मुळुक व ठाणी वगैरे टिपूनी सोडिली. तेव्हा सोदे बिदनूर येथील राजे याणी किल्यात फितूर करून दाहा बारा हाजार फौज पाठविलीं. राजश्री परशराम रामचंद्र याणीही रा॥ गणपत आनंदराव मेहेदले पाच च्यार हजार फौजेनसीं तिकडे पाठविले होते. त्यास त्याणी राज्याची मदत केली. तेणेकरून राजे याणी सोदे बिदनूर येथील संस्थाने हस्तगत करून, तेथे ठाणी बसंविली. आसमंतात भागीं सतेताळीस ठाणी आहेत. त्याज पा। सतावीस ठाणी घेतली, बाकीचीही घेत आहेत. यैसियासी रा। परशराम रामचंद्र याणी राज्यासी दावा लाविला की, संस्थाने आम्हीं घेऊ. तुंम्ही आपली ठाणी उठवावी. यैसियासी राजे याणी सागितले की तुम्हीं आपली खंडणी मात्र द्यावी. वरकड संस्थाने वगैरे ठाणी यांसी बोलो नये. त्यास ते गोष्ट मिरजकर मानीत नाहीत. मेहेदले मजकूर त्याचे मुलकात धूमधाम करितात. म्हणोन सोदे बिदनूरकर राजे याणी आपला वकील येथे पाठविला आहे. तो रोज मारी राजश्री सखारामपंत पानसे याचे विद्येमाने, मदारुलमहाम व फडके यास येऊन भेटून गेला. खंडणीचा तह येथेच करावा म्हणजे मिरजकर संस्थानासी बोलणार नाहीत. याकरिता राज्याकडून वकील आला आहे. टिपू तो घाटाखालेच आहे. सत्यमंगलावर फौजा ठेऊन कोयेमतुरावर इंग्रेज आहेत. त्यासी लढाईची शुरवात आहे. इकडे वीस पंचवीस हजार फौजेनसी टिपूने आपला भाऊ किंवा कोण्ही सरदार रवाना केला आहे, म्हणोन वर्तमान आहे. मदारुलमाहाम व फडके वगैरे

तिसरे घटिका रात्रीस खिलवतातून उठिले. त्यास फडके आदिकरून आपलाले घरास गेले. आणि राजश्री नाना फडनवीस बेलबागात गेले. मागील पाच घटिका दिवस शेष राहाता, श्रीमंत रमन्यात गेले होते. तेथे घोडी फिरऊन स्वारी माघारे निघाली ते साइंकाली आपले वाड्यात येऊन दाखल जाले. रा बाबूराव वैद्ये याजला मदारुल-माहाम याणी पैटणी सेला पागोटे देऊन नागपूरास जाण्यांविसी निरोप दिल्हा. या उपर मारनिले स्वार होऊन जाणार. हिंदुस्थानचे वर्तमान अलीबहादर याची पत्रे आली. त्यास बहादर मवसूफ चमल नदीवर येऊन पावटयाचे गढीवर लढाई जाली. तेथील ठाणे घेऊन हाली मुकाम तेथेच आहे. मथुरेहून पंनास कोस पुढे आले. इकडे यावयाच्या उद्योगात त्यास राजश्री माहादाजी सिंदे याणी पत्रे येथे पाठविली. त्याचे उतर मदारुलमाहाम याणी सिंदे यास लिहिले की, सरकार कामाचे बदोबस्ताकरिता बहादर त्या प्रांती रवाना जाले. त्यास फौजेचे खर्चाची नेमंणूक आहे. त्याप्रमाणे त्याचा बदोबस्त येथास्थित तुम्हीं करून दिल्हयास, ते देसी कार्यास येतील. तेथे राहून सरकारकामच आहे. बदोबस्त मनोगतानरूप न जाल्यास इकडे सहजच येणे प्राप्त. या प्रा॰ बहादरासही लि॰ गेले आहे. त्याजवरून सिंदे याणी होलकर व राजश्री सिवाजी विठल याचे विद्यमाने बोलणे घातले आहे. पाहावें काये तह ठरतो. पाचा घटिका रात्रीस राजश्री नाना फडनवीस बेलबागाहून परभारा बंगल्याचे बागात गेले. तेथे प्रदोषाचे भोजन जाल्यावर च्यार घटिका-पर्यंत नाच जाला. बारा घटिका रात्रीस तेथून माघारे निघोन तेरावीचे अमलात आपले घरास आले. रा परशरामभाऊपासी दोन पलटने पेशजी इंग्रेजाची कोकणातून आबेगावचे घाटाणे आली. त्यास हालीही दोन पलटणे आणखी ममईहून निघोन त्याच घाटाखाले आली आहेत. मिरजकराचे मदतीस येतात. त्याज बोर काही तोफाही आहेत . यैसे वर्तमान आहे. श्रुत होये. या उपरि पुढे प्रसंगीचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल

सदैव कृपाकरून आज्ञापत्र सादर होऊन, सेवकाचा सांभाल करनार स्वामी समर्थ. बहुत काये लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञापना.

----

**A. R. No. 35.** १ रबिलाखर ११९१ हिजरी
९ मे १७७७

पाौ छ १३ रबिलाखर सन ११९१ हिजरी, बुधवार, त्रितीय प्रहर, मुकाम तालीकुडच्यांस पावले.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सांा नमस्कार विनती उपरि. येथील वर्तमान छ १ रबिलाखर वैशाख शुध द्वितीया, भृगुवासरपर्यंत, माो सासवड स्वामीचे कृपेकरून क्षेम असे. विशेष पूर्वी छ २६ माहे रबिलावली, विनतीपत्र हुजुरचे अर्जीसहित पाठविलें, तें पाऊन सविस्तारें वर्तमान श्रुत जाहलें असेंल. त्या उपरि इकडील वर्तमान रघोजी भोंसले दिवाकरपंतांचेसहित सासवडीहून कूच करून गेले. व फरासीसांकडील येलची मुसार सीवालीयदे सालुबे यानीं छ २९ रबिलावलीं, श्रीमंत पंतप्रधान स्वामीची भेट घेतली. व पनाळेकरांकडील व परशरामपंत मिरजकराचें वर्तमान सविस्तारें पृथकपत्रीं लिहिलें आहे, त्यावरून श्रुत होईल. मुबारजुलमुलुक बहादर यांसीं व हैदरनायकांसीं तिसा कोसाचा फासला राहिला. व हरीपंत फडके मुदगलाहून कूच करून बहादर म॥राचे रुखं गेले. व हैदर नायकाकडून कांही लोक फुटोन मुबारुजुलमुलुक बहादरांसी मिळाले म्हणोन मिरजेहून वर्तमान पुरंदरास आलें. सेवेसी श्रुत होये. फरासीसाकडील येलची आला आहे, त्याचे बोलण्याचा खुलासा समयोचित इंगरेजांसीं बिगाड करावा हा आहे. सांप्रत फरासीसाकडील मुसार सीवालयदे सालुबे च्यार महिने पर्जन्यकाळ पुण्यांत राहणार.

सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणं. रा० भीमराव पानसे यांचे सनदेच्या नकला व स्वामीचे नांवची पत्रं व दरबार खर्च राजश्रीस पडला म्हणोन येवज घेणारानी घेतला. हे सविस्तारें वर्तमान सेवकाचे पत्रावरून श्रुत जाहले असेल हे विनंती.

----

पौ छ १३ रबिलाखर सन ११९१ हिजरी, बुधवार, त्रितीय प्रहर.

श्रीनिवास

पु॥ श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. हैदर नायकाकडून नरसिंगराव नामे वकील आनंदराव रास्ते यांचे विद्यमानें येक वर्ष येथें आहे. सांप्रत मुबारुजुलमुलुक बहादर हैदरनायकाचे प्रांतात गेले, व हरीपंतही रवाना जाहले. यावरून खानमारानें श्रीमंत पंतप्रधानाकरितां वस्त्रें व जवाहर नरसिंगरायाकडें पाठविलीं. वकील मारानें रा० आनंदराव रास्ते यांचे वकीलाचे विद्यमानें, उभयतां मदारुलमाहाम व कृष्टणरायांस वर्तमान सागितलें. कार्यभाऱ्यानीं उतर केलें कीं हजरत बंदगानआली खुद बदौलत मुतवजे होऊन गेले. व मुबारुजुलमुलुक बहादराचा व हैदरनायकाचा आजीपर्यंत मुकाबिला जाहला असेल. याहून पूर्वी तुम्हाकडील पत्र किंवा ज्वाबसालाचा सिलसिला आला असता तरी तुमचीं वस्त्रें घेतों. प्रस्तुत हजरत बंदगानआलीचे जनाबेंत तुम्हाकडील वकील जाऊन विनती करील. व हुजुरीहून जो इरशाद होईल त्या प्रमाणं आम्हांस मान्य आहे. हजूरचे इतल्याखेरीज आम्हीं तुम्हांसी ज्वाबसाल करीत नांही म्हणोन साफ उतर केलें व वस्त्रें घेतलीं नांहींत. सविस्तारें वर्तमान हुजूर विनती करावी. फरासीसाकडील येलची आला आहे. त्यानें सांगितलें कीं आम्हासी व इंगरेजांसी ऐक्यता आजीपर्यंत आहे, परंतु आमचें एक जहाज जंगी मुंबईचे गीर्दनवाहेत व एक जाहाज सुरतेचे समुद्रांत हमेशा फिरत आहे. सांप्रत येके जाहजांत आम्ही आलों

व तीन जाहाजें विलायतेहून निघालीं आहेत. या प्रकारें सांगितले. याचें तात्पर्य येथील कार्यभाऱ्यांनी ध्यानास आणिले कीं फरासीसांसी व इंगरेजांसी बिगाड जाहला व फरासीसांचें ऐक्यतनें हुजूरचे कामाचा बंदोबस्त व श्रीमंतासी इंगरेजानी बदमामली केली, त्याचा तदारुक होईल. छ २९ रबिलावलीं खिलवत जाहलें. त्याचा भाव प्रगटांत नांहीं. रा॰ क्रुष्टणराव बलाळ यांची प्रकृती स्वस्थ नव्हती, याकरितां दरबारास आले नांहीत. माधवराव सदासिव यांस बोलाविलें नांहीं. बापू व नाना व फरासीस व दुभासी चौघे मात्र होते. सेवेसी श्रुत होये.

राजश्री नाना फडनीस व क्रुष्टणराव बलाळ पुण्यास जाणार आहेत हे विनती.

-----

पा॰ छ १३ रबिलाखर सन ११९१ हिजरी, बुधवार, त्रितीय प्रहर.

श्रीनिवास

अखबार पुरंदर अज इ॥ छ २६ रबिलावल लगायत छ १ रबिलाखर सन ११९१ हिजरी, वैशाख. रघोजी भोंसले यांचे डेऱ्यास श्रीमंत पेशवे छ २२ रबिलावलीं आले व भोंसले मा॥रांनीं सर्वत्रांस वस्त्रे व श्रीमंतास जवाहर दिधली व मुशार सिवाली फरासीस याची व कारभाऱ्याची छ २५ रबिलावलीं भेट जाहली. व छ २६ माहू मा॥रीं भोंसले श्रीमंतापासून निरोप घेणार हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें होतें. त्यानंतर छ २६ माहे मा॥रीं रघोजी भोंसले, पावणसें सिलेदार लोक, व दिवाकरपंत वगैरे कारकून व मुतसदी मंडली पंचेवीस एकून शंभर लोकानसी गडास गेले. व भोजने केलियानंतर श्रीमंत पेशवे व उभयतां कारभारी क्रुष्टणराव बलाळ वगैरे मंडळी भोंसल्यासहित कचेरींत बसले. मरातबाप्रमाणें च्यार वस्त्रें व दोन वस्त्रें सर्वत्रांस व भोसले व दिवाकरपंतास वस्त्रें व जवाहर व हाती दिधला.

| उमदे मराठे मुतसदी यास | रघोजी भोंसले . |
|---|---|
| १ पैठणी मुडासें | १ चिरा बादली |
| १ पैठणी सेला | १ जामेवार कारचोब |
| १ मशरू | १ किमखाबी तुमान |
| १ महमूदी जामेवार | १ पैठणी सेला |
| ४ | १ सरपेच मुरसा |
| मध्यम व कनिष्ठास | १ कंठी मोत्याची पदर आवे ज्या सहित. |
| १ मुडासें पैठणी | १ तुरा मोत्याचा बारालडी |
| १ सेला पैठणी | १ हाती. |
| सदरहू प्रमाणे सर्वत्र मंडलीस वस्त्रे दिधली | ८ |

तसे वस्त्रें दिवाकरपंत. दिवाकरपंत

| किमखाब | पैठणी सेला | मुंडासे चंदेरी | महमुदी थान |
|---|---|---|---|
| १ | १ | १ | २ |

| सरपेच मुरसा | कंठी पदकासहित मोत्याची |
|---|---|
| १ | १ |

सदरहू प्रमाणं वस्त्रें घेऊन पानदान घेऊन श्रीमंताचा निरोप घेतला व गडीहून उतरले. राजश्री कृष्टणराव बलाल यानीं आपले डेऱ्यास रघोजी भोंसले व दिवाकरपंत व बाबूराव वकीलास आणलें.

| रघोजी भोसले | दिवाकरपंत | बाबूराव |
|---|---|---|
| १ पैठणी मुंडासे | १ मुंडासे चंदेरी | १ सेला पैठणी |
| १ पैठणी सेला | १ सेला चंदेरी | १ मुंडासे पैठणी |
| १ शालजोडी | २ महमुद्या | २ महमुदी |
| २ महमुदी थान | ०॥० किमखाब निम थान | ०॥० किमखाब निम |
| १ किमखाब | १ शालजोडी | ४०॥० |
| १ सरपेच मुरसा | १ सरपेंच मुरसा | |
| ७ | ६०॥० | |

सदरहू प्रमाणं वस्त्रें देऊन विडे दिधले व येकांती आर्ध घटका भाषण करून निरोप घेऊन आपले डेऱ्यास गेले.

छ २७ रबिलावलीं भोसले म॥रीनीं कोडीतापासून कूच करून सासवडासमीप येऊन उतरले. दिवाकरपंत गडास गेले होते. बापू व नानांसी येकांती बोलणें होऊन श्रीमंतांचा व रघोजी भोंसल्याचा अकृत्रिम श्नेह व भोंसल्यानीं श्रीमंताचे लक्षांत राहांवें याविषईं परस्परें बेलभंडार व शफत होऊन देवाजीपंत पुन्हा आपले लष्करास आले. छ म॥रीं रघोजी भोंसले माहदाजी निळकंठ पुरंदरे, बज्याबाचे भाऊ, यांचे घरास गेले होते. पांच वस्त्रे व सरपेंच पुरंदरे म॥रांनी दिधली. त्यानंतर देवाजीपंतासही वस्त्रें दिधली. रा॥ कृष्टणराव बळवंत यांनीं रघोजी भोसले व देवाजीपंतास आपले घरास नेऊन वस्त्रें दिधलीं व सरपेच दिधला.

छ २८ रोजीं रा॥ दिवाकरपंत सोनेरीस रा॥ भीमराव पानसे यांचे घरी भोजनास गेले होते. भोजनोतर वस्त्रें व सरपेंच देऊन मार्गस्त केलें.

छ २९ रबिलावलीं फरासीसांची व श्रीमंतांची भेट जाहली. व रा॥ दिवाकरपंतासही बोलाविलें होतें. याकरितां भोसल्याचा मुकाम जाहला.

छ १ रबिलाखरीं रघोजी भोंसले यानीं सासवडासमीप होते. तेथोन कूच करून जेजोरीस गेले. येकदोन दिवस जेजोरीस राहून जेऊर-नजीक सातारा तेथे जाणार. तेथोन तुळजापुरास जाणार म्हणोन चर्चा येकिली. रा॥ दिवाकरपंतांकरितां तीन दिवस रघोजी भोसल्याचे मुकाम जाहले होते. दिवाकरपंतासहित कूच करून गेले.

फरासीसांचीं व बापू व नानाची छ २५ रबिलाखरीं भेट जाहली. ते दिवसीं खिलवतेंत बोलणें जाहले ते रा॥ कृष्टणरावजीचे मुखें सेवकानें श्रवण केलें. त्याप्रमाणं सेवेसी विनती लिहिली असे. मुसार सिवालीयानें उभयतांस सांगितलें कीं इंगरेजांकडील ज्वाब-

सालाचे मंध्यस्तीस जे ग्रहस्त असतील, त्यांनी आमचे खिलवतेंत नसांवें. बापूनीं उतर केलें कीं आमचे दरबारी बहुत प्रमाणिक चाल आहे. खावंदाचे मर्जीप्रमाणं सेवकाची वर्तणूक आहे. इंगरेजांकडील मध्यस्त असलियां चिंता नांहीं. त्याउपरि फरासीसाचे वजीरानें बापू व नानास पत्र लिहिलें होतें. तेंही दिधलें व आपले बादशाहानें श्रीमंतास पत्र व कांही तोहफा जिनस दिधला आहे. तो श्रीमंतांचे भेटीनंतर देऊं म्हणोन बोलला. बापूनीं विचारिलें कीं इंगरेजांचा व तुमचा इतिफाक कोणे प्रकारचा. त्यानीं उतर केलें कीं इंगरेजांसीं व आम्हांसीं श्नेह आहे व आमचे बादशाहानें आज्ञा केली आहे कीं, जो श्रीमंताचा श्नेहित तो आमचा श्नेहित व श्रीमंत पेशव्यांचा जो दुष्मन तो आमचा दुष्मन. या बोलन्यांत थोडीसी कुन्हा आडळली. त्याउपरि छ २९ रबिलावल वैशाख शुध प्रतिपदा गुरुवारीं श्रीमंत पंतप्रधान गडाखालें डेऱ्यास आले व फरासीस श्रीमंताचे आज्ञेप्रमाणें आपले जमावसुधां डेऱ्यास आले. घोडीं व हातीं वगैरे सरजाम श्रीमंतांचाच तैनात आहे. श्रीमंत पेशवे व सखारामपंत व नाना फडनीस व दिवाकरपंत नि।। भोसले व वरकड मंडली होती. मुसार सिवालीयानें श्रीमंताचे पायांस हात लावून डोळचांस चुंबन केलें व आपण येकला सन्मुख बसला. वरकड फरासीस उभे राहिले. त्यानंतर फरासीसांचे बादशाहानें श्रीमंतास पत्र दिधलें होतें, तें दिधलें. श्रीमंतानी आपले हातें घेऊन बापूचे स्वाधीन केलें. त्या उपरि

१ पस्तोल
१ तरवार गुप्ती
१ घडचाल थोर
२ रेशमाचीं फुलें विलायती हरयेक जिनसाची द्रोन पेटारे.
२ आबखोरा व प्याला सोनेरी रंग हार येक धातूचें, जहराची बाधा न होय याकरितां भोजनास व पाणी पिन्यास.

२ डबिया दोन त्याजवर तसवीर फरासीसांचे बादशाहाची व त्याचे स्त्रीची.
६ कृष्णाची मूर्तीचे तसवीरा व येक माहादेवाची येकून साहा
५ कृष्णाची मूर्ती
१ माहादेव
६

सदरहू प्रमाणं येक येक श्रीमंतास दिधलीं. व हरयेकाचा तपसील सांगितला कीं पस्तोल व तरवार तुमचे शत्रूचे पारपत्याकरितां व घडयाल क्षण पळहीं तुमचे संरक्षणास कारभाऱ्यानीं असावध न राहांवें यास्तव, व पुष्पाचे पेटारे तुमचे सयरेकरितां, आबखोरा व प्याला पाणी पियास व भोजनास विष अन्नात किंवा पाण्यांत असलियां बाधित नांहीं, व दोन डब्या त्याजवर बादशाहाची व त्याचे बेगमेची तसवीर आहे. त्यास बादशाहानें सांगितलें आहेजे. तुमची व आमची भेट होणं दुस्तर. याकरितां आमची तसवीर नित्यशा पाहात जाणं व तुमची व तुमचे मातोश्रीची तसवीर लिहून आणविली आहे म्हणोन भाषण केलें. श्रीमंतांनी दोन्हीं डब्या आपले हातीं घेतल्या व अवलोकन केलें. त्याउपरि श्रीमंतांचं कौतुक पाहून मुसार सिवाली फरासीसाचे डोळयास उदक आलें. त्यानंतर श्रीमंतांनीं अतर व गुलाब व विडे देऊन आपण गडास जाण्याकरितां उठले. व स्वार होऊन गडास गेले. सूर्य अस्तमानानंतर सखारामपंत व नाना फडनीस व मुसा म॥र त्रिवर्ग बेचोब्यांत दोन घटकापर्यंत येकांती बोलिले. दुभासी एक प्रभु फरासीसांचे समागमीचा खिलवतेंत होता. त्याउपरि दिवाकर-पंतास खिलवतेंत बोलाविलें. दुभासी यास सरे आम कचेरींत बसविलें. फरासीस च्यार घटका रात्रपर्यंत बसले. त्यानंतर स्वार होऊन आपले मकानास आले. दिवाकरपंत व सखारामपंत व बालाजीपंत नाना प्रहररात्रपर्यंत होते. त्याउपरि दिवाकरपंतानी निरोप घेतला व आपले लष्करास गेले. नाना फडनीस गडावर गेले. सखारामपंताचे पुतन्याचे लेंकींचा विवाह तृतीयेचा, याकरितां सासवडास आले.

महमदअली कुमनदान परशरामपंत मिरजकराचे रुखावर होता. त्यास मुबारुजुलमुलक बहादर हैदराचे रुखावर गेले. याकरितां कुमनदान म॥र माघारा खान म॥राकडे गेला. दुसर वर्तमान परशरामपंत मिरजकरानीं लिहिलें आहे की हैदर नायकानें शबखूनाकरितां कांही प्यादे व स्वार मुबारुजुलमुलुंकावर पाठविले. बहादर म॥र बहुत खबरदार व हुश्यार होते. छाप्याचे लोकांस लुटून घेतलें. दोन हाजार घोडीं पाडाऊ जाहली. दुसरी

खबर जे हैदराचे लष्करातील लोक आजुर्दा होते ते बहादर मवसुफास येऊन भेटले.

येसाजी सिंद्याकडें शंकराजी घोरपडे वगैरे नोकर होते. रामचंद्र गणेशांनी फोडून आपले मतलबावर आणिले, व येसाजी सिंदे बहुत घाबरे होऊन पनाळ्याचे आसऱ्यास गेले. माहादाजी सिंद्यानीं पनाळ्याचे मोहिमेस यावयाचें जरूर नांहीं म्हणून लिहिलें आलें, त्याजवरून माहदजी सिंद्याची मोहीम पनाळे प्रांतास जावयाची मवकुफ जाहली. मुबारुजुलमुलुक बहादरानीं हैदर नायकाचे लष्करांत कांहीं भेद केला होता. दोन हजार स्वार खान म।।राचे लष्करीहून फुटोन बहादराचे लष्करास आलें, व बाह्यात्कारें शोहरत घातली. जे शबखुनाकरितां लोक आले होते ते फौज बहादरानीं मारून घेतली. या प्रकारचें वर्तमान मिरजकर परशरामपंतानी लिहून पाठविलें होतें. सेवेसी श्रुत होये. हे विनती.

---

पै।। छ १३ रबिलाखर सन ११९१ हिजरी, बुधवार, तृतीये प्रहर.

श्रीनिवास

पु।। पत्र श्रीमंत राजश्री नानास्वामीचें सेवेसी विनतीजें रघोजी भोंसलें व दिवाकरपंतानी श्रीमंतास व कारभाऱ्यांस सांगितलें जें. हजरत बंदगानआलीचा व आमचा करार मामूल घांसदाणा घ्यावा यैसा नेम असतां, सवा दोन लक्ष रुपये आम्हास देतेंत, येणेकडून आंम्हीं फार खराबीत आलों. सांप्रत आंम्हीं कर्मळेकर निंबाळकराचे तालुक्यांतून व शरफौदौलाचे महालातून घांसदाणियाचा यैवज उगवून नागपूरास जातो. कारभारी यांनी उत्तर दिल्हेंजें नवाबसाहेब जे तुम्हास देतेंत हेच फार आहे. सांप्रत तुंम्ही नवीन कांहीं कराल तर लौकिकात प्रसिध्द होईल. जे आमचे समतें केले यास्तव कांहीं उपद्रव न करितां ज्या मार्गानें आलात त्या मार्गें जाणें म्हणून

प्रखर सांगितलें आहें. दिवाकरपंताचें लक्ष हुजुरांत आहेच, परंतु येथील कारभारी यांजकडूनही दृढ करून घेतलें जे हुजूरचे आज्ञेत राहांवे. कारभारियांचे सांगितलियाचे उतर दिवाकरपंती केलेंजे, तुमचे आज्ञेप्रमाणें हात पाय बांधून ज्या मार्गे आलो त्याच मार्गे जाऊ. सुमेरसिंगाचा पुत्र भोंसल्यासमीप होता. श्रीमंताचे दरखास्तीप्रमाणें भोसल्यानी कारभारीयांचे स्वाधीन केला. सांप्रत बेडी घालून पुरंदर गडावर ठेविला आहे. सेवेसी श्रुत होये. तामस माष्टी इंगरेज पूर्वी रघुनाथरायांकडील ज्वाबसाल करीत होता. कारभारी यानीं स्पष्ट सांगितलेंजे करनलाचे विद्यमाने जों करारमदार जाहला आहे त्याप्रमाणे जागीर देऊ. त्यानीं स्वस्थ राहावे. पूर्वील करारावितरिक्त दुसरी गोष्ट आम्हास बोलणें नांहीं. याजवरून माष्टिनाने रघुनाथराया-कडील ज्वाबसालाचा सिलसिला टाकून, करनलाचे विद्यमानें ज्यागीर वगैरेचा जो करार जाहला आहे त्याचें बदोबस्ताविषईचा ज्वाबसाल करीत आहे. इंगरेजाचे विद्यमाने दादासाहेबाचा श्नेह न करावा हे मानस कारभाऱ्यांचे. यास्तव करनलाचे कराराचा ज्वाबसाल केला. परंतु कारभारीयांचे मानस आहेजे रघुनाथरायाची समजाविश सात आठ लक्षाचे जागीरीवर जाहलीयांही करावी. सेवेसी श्रुत होये.

---

**A. R. No. 36.** १० सफर ११९३ हिजरी

२७ फेब्रुवारी १७७९

४

पुरवणी

बोरघांटावर आले. व बालाजीपंत वगैरे कूच करून त्यांचे रुखावर जाणार. ते समई कृष्टणराव ब (ला) ळ यानी सखारामपंतास आपले घरास नेऊन परस्परें वचनप्रमाण जाहले कीं रघुनाथराव पुन्हा दखील रियासत जाहले तरी कृष्टणराव यास कांहीं उपद्रव न लागावा. हे वर्तमान खुफिया, परंतु बालाजी जनार्दन व हरीपंतास कळलें. व कृष्टणराव स्वारीसमागमें न येतां पुण्यांत राहिले. बालाजी

जनार्दन वगैरे मळेगांवास गेले. व दादइलाहीकरितां फते जाहली. व इंगरज खजील होऊन मुंबईस गेले. त्यानंतर बालाजीपंत व हरीपंत व माहदाजी सिंदे यकदिल होऊन पुरंदरास आले. व सखाराम-पंतास कैद केले. या मसलहतींत कृष्टणराव बिलकुल खारीज केलें होतें. ते समई कृष्टणराव बलाळ यानीं बालाजीपंत व हरीपंत व माह-दाजी सिद्याची नालिश व हुजुरांत नादुरुस्त बदयेतकाद याचा तपसील सागितला. व बमोजिब इशारा दुसरा हुजूर लिहिणें म्हणोन फिदवीस सूचना केली. त्याउपरि महिना विसा रोजांत बालाजीपंतानी कृष्टणराव यांची तसफी केली. ते समईं रावजीनी सांगितले कीं आम्ही जो किसा सांगितला तो हुजूर न लिहिणें. राव म॥रनुलेचे जुबानी-चा म॥र विन्हा त्यांचे इतिला न ल्याहावा. व लिहिण्यांत पेंच, याक-रिता हुजूर इतिला केला नांहीं. त्याउपरि कृष्टणरावजीची आरजू फार होती व आहे कीं येक किला व जागीर द्यावी. त्यास कारपरदाज यांची समज आहे कीं कारभाराचे ज्वाबसालात हजारो रुपये रावजीस मिळत आहेत. मग जागीर किमर्थ द्यावी. त्यानंतर हैदरअलीखाना बा॥ रुपये वीस हजार रावजीस आले. ते रुपये सरकारांत देणें म्हणोन बालाजीपंतांनीं पैगाम केला याकरितां रावजी नाखुष होऊन पुण्यांत खानेनिसीन जाहले. सेवटीं रुपये वीस हजार रुपये कृष्टणराव-जीनी दिल्हे व नाखुष फार जाहले. सारांश बालाजीपंतासीं व हरीपंतासीं दिली-इतिफाक आहे. व कृष्टणरावजीसी कार्यकारण जरूरी व जे समई जे काम वारद होत आहे त्या कामापुरता स्नेह व शरीक मसलहत करीत आहेत व सांप्रत मसलहत व हरयेक तजवीज हरीपंताचे सलाहावितिरिक्त होत नांही. माहदाजी सिंद्यासी करार होता कीं कुलकामांत दखील करांवें व सिंद्याची आरजू होती, परंतु हरीपंताचे सलाहानें बेदखल केले. व पांच लाख रुपये प्रथमतां त्यानंतर वीस लाख रुपयाची भरती करून दिधली, किवा अधिक म्हणोन यैकिलें हे तपसीलवार वर्तमान हुजूर अर्ज करणे. हा आसीवर्वाद.

**A. R. No. 37.** सुमारें ८ जिलकाद ११९३ हिजरी
१७ नोव्हेंबर १७७९

श्रीनिवास

बालाजी बाजीराव यांचा वाका जाहल्यानंतर, रघुनाथराव पोख्त म्हणोन दौलतचे काररवाईकरितां मुख्तार जाहले व पंत-प्रधानांचा खिलअत माधवराव बलाळ यास जाहला. माधवराव खुर्दसाल होतें याकरितां रघुनाथराव व सखारामपंत याजवर कारभार सोपून, आपण अयशआराम करीत होते. बाबूराव फडनीस व त्र्यंबकरावमामा यांचा इतिफाक व सखारामपंतांसीं व उभयता म॥रनुलेसीं निफाक. गोपिकाबाई व गोपाळराव मिरजकर व बाबूराव फडनीस व त्रिंबकराव यांचा यका जाहला. व तजवीज़ केली कीं सखारामपंतासीं व रघुनाथराव यांसीं इतिफाक आहे. याचप्रमाणें रघुनाथराव सरदार व सखारामपंत कारपरदाज जाहले तरी माधवराव यांस कोण्हीं पुसणार नांहीं. व पसअंदाज होतील. याकरितां रघुनाथराव यांस कैद करावें. त्यानंतर सखारामपंत यांसही सजा पोंहचवावी. ते समईं सखारामपंताचा नवउरूज व मुतसद्यापैकीं चिंतो विठल व कृष्टणराव बलाळ व चिंतो अनंत व आबाजी माहादेव व रामचंद्र गणेश, व सरदारापैकीं नारो शंकर व विठल सिवदेव व होळकर व आणखीं लाहान मोठे सखारामपंताचे यैक्यतेंत. माहदाजी पुरंदरे यांचा लेंक नीळकंठराव पुरंदरे रघु-नाथराव यांचे शरीक होते. याकरितां सखारामपंतानीं हिकमतीनें रघुनाथराव यांस पुण्याहून काढून दिधलें. व राव म॥र नासिकास गेल्यानंतर नीलकंठराव पुरंदरे व सखारामपंत हेहीं राव म॥रनुलेसमीप गेले. त्यानंतर बाबूराव व त्रिंबकमामानीं पिराजी नाईक वगैरे फौज जमा केली. व रघुनाथरायांसमीप नारो शंकर व विठलराव सिदे व बमय फौज गेले. व सखारामपंतानीं हुजूरांत इलतिजा करून कुमकेस सरदार व फौजफेरोजी नेली. हुजूरचे फौजेचे इमदादीनें

माधवराव यांची सिकस्त होऊन दस्तगीर जाहले. व रघुनाथराव यांस फते जाहली. त्याउपरि बाबूराव फडनीस हुजूरचे पन्हांत आले. व त्रिबकराव यांस सखारांमपंतानी बेहुरमत केलें. त्या दिवसापासून फडनीस व त्रिबकराव यांचा इतिफाक व सखारामपंतासीं ज्यानी दुषमनीं. जनार्दनपंत, बालाजीपंत फडनीसाचे वालद, ते व बाबूराव बिरादर, याकरितां व सखारामपंतानीं फडनीसीचें काम चिंतो विठलास सांगितलें याकरितां जनार्दनपंतासी व सखारामपंतासीही निफाक व नाखुषी जाहली. त्या दिवसांत कृष्टणराव बलाळ सखारामपंतासमीप पेशदस्त होते. यलगंदलचे सफरेंत रघुनाथराव त्या जिल्यांत आवारा जाहले ते समई सखारामपंतानीं रघुनाथराव यांचे तरफेनें कृष्टणराव बलाळ यांस हुजूर ज्वाबसालाकरितां पाठविलें होतें. तें अवल येणें राव म।।राचें. त्याउपरि राजे प्रतापवंत बाहादरांचे दिवाणींत रघुनाथराव याचेच तर्फेनें कृष्टणराव हुजूर आले होते. सखारामपंतास हरकोण्हांसीं दुषमनी ज्यानी नव्हती. याकरितां व रघुनाथराव तलवन मिजाज, रियासतीस उपयोगी नांहींत, याकरितां माधवराव यांस पेशवाईवर पुन्हा कायम केलें. बाबूराव फडनीस खानेनिसीन जाहले. त्रिबकरावमामा बहुत फंदी व शरीर, याकरितां रघुनाथराव यांचे हमराह त्रिबकराव यानीं राहांवें, हा करार होऊन राहिले. व माधवराव यांचे कारपरदाज सखारामपंत जाहले. कृष्टणराव बलाळ सखारामपंताचे पेशदस्त, बमोजिब मामूल जाहले. माधवराव याची मिजाज जाहाल होती, याकरितां सखारामपंत कितेक काम आपले तरफेचे अकसर कृष्टणराव याजकडून घेत होते. व सखारामपंताचे तरफेनें माधवराव यांजसमीप कृष्टणराव मुख्तार जाहले. व सन ११८१ हिजरींत जानोजी भोसल्याचे तंबीनंतर



रघुनाथराव गोहदेस गेले. ते समई त्रिबकरावमामास बरोबर नेलें. व सखारामपंत व कृष्टणराव माधवराव मुतवफीसमागमें राहिले.

त्याउपरि माधवराव खुदपसंद जाहले व सखारामपंताचे सांगितल्यास बरखिलाफ वर्तणूक करूं लागले. सबब सखारामपंतानीं कामातून चित काढलें व हरयेक कामास कृष्टणराव बलाळास नमूद केले. राव-म॥रनुलेनीं अंत्यस्थ बातनींत सखारामपंताचे श्नेहाचा सिलसिला कायम ठेविला व जाहिरा माधवराव मुतवफी यांचे रफीक व मुकरब जाहले. परंतु हुजूरांत इतिफाक राखून दुसरे मुखालिफाचीं तंबी करावी, हे सलाह सखारामपंताची माधवराव यांस दिलनिसीन जाहली. व हुजूरचे ज्वाबसालाचे सिलसिल्यांत कृष्टणराव, याकरितां माधवराव यांजपासी मुकरब व मुसाहब राव म॥र होते. कितेका दिवसानंतर मोरो बाबूराव फडनीस यांनी दिवाणीचें काम केलें. ते समईं कृष्टण-राव बलाळ यांचा सिलसिला सखारामपंताचे निसबतीचा म्हणोन, परस्परें निफाक होता. कृष्टणराव बलाळ यांजकडील मखलसीचें काम मवकूफ करविलें व कामांत माजी जाहले. त्याउपरि माधवराव यांचा वाका जाहला. नारायणराव रईस जाहले. बमोजिब वसीयत माधवराव सात आठ महिनेपर्यंत सखारामपंत मदारुलमाहाम व मुख्तारीनें काम करीत होते. कृष्टणराव बलाळ दस्तगिरफ्ते सखा-रामपंताचे. परंतु चाल दुरंगी पाहून येक हुजूरचे ज्वाबसालाचा सिलसिला मात्र रावजीकडे कायम ठेविला. वरकड कोणतेही कामांत दखील नव्हते. हरीपंत फडके व बालाजी जनार्दन उभयतां नारायण-राव यांसमीप मुकरब होते. यानीं सखारामपंताविषईं पैशुन्य, सिकवा नारायणराव यांजसमीप सागून चितांत गिऱ्हे घातली. व सखा-रामपंतानीं कामातून चित काढिल. थोडकेच दिवसांत नारायणराव मारले गेले. त्यानंतर रघुनाथराव पेशवाईचे सरदारीवर कायम मुकीम जाहले. कृष्टणराव बलाळ माधवराव मुतफीचे मसलतींत शरीक होते. यासबब रघुनाथराव याची इतराजी कृष्टणराव यांजवर न्याहायत होती. सखारामपंत कृष्टणराव बलाळ यांची ज्यानब व राव म॥र सखारामपंताची ज्यानब परस्परें राखीत होते. व कृष्टण-राव यांचे बेइतिला कितेक म॥र बारहा फिदवीकडून हुजूर अर्ज करविला आहे. परंतु कृष्टणराव बलाळासीं व सखारामपंतासी

नाखुसी नव्हती. रघुनाथराव खुदपसंद व बेवास्ता हुजूरचे बदअंदेसीचा खियाल केला. सबब सखारामपंत आजुर्दा होऊन बाह्ना बिमारीचा करून रुखसत घेऊन गेले. कृष्टणराव बलाळ रघुनाथरायाचे तकयुदीकरितां हमराह राहिले. त्याउपरि बेदरचे मुकामीं जंगजदलचे मुकदम्यात फिदवीचे मारफातीनें कृष्टणरावजीचा पैगाम हुजूर अर्ज करीत होतों व रूबरू येऊन अर्ज केला. त्याची इतिला हुजूर आहे. हुजूरचे ज्वाबसालांत रघुनाथराव याजसमीप कृष्टणराव पुन्हा कायम जाह्ले. व हुजूरची रुखसत घेऊन गेले. त्यानंतर सखारामपंत व हरीपंत व बालाजी जनार्दनाची परस्परें अहदपैमान होऊन इतिफाक जाह्ला

३

पुरवणी

व हुजूर अर्जमारूज करावयाकरितां कृष्टणराव बलाळ यांस व फिदवीस केला. कृष्टणराव बलाळ यानीं जिवाजी रघुनाथ यांस हुजूर पाठविलें. व फिदवीनेंही अर्जी लिहिली ते मंजूर नजरआली जाह्ली. त्याउपरि कृष्टणराव बलाळ यानी हिकमतीनें रघुनाथराव यांपासून रुखसत घेऊन पुरंदरास गेले. व फिदवी बमोजिब इशारा सखारामपंत व रुकनदौला मरहूम पुरंदरास गेलों. त्याउपरि कृष्टणराव बऱ्हानपूरचे मुकामीं हुजूर मवकब मनसूरास गेले. फिदवी कारपरदाजासमीप हाजर होता. त्यानंतर माधवराव पंतप्रधानाचा तवलुद जाह्ला. व सखारामपंत व बालाजीपंत कांही दिवस बइतिफाक होते. परंतु कामाकाजाकरितां परस्परें चुरसाचुरसी होऊं लागली. त्यानंतर राजे अमानतराम हुजूरीहून पुरंदरास आले. सखारामपंताची व बालाजीपंताची परस्परें नाखुसी. याकरितां जागीरचे माहाल बारा लाखाचे गुजास्त जाह्ले व पूर्वी पाच लाख रुपये नजर केले होते. पुन्हा पांच लाख द्यावे म्हणोन करार असतां तफावतीची गोष्ट बोलूं लागले. त्यानंतर स्वारीमुबारक बऱ्हानपुरास गेली. व कारपरदाज मदारुलमहामहीं बऱ्हानपुरास गेले. व हुजूरची

मुलाजमत हासल केली. परंतु कराराप्र॥ पांच लाख रुपये दिल्हे नांहीत. सवारी मुबारक खुजस्तेबुनयादेस आली. व कारपरदाज पुरंदरास आले. त्यानंतर कृष्टणराव हुजूर औरंगाबादेस आले. ते समईं हुजूरचे दाबावर व हिकमतीनें इरशाद जाहला. या सबब सतरा लाखाचे माहाल गुजास्त करून हुजूर नियाज केले. त्याचे बाद हरीपंत पुरंदरास आले व बालाजीपंताची व हरीपंताची दोस्ती व इतिफाक जाहला. मोरो बाबूराव यास खारीज मसलहत व इतिफाक केलें. व सखारामपंतासीं निफाक शुरू जाहला. कृष्टणराव बलाळ यानीं येक गड किवा किला आपले सुपुर्द व जागीर चालीस हजार रुपयाची, पैकी वीस हजाराचे देहात आहेत. बाकी वीस हजाराची देणें म्हणोन पैगाम केला. तो कारपरदाजांनी कबूल केला नांहीं. सबब राव म॥र आपले स्थलीं सखारामपंत व बालाजीपंत व हरीपंत तिघांवरहीं आजुरदा व तमासबिनी करूं लागले. सखारामपंतासी व बालाजीपंतासी न्याहायत नाखुसी जाहली. ते समईं तुकोजी होळकर व मोरो बाबू(रा)व व सखारामपंत यकदिल होऊन फौज जमा करून पुरंदरास आले. ते समईं बालाजी जनार्दनानी सिद्यासी मवाफिकत व साजस करून मदतीस येणें व दरोबस्त पंतप्रधानाचे दौलतीचा बंदोबस्त करणें म्हणोन सिद्यासी पैगाम केला. ते समईं पाच लाख रुपये नख्त देण्याविषईं माहदाजी सिद्यानी पैगाम केला. रुपयाची निशा परस्परें करवावी म्हणोन बालाजी जनार्दन यानीं कृष्टणराव बलाळ यास पैगाम केला कीं लाख रुपये तुम्ही दस्तगर्दा देणें. कृष्टणराव बलाळ यानीं पसोपेश अंदेशा करून बालाजीपंताचा पैगाम कबूल केला नांहीं. याची गिन्ह बालाजीपंताचे चितांत राहिली. त्याउपरि हरीपंत फडके कर्नाटकचे स्वारीहून माघारा आले व माहदाजी सिंदे कोल्हापुराकडून पुरंदरास आले, व मोरो बाबूराव यांस माजी व मगलूब करून दस्तगीर करून कैद केलें. व बज्याबा पुरंदरे यांस कैद केले. या मसलहतींत कृष्टणराव बलाळ शरीक मसलहत नव्हते. त्यानंतर मुंबईकर इंगरेज व रघुनाथराव मुतफीक होऊन

४

## पुरवणी

येतमाद यकबयक कोणे प्रकारें पडेल. मगर हुजूरचे फिदवी मवरूसी आहेत. व बमोजिब कायदा हमेशा इनायतनामे कांहीं कामाचे सिलसिल्याचे येत आहेत. दरीविला इनायतनामे आले मांहींत परंतु येतील. व रघोतमराव आजीपर्यंत आमचे म्हणजे फिदवीचे गुमास्ते होते. सांप्रत हुजूरीहून मनसब व खिताब इनायत जाहला व खानजादीचे सिलसिल्यांत मुतजम जाहले. याकरितां हुजूरचे इरषादेवितरिक्त येक हरफ लिहिणार नांहींत. याप्रमाणें हरीपंतास उतर केल्यानंतर पंत म॥रानीं उतर केले कीं माधवराव मुतवफीपासून हुजूरचे तरफेचा ज्वाबसाल व कांही खुफिया मजकूर हुजूरचे इरषादेप्रमाणें तुम्हीं माधवराव यांस सांगत होतां व कृष्टणरायास बेइतिला. माधवराव तुम्हास म्हणजे फिदवीस हुजूर अर्ज करण्याचा म॥र सांगत होते. परंतु ते समईं रुकनदौला मरहूम दरंमियान होते. सांप्रत मोइनुदौला बहादर पंतप्रधानांचे ज्वाबसालाचे बानीकार. परंतु बहादर म॥रांचा व तुमचाही ज्वाब तुटला नांहीं म्हणतात. मगर हुजूर तुम्हीं अर्जमारूज करीत असांल. परंतु हुजूरीहून ज्वाबसालाचा सिलसिला तुम्हांकडें कोणते प्रकारचा ज्यारी होतो याची अजमाश व परीक्षा करून उपरांतिक तुम्हांसीं कांहीं बोलूं. फिदवीनें उतम म्हणोन प्रत्योतर केलें. दरींविला फिदवीजादे रघोतमराव यांचें खत छ ८ जिलकादचें फिदवीस मुजरद आले. त्यांत फिदवीजादे यानीं लिहिलें होतें कीं कृष्टणराव बलाळ यांनी पुण्यांत जो अहद व वचनप्रमाण करून तुलसी व बेलभंडार दिधला, त्याची फरामोसी रावजीस जाहली. व जिवाजीपंताचे इतिफाकाची हवा पैवस्त जाहली. मगर इनायात व तफजुलात हुजूरीहून मवरद अहवाल आहेत. व सिवाय ज्वाबसाल पंतप्रधान व कृष्टणराव वगैरे मोइनुदौला बहादरही मेहरबानी करितात. व राजे अमानतराम यांचा जो कदीम यखलास आहे त्यांत सरेमो तफावत नांहीं. त्यास मुलकी काम उमदें आहे.

ज्यांत रावजीनी पंतप्रधानाचे कामाची सरबराई व बेहबुदी व हुजूरची इनायत कारपरदाज बालाजीपंत व हरीपंताचे अहवालावर पाहिली असेल, त्या चालीनें चालत असतील. परंतु फिदवीस येक शुबाह न्याहायत जाहला कीं कृष्टणराव बलाळ यानीं जे गोष्ट न सांगावयाची व ज्या गोष्टीचे फाहिसींत रावजीचा इतबार पंतप्रधानांचे कारपरदाजासमीप किमपि न राहावा. याप्रमाणें बारहा बेदरचे खालीं रघुनाथरायाचे दौरांत व मोरो बाबूराव यांचे हगाम्याचे बाद सखारामपंतास कैद केल्यानंतर फिदवीसीं जे बोलिले व बमोजिब इशारा दुयम हुजूरअर्जी लिहिणें म्हणोन सांगितलें व मुलकी कामाचा तर कांहीच पडदा न ठेविला व आदरश इमान वचनप्रमाण जाहली. इतका खलामला असतां फिदवीजादे रघोतमराव यांसीही ज्वाब करून हुजूर व मोइनुदौलासीं खिलवत करितात. या करण्यांत फिदवीची नुकसानीं व रावजीसीं शरीक मसलहत असलियां फखर नांहीं. व रावजीचा स्नेह संपादून यांजपासून कांहीं नफा आपला व्हावा हे उमेद आजीपर्यंत धरली नांही व पुढें नांहीं. येक खौफ मात्र वाटतो कीं यांचे नाखुसींत गिरफ्तार बाला न व्हावें. याकरितां व हुजूरचा कांही नफा होईल यासबब राव म॥रनुलेसीं स्नेह राखितों. परंतु राव म॥राचे बोलण्याचा व कराराचा व इमानाचा इतबार फिदवीस न राहिला. त्यापक्षीं हुजूर तर उमदे कामाचा ज्वाबसाल रुबकार आहे. रावजीचे बोलण्याचा व इमानाचा विश्वास कोणे प्रकारें यईल? हरगीज येणार नांही. बहरहाल रावजी व रावजीचे पेशदस्त बेइमान व जमानसाज पके आहेत. ज्या चालींत हुजूरचा नफा व जाहिरी येखलास व वचनप्रमाणाचा दस्तायैवज न गुंते त्याप्रमाणें जमानसाजी करणें लागेल. कृष्टणराव बलाळ तर पोख्तकार आहेत. परंतु आजीपर्यंत सखारामपंत



रावजीचे मुरबी मुकमील होते. सांप्रत रावजी यकअंगी जाहले. व जिवाजी रघुनाथ व गोविंदराव भगवंत ना-आजुमुदाकार व वचनाचे व

इमानाचे मजबूत नांहीत. व आपली बुजरगी व फखर व नफा व्हावा हेच उमेद. व बाजीगर व फंदफरेब. मणनार येक म्हणवितात. व दानाईचा गरूर फार आहे. बलक गोविंदराव याचे बोलण्यांत कृष्टणराव मौनी देत आहेत. हुजूर अनेक प्रकारची अजिजी व आपली फिदवीयत व हुजूरचा नफा व नुकसान व बदनामी व नेकनामी याचे दरजे अर्ज करतील. बफजल इलाही हजरत खुदावंद न्यामत रईस दक्षणचे व अरस्तूचे दरज्याचे व अफलातूनचे कियाफाचे, बाजीगराची बाजी पशरफ्त व मंजूर होणार नांहीं, व सिरफ बाजीगर आहांत हा दोष व हरफ लाऊन खजील व लाजवाब होतील. याप्रमाणें इरषाद होईल. परंतु रावजीस फिलफौर बेइमानी व कराराची मजबुती नांहीं. याचा इलजाम हुजूरीहून लागावयाकरितां फिदवीस येक फिकरा अमलनालासेंत आला आहे. जिवाजीपंत व गोविंदराव भगवंतास खिलवतेंत बारयाब न करितां राव म॥रास इरषाद व्हावा कीं हैबतराव व रघोतमराव यासीं व तुम्हांसीं पडदा कोण्हेविषईं नांहीं. बलक ज्यानी गोष्टीची इतिला तुम्हीं यास दिधली व पेशज तुमचे येण्याचे रघोतमराव याचे जुबानी यैकिलें कीं हैबतराव व रघोतमराव यासीं व तुम्हांसी कांही करार व शरत जाहली आहे. त्याचे बरखिलाफ बिलफय तुमची चाल दिसती. याचा वास्ता काय? हे गोष्टी रावजीस फार शरमंदगी वारद करील व पुढें जे बोलणे हुजूर व करार करणे तो मजबूतीनें करतील. मगर या बोलण्याचे मसलतींत जिवाजी रघुनाथ व गोविंदराव भगवंत यांस हरगीज शरीक न करावा. हरसूरत हे दोघे शरीक मसलहत जाहले तरी गोविंदराव फार तरार आहे. हुजूरीहून इरशाद जाहला याचा ज्वाब रावजीस बोलूं न देतां आपण हजरत करीबी करून बोलेल. अखरश अर्ज करील कीं, हैबतराव यांसी वचनप्रमाण केलें. परंतु म॥रनुले व रघोतमराव यांजकडून राजदारी होणार नांहीं, व बिलकुल हुजूरचें काम बिगडेल व करोडींची नुकसानी हुजूरची होईल, हें आम्हास स्पष्ट कळलें. याकरितां कौलकरार व इमानाची शेरत येकीकडे ठेऊन, ज्या चालींत हुजूरचा नफा व पंतप्रधानाचे दौलतीचा बंदोबस्त, त्या चालीवर आम्हीं चालतों. येक खावंदाची नौकरी व

हुजूरची फिदवियत व दौलतख्वाही ह्या दोन्हीं गोष्टी आम्हांस मंजूर आहेत. या तऱ्हेन अर्ज करील. करोत. परंतु बेइमानी व बदकौलीची शर्त व परीक्षा जाहली व इप्तदायपासून फिदवीस काबूची लोकांची बेइमानी ठाऊक आहे व हुजूर तर जमीर मुनीर आईना ज्याहानुमा आहे. हरयेक उमदा व गरीब सर्वांची चाल रोशन आहे. याप्रमाणें फिदवीनें अर्ज केला. हे तकसीर, माफ व्हावी हे उमेद. व फिदवीची नौकरी व वोहदा खबररसाईचा याकरितां जुरत करून अर्ज केला आहे. ज्यांत नफा व सलाहदौलत ते तदबीर हुजूर मंजूर होईल. फिदवीची कमाल आरजू होती व आहे की फिदवीजाद्याची सरफराजी व्हावी, व हमचष्मांत आबरू वाढावी. ते बेवसीला. व अर्ज हूजूरीहून जाहली. याउपरि जे फिदवीजाद्याची सरफराजी होईल ते फिदवीस आपले सरफराजीपेक्ष्यां अधिक व खानजाद नवाजसीची प्रसिध सर्वत्र होईल. व फिदवीजाद्यास आरजू दिल्ली आहे कीं हुजूरची खानजादी जोपर्यंत ध्यानकाल किंवा आलम व आलमियांत करावी. मंजूर करणें येख्तियार खावंदाचा.

---

**A. R. No. 38.** — २४ रजब ११९४ हिजरी
२६ जुलै १७८०

पौ।। २ साबान

श्रीनिवास

पुरवणी श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. हुजूरचे इनायतनामे दोन किते व राजश्री बाळाजीपंत व राजश्री कृष्टणरावजीचे नांवचे इनायतनामे पाठविले ते उभयतांस दिल्हे. व सेवकानें इनायतनाम्याचें उतर अर्जी हुजूर स्वामीचे सेवेसी पाठविली आहे. हुजूर गुजराणावी. उभयतांचीं उतरें माघाहून येतील, ते सेवेसी पाठऊन देईन. छ १७ रजबचें पत्र व हुजूरचा इनायतनामा व चिरजीव रघोतमराव यांचा लिफाफा व रो। बालाजीपंत नाना व कृष्टणरावजीस हुजूरचे इनायतनामे सादर जाहले. त्याच्या नकला चिरजीवानीं पाठविल्या. त्या सर्व आजी छ २४ रजब, आषाढ वद्य येकादसी मंगळवारीं प्राथःकालीं पत्रें रवाना करतेसमई पावली. उतर माघाहून सेवेसी पाठवीन हे विनती.

---

पै।। छ २ साबान

श्रीनिवास

पुरवणी श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. मौजे निळें वगैरे देहातील प्र।। परभणी खालसा सरकारचा याकरितां सेवकानें दरख्वास्त मिनतवार करून जागीर मागितली. व स्वामीचे कृपेकरितां हुजूरीहून इनायत जाहली. जागीर घेतली. त्याचे दुसरे वर्षी जाबितजंग बहादरास परगणे मजकूर सुपुर्द जाहला. त्याचा उपद्रव अतिशय, परंतु वकारपूर्वकानें त्यास फार अगत्यवादानें सांगितलें व लिहिलें. व स्वामी तर साहित्यास अनकूळ. तीन च्यार वर्षेंपर्यंत दान तीनसे रुपये खर्च पडोन निर्वेध होता. सांप्रत जाबितजंग समाप्त जाहले. त्यांचे पुत्र यहतशामजंग परंतु बापापेक्ष्यां अधिक बहादर व गुणवंत. प्रथमतां मिरजा नजरबेग यानें रुपये घेतले, हे वर्तमान हुजूर व स्वामीस लिहिलें. व मोइनुदौलाचे आर्जव फख्त याच कामाकरितां. परंतु त्यांची आसीर्वादपत्रें मात्र येत आहेत कीं निर्मलेस लिहून पाठविलें. याउपरि बंदोबस्त होईल. हुजूरीहून ताकीद जाहली किवा न जाहली हें वर्तमान कळत नांही. सांप्रत निळे वगैरेचा बोभाट पुन्हा आला आहे कीं चराईस उंट वगैरे निर्मलेहून परभणी परगण्यांत आले. त्यानीं दीगर जागीरीच गांव त्यांत निळचापासून कडबा कही करून नेला. चौथाईवाला कडू उदाजी यास निर्मलकरानीं आपले आश्रयांत ठेऊन दस्तबरदास्ते रुपये देतात. व निळे वगैरे गांवापासून कचे वसूलाचे वाटणीपेक्ष्यां अधिक रुपये घेतो. याच प्रकारें आमिलाचा उपद्रव. सारांश, यावर्षीं पांचसे रुपये निळचाचे आले नसतील. सेवकास हुजूरीहून सरदारीचें काम असतें, तरी याप्रमाणें बोभाट व नालिस सर्वथैव हुजूर न येती. सांप्रत जें होणे तें हुजूरचे आश्रयानें. हुजूरीहून बंदोबस्त न जाहलियां कांहीच उपाय नांही. यास्तव विनतीजे निर्मल-करास प्रखर ताकीद हुजूरची व त्याचे वकीलास ताकीद जाहलियां उदुल-हुकुम करणार नांही. परंतु प्रखर ताकीद मात्र व्हावी किवा हुजूरीहून मदनजर सरफराजीवर त्यापक्षीं चिरंजीव रघोतमराव विनती करतील

त्याप्रमाणें यैवजी जागीर देऊन हे गांव सरकारचे खालस्यांत ठेवावे. याउपरि जें मर्जीस मुनासिब येईल ते आज्ञा करावी. त्याप्रमाणें वर्तणूक होईल हे विनती.

---

**A. R. No. 39.** (पो.ता.) ११ शवाल ११९४ हिजरी
१० अक्टोबर १७८०

पै।। छ ११ शवाल

श्रीनिवास

पुरवणी श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. हुजराती लोक वगैरे सिलेदारास पुण्यास येण्याविषई दोन ताकीद पत्रें गेली. परंतु अद्यापी लोक जमा जाहले नांहीत, याकरितां दसऱ्याचे मुहूर्तें राजश्री बालाजीपंत नाना डेरे गारपीरासमीप देणार, किवा जातीनें बालाजीपंत नाना डेरे दाखल होणार म्हणोन चर्चा बहुताचे मुख यैकिली. राजश्री हरीपंततात्याची छ १ शवालीं रात्रौ भेट जाहली. इतर वर्तमानें विचारिलीं व तात्यानी सांगितली. डेरे उभे करणार याचा निश्चय विचारिला. तात्यानी उतर केले कीं डेरे द्यावे याचा निश्चय आहे. परंतु तारीख व दिवसा (चा) निश्चय अद्यापि जाहला नांहीं. निश्चय जाहल्यानंतर सांगू. खारिज सर्वतोमुखं यैकिले वर्तमान हुजूर व स्वामीस श्रुत व्हावे यास्तव विनती लिहिली असे हे विनती.

---

**A. R. No. 40.** २१ जिल्हेज ११९४ हिजरी
१८ डिसेंबर १७८०

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सं।। नमस्कार विनती उपरि. येथील वर्तमान ता।। छ २० जिल्हेज रविवारपर्यंत मो। सासवड स्वामीचे

कृपे करून क्षेम असे. विशेष. पूर्वी छ ७ माहे म।।रीं हुजुरांत अर्जी व अखबार व विनतीपत्र सेवेसी पाठविलें. त्यानंतर श्रीमंत पेशव्यांचे जासूदांसमागमें अर्जी व हिंदवी पत्र छ १४ तारखेस पाठविली तें पावलें असेल. सांप्रत छ म।।रपर्यंत अखबार व अर्जी हुजूरांत व हिदवी अखबार सेवेसी पाठविली आहे. नवाब विकारुदौला बहादर व श्रीमंत राजश्री नानास्वामीं कुटुंबासहित आजी सासवडास आले. उदईक छ २१ रोजी राजश्री सखारामपंत बापू व बालाजीपंत नाना इस्तकबालास येऊन गडासमीप श्रीमंताचे डेऱ्यांत श्रीमंताचे दर्शनास घेऊन जाणार. भेटीनंतर सविस्तारें वर्तमान लिहीन. स्वामीकडील कुशळ वर्तमान प्रतिक्षणीं येत जावें याविषई श्रीमंत नानास निजध्यास आहे. स्वामीचें दर्शनाचा लाभ होय तोपर्यंत सदैव क्षेम वृत्त लेखनीं अंतःकरण ताप दूर करावयाविषयीं आपण समर्थ आहेत. सेवकाचे संरक्षणाचा पूर्ण अभिमान व कृपेची वृधी म्हणून श्रीमंत नानानी सेवकास वर्तमान सांगितलें. त्यास पोष्य मंडलीवर विशेष कृपा करावी हा प्रसिध गुण स्वामीचा. मीं तर अंगीकृतांत आहे. त्यापक्षीं माझा परामृष करून कृपाद्रिष्टीनें संरक्षण करीत जावें हे विनती लिहिणें किंवा करणें अयोग्य. परंतु कार्यासक्तास विचार थोडका असतो. त्या रीतीनें कृपेची अभिवृधीविषई मी कार्यासक्त आहे. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

श्रीनिवास

पु।। श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी पूर्वी छ २० जिल्हेजपर्यंत वर्तमान लिहिलें आहे. त्यानंतर छ २१ सोमवारीं सासवडापासून कूच करून श्रीमंतांचे व सासवडचे मध्यें पुरंदराचे रुखें नवाब विकारुदौला बाहादर यांचे लश्कर उतरलें. श्रीमंतानीच इस्तकबालास यांवें हा निश्चय होता. त्यास नवाब विकारुदौला बाहादरांनी निषेध केला कीं श्रीमंत आपले स्वाधीन नांहींत. मातोश्री वितरिक्त दूर येणें उतम नांहीं. त्यानंतर रा॥ सखारामपंतबापू

व बालाजी जनार्दन फडनीस व रास्ते वगैरे इस्तकबालास आले. सांप्रदायाप्रमाणें भेटी जाहल्या. श्रीमंत नानासीं सखारामपंत बहुत प्रीतीनें भेटले. त्यानंतर सखारामपंतानी सांगितलेंजे श्रीमंत गडाखालें येत आहेत त्या स्थलीं श्रीमंताची व नवाब विकारुदौला बाहादरांची भेट व्हावी. उभयतांची स्वारी गडाचे रुखें गेली. गडाखालें पाव कोसावर डेरा उभा करून श्रीमंत मातोश्रीसहित आले होते. राजश्री सखारामपंत बापू प्रथमतां डेऱ्यास गेले. माघोन बालाजीपंत व नवाब विकारुदौला बहादर डेऱ्यास आले. डेऱ्याबाहेर सखारामपंत पुढें येऊन हात धरून डेऱ्यांत गेले . श्रीमंत आपले पायानें चालत मातोश्रीपासून बसावयाचे स्थलीं आले व भेट घेतली. सहवासी लोकांची वळख आहे. संकेतानें समजतात. येक घटका बसले होते. त्यानंतर सर्वत्रांस अतर पानदान दिल्हें. श्रीमंतानी आपले हातें बहादर मवसुफास व श्रीमंत नानास विडे दिल्हे. बापूनीं उभयतांस अतर लाविलें. समारंभ बहुत प्रीतीचा जाहला. त्यानंतर निरोप घेऊन नवाब विकारुदौला बहादर आपले डेऱ्यास आले व श्रीमंत गडावर गेले. व बापू व नाना आपले शैन्यास गेले. भेटीनंतर तोफा खुसीच्या सुटल्या. सेवेसी श्रुत होय हे विनती.

## पुरवनी २*

ठवयाची तजवीजेत आहेत. विदित होये. छ २० माहे म॥री नवाब वकारु:दौला बहादुर व श्रीमत राये नानकराम सासवडास दाखल जाले. उदईक श्रीमताची व उभयेता कारभारी याच्या व वकारु:दौला याच्या भेटी होणार. छ२१ माहे म॥र रोज सोमवार वकारु:दौला बाहदुर आपला डेरा सोडून पऊन कोस आले. राजश्री बापू व नाना कोसभर पुढे इस्तकबाल येऊन याच्या भेटी जाल्या. उपराती श्रीमताचे भेटीस गेले. श्रीमत गडाखाले डेरा दिल्हा आहे तेथे आले होते. तेथे श्रीमताची भेट जाली. दोन घटका वकारु:दौला श्रीमताजवल बसले होते. उपरातिक रुख्त (रुखसत) होऊन आपले डेऱ्यास आले.

---

* या पूर्वीचें एक पान गहाळ दिसतें.

श्रीमतही याची (भे)ट घेऊ(न) मागती गडावर गेले. फिरग्याकडील जाबसाल काही अद्याप निश्चयात आला नाही. विदित होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. येथे आम्हाजवल जोडचा नवत्या म्हणोन बारा तेरा दिवस जाले. अखबार न आलियास सेवकाचा उपाये काये ? जोडचाविशई ताकीद जाली पाहिजे. विदित होये. बहुत काय लिहिणे. कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ति.

---

**A. R. No. 41.** ४ मोहरम ११९५ हिजरी
३१ डिसेंबर १७८०

श्रीनिवास

पुरवणी श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. स्वामीनीं छ ४ मोहरमचें पत्र पाठविलें त्यांत लेखनाज्ञा केली कीं चिरंजीव राजश्री रघोतमराव यांचे रुखसतीचा प्रकार ज्या कारभाराकरितां चिरजीव आले आहेत ते समग्र हुजूर आले आहेत. त्यापक्षीं हुजूरीहून रुखसत मागणें विदित असलियां विचार करून लिहिणं म्हणोन आज्ञा. त्यास स्वामीचे कृपेचे व मुरबीपणाचे योगें करून यजमानसाहब चिरंजीवाचे अहवालावर मुतवजे व सरफराजी केली. व स्वामीचे कृपे करून विशेष सरफराजीची उमेद आहे. त्यास यजमानसाहब मुतवजे अहवाल व स्वामी कृपावंत असतां चिरंजीवानी हुजूर राहांवें यांत चिरंजीवांची सादत व माझाही मनोदय व स्वामी स्वहिताची बहुत कृपेकरून आज्ञा करीत आहेत. याविषई मीं सेवेसी विनती ल्याहावी हा अर्थ नांहीं. स्वामीची कृपा व यजमानांची नवाजिस होण्यांकरितां बहुत प्रयत्न लागतो. ते कृपा व नवाजिस असतां रुखसत मागावी हे सलाह सर्वथैव नांहीं. परंतु

दोन तीन कारणें प्राप्त, यास्तव विनती लिहिली होती. प्रथम हेच कीं कृष्टणरावजीचा निजध्यास होता कीं हुजूरीहून इनायतनामा सादर व्हावा. म्हणजे सादत मुलाजमत हासल करून ज्यांत हुजूरची दौलतख्वाही तें काम करून देऊ. हुजूरचे दौलतख्वाहीचें काम याकरितां चिरजीव हुजूर आले व स्वामीचे कृपेकरून कृष्टणरावजीस इनायतनामा सादर जाहला व रावजी हुजूर गेले. चिरंजीवानी जो उद्योग केला तो सिधीस गेला. याउपरि चिरंजीवांचे रुखसतीस कृष्टणरावजीकडील कामाचा गुंता सेवकाचे मतें दिसत नांहीं. दुसरें कारणें चिरंजीवांची सरफराजी होऊन ते येथें असले म्हणजे मजला सर्व प्रकारें निश्चिंती. याकरितां चिरंजीवानीं रुखसत घ्यावी व स्वामीनी कृपा करून रुखसत त्यांची सरफराजी करून द्यावी म्हणोन विनती आहे. तिसरा प्रकार चिरजीवांची कन्या विवाहास योग्य. तिचा विवाह करावा म्हणोन गतवर्षीपासून उद्योग करितों. परंतु उद्योग सिधीस जात नांहीं. सांप्रत माघमासीं किंवा फालगुण शुध सप्तमीपर्यंत प्रयोजन सिधीस न्यांवें याकरितां चिरंजीवाचे रुखसतीविषईं विनती लिहिली होती. व पृथक पुरवणींत पुन्हा लिहितों हे विनती.

---

**A. R. No. 42.**      १७ सफर ११९५ हिजरी
१२ फेब्रुवारी १७८१

श्रीनिवास

पुरवणी. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. छ १० माहे सफरचें कृपापत्र चिरंजीव राजश्री राय रघोत्तमराव यांचे लिफाफियासह दारोग्याचे विद्यमानें डांकेवर रवाना केलें ते छ १७ माहे मजकुरी पाऊन संतोष जाहला. सेवेसी श्रुत होय. चिरजीवास पत्र लिहून सेवेसी पाठविलें आहे हे विनती.

---

**A. R. No. 43.** (पो. ता.) २९ रबिलाखर ११९५ हिजरी
२४ एप्रिल १७८१

पै॥ छ २९ रा॥खर १

श्रीनिवास

पुरवणी पत्र श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी.

विनती उपरि. हैदरअलीखानास गरूर अतिशय जाहला आहे कीं सांप्रतकाळीं साहेब अज्म व साहेब फौज व तरतुदी दक्षण हिंदुस्तानांत येक आपण आहे, वरकड सरदारास ध्यानास आणीत नांहीं. हुजूर हजरत बंदगानआलीचे जनाबेंत मोतमद नांहीं. याचा विस्तार पत्रीं ल्याहावयास माझी शक्ति नांहीं. खान म॥रचे लश्करची अखबार हुजूर येत असेल. यैसियासी हुजूरीहून हैदरअलीखानांचीं तंबी करावयाचाच अज्म होऊन त्याचें पारपत्य जाहलें पाहिजे. देशकाळानुरूप तंबीचा अज्म होणें सलाह दौलत नसल्यास, त्यासीं यैक्यता करून ताबेदारींत आणावा. इतिफाक होण्यांविषई हैदरअलीखानाची आरजू आजपर्यंत आहे व कांही देणे व घेणें याची शर्त दरमियान न आणितां बेवास्ता खान म॥रानें हुजूरचे इतिफाकांत यांवें. हे मर्जीमुबारकेचे खुलासा असलियां खान म॥राकडील विश्वासूक कोण्ही ग्रहस्त पुण्यांत आहे त्याचा सिलसिला आजिपर्यंत सेवकासीं आहे. फरासीस खान म॥रनुलेस येऊन भेटणार. व त्यांचे इतिफाकानें इंगरेजांस जेरदस्त केल्यानंतर फारच मगरूर होईल. याकरितां फरासीस मुतिफीक होऊन इंगरेजास जेरदस्त केलें नांहीं, त्यापूर्वीं त्यास हुजूरचे ताबेदारींत आणांवें. हे सलाहदौलत आहे म्हणोन कोण्ही ग्रहस्त सेवकाचा श्नेहित त्याचे बोलण्याचा आशय हुजूर व स्वामीस लिहिला असे. सारांश, हैदरअलीखानांचें पारपत्य करांवें किवा यैक्यता करावी हे दोन मार्ग बरे दिसतात. उपेक्षेंत ईश्वरइछेनुरूप जें घडावयाचें ते समयोचित होईल. हा निश्चये करून राहांवें. येथील कारपरदाजांस हैदरअलीखानाची खातरदारी फार दिसते. सांप्रत-

काळीं चितापासून खानम।।रनुलेचे रफीक व शरीक दिसत आहेत येविषईंची इतिला हुजूर व स्वामीस व्हावी म्हणोन लिहिलें असे हे विनती.

---

पै।। छ २९ रा।।खर

श्रीनिवास

पुरवणी. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. मोइनुदौला बहादरांस मसीरुलमुलकीचा खिताब होऊन हुजूरीहून सरफराजी जाहली म्हणोन राजश्री गोविंदराव कृष्टण यांचे मुखं वर्तमान यैकिलें. त्यास ते अमीर व पंतप्रधानांचे व हुजूरचे ज्वाबसालाचे बानीकार यास्तव भक्तीची प्रीति किंवा भयाची प्रीति, भक्तीपेक्ष्यां भयाची प्रीति अधिक असते. याकरितां मुबारकबादेची अर्जी व पांच रुपये ५ नजर येथोन धावजी व बाळू जासुदांसमागमें स्वामीचे सेवेसी पाठविले आहेत. यांच जासूदासमागमें किवा आपल्याकडील जासूद अथवा खादमाबरोबर अर्जीचा लिफाफा व नजरे ब।। रुपये ५ नवाब मवसुफास पावते करवावे. मुख्य यजमानसाहब बहुत कदरदान व स्वामी चितापासून कृपावंत यांत सेवकाची सरफराजी व मनोरथ श्रीकृपेकरून पूर्ण जाहले व होतील हा निश्चय आहे. विशेष काय लिहिणें हे विनती.

---

पै।। छ २९ रा।।खर

श्रीनिवास

विनतीजे. कोंकणी आंबसोल वाळलेंलें पका दोन सर धावजी वगैरे जासूदासमागमें सेवेसी पाठविलें आहे. पुन्हा दुसरे जोडीसमागमें दोन सेर पाठवण्यांत येईल हे विनती.

---

**A. R. No. 44.** २ जमादिलावल ११९५ हिजरी

२६ एप्रिल १७८१

पै।। छ ७ माहे जमादिलावल सन ११९५ हिजरी रोज गुरुवार दोन प्रहर दिवस आल्यावर डाकेवर मये सुलतानखा नूर रहमानखां दारोगे हरकारे.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. येथील कुशल ता। छ २ माहे जमादिलावल मु।। लष्कर दरजागा मौजे पुनालेनजीक चिचवड स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणोन स्वानंद लेखन आज्ञा करीत असिले पा।. विशष. येथील व(र्त)मान छ २८ माहे रबिलाखर रोज सोमवार प्राथःकाली विनंतीपत्र व हजूरात अर्जी व अखबार सरकारचे डाकेसमागमे रवाना केले. विनंतीपत्र पावोन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनतर येथील वर्तमान इग्रज चौक्यावर होते. हरीपंत व होलकर वगैरे भोवताले होते. लडाई शुरू आहे. हे वर्तमान अक्षरशा लेखन केले होते त्याजवरून ध्यानास आले असेल. राजश्री हरीपतानी नानास पत्र लिहिले होते. इग्रज चौक्यावर आहेत. भोवताल्या आमच्या फौजा आहेत. त्यासी व आम्हासी लडाई निकडेची होत असती. श्रीमताचे पुन्यप्रतापेकरून त्याचे पारपत्य होईल. चिता नाही म्हणौन लिहिले होते. त्याजवरून कारभारी बहुत संतोश जाले. दरबार वगैरे जाला होता. दोन घटका माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. शृत होय. छ २९ माहे रबिलाखर रोज मगलवार. करनल गाडर इग्रज चौक्यावर होता. तेथून पनवेलीस जाणार. पनवेलीस गेला म्हनजे मग याचा येत्न नाही. पनवेलीजवल कोसी आत कासी समुद्राची खाडी आहे व काही थोडी बहुत झाडीही आहे. चौक्यापासून पनवेली साहा सात कोस आहे. पुढे कल्यानी दहा बारा कोस आहे. व बेलापूर आठ नव कोस आहे. चौक्यापासून पनवेलीपावेतो मैदान आहे. इग्रजानी चौक्याहून

दो ती कोसाचे कूच केले. पुढे पनवेलीस जातो म्हणौन हरीपंत व होलकर वगैरे यानी बहुत निकड करून लडाई केली. मागून व पुढून व बाजूस लडाईचा डौल घातला. इग्रजास अवलून तेथे उभे केले. व इग्रजही तेथेच उभे राहिले. लडाई निकड करून मातबर केली. हरीपंत व होलकर वगैरे याजकडील पाचच्यारसे मणुश ठार व जखमी मिलून जाले. दोनतीनसे मणुश तो ठारच जाले. दोनतीनसे घोडी जाया जाली. इग्रजाकडीलही तीनच्यारसे मणुश ठार जाले. येक लाहान तोफ इग्रजाची यानी आनिली. हरीपंत वगैरे याचे लोकानी भाल्याने इग्रजाचे लोक हानिले. येथ परीयेत पोहचले होते. याप्रमाणे मातबर लडाई होऊन उभयेपक्षी मानसे फार जाया जाली. इग्रज दोन कोस कूच करून गेले होते तेथेच मुकाम करून राहिला. हरीपंत वगैरे यानी त्याचे अलीकडे दो ती कोसावर मुकाम करून राहिले. पुढे इग्रज जुरत करून पनवेलीस जाणार व लडाई वगैरे मातबर जाली यैसे वर्तमान येथे सध्याकाली कारभाऱ्यास आले. शृत होय. इग्रजासी व हरीपत व होलकर वगैरे यासी लडाई मातबर जाली व लडाई शुरू आहे. इग्रजाभोवते याच्या फौजा आहे व इग्रजही काही येक जेर आहे. परतु इग्रज साभालून पनवेलीस जाणार. इग्रज पनवेलीस गेला म्हनजे तो साभालून गेला यैसे आहे. शृत होये. छ ३० माहे रबिलाखर रोज बुधवार इग्रज आपले सर्व सरजामानसी पनवेलीस गेला यैसे वर्तमान आले. हरीपंत व होलकर वगैरे यानी बहुत निकड करून लडाया केल्या की इग्रजास पनवेलीस पोहोचू न द्यावे, सिकस्त करावा. याअर्थी लडाया बहुत निकटीच्या केल्या. मणुश वगैरे घोडी फार जाया जाली. सेवटी इग्रज आपले मजबूतीने पनवेलीस पोहचला. याचे मुद्याप्रमाणे हासिल न जाले. इग्रज पनवेलीस पोचला. तेथे मुकाम करून आहे. पुढे तो कल्यानीकडे अथवा बेलापुराकडे जाणार. हरीपंत वगैरे सर्वत्र येकत्र होऊन इग्रजाचे अलीकडे तीन च्यार कोसी मुकाम करून आहेत. पुढे पनवेलीजवल जाऊन लडाई करावी तो अर्थ न राहिला. इग्रज

पनवेलीस गला तेव्हा याचे हातचा गेला. पुढे इग्रज कल्यानीकडे अथवा बेलापुराकडे जाणार. त्यास रा। हरीपंत वगैरेही काही येक दिवस तेथे मुकाम करून माघारे येतील यैसे आहे. ज्या अर्थी इग्रज निघून गेला मग हे कशास राहातील ? मग काही येक दिवस तेथेच राहातात किवा माघारे फिरतात किवा दूरदुरून आनिक येखादी लडाई करितात हे वर्तमान आलिया लेखन केले जाईल. मुख्य प्रकार इग्रज निघून पनवेलीस गेला. शृत होये. छ १ माहे म॥र रोज गुरुवार ग्वालेरचा किला जाटाचे विद्यमाने फितुर करून सिद्यानी घेतला हे वर्तमान येक दोन विनंतीपत्री लेखन केले होते त्याजवरून शृत जाले असेल. तिकडील इग्रज ग्वालेरीकडे जात होते. ग्वालेरचा किला इग्रजापासून फितुराने गेला यैसे वर्तमान आहे. दुसरे वर्तमान आहे की इग्रजानी सिद्यावर छापा घातला. दोन च्यारसे मणुश जाया जाले. उपरातिक सिदे आपले फौजेनसी कायेम होऊन सावध जाले. त्याचा छापा मारून काहाडला. प्रस्तुत इग्रजासी व सिद्यासी लडाई शुरू आहे यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. हैदर नायेकासी व इग्रजासी लडाई होते यैसे वर्तमान आहे . नाईक म॥र याजकडील वकील दरबारास आले होते. नाईक म॥र यास पत्रे लिहिणार. शृत होये. इग्रज पनवेलीस गेला. तेथे पोहचला. रा। हरीपंत वगैरे तीन-च्यार कोस अलीकडे मुकाम करून आहेत. माघारे येतात किवा काही येक दिवस मुकाम करून राहातात हे वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. काल बुधवारी येथे प्रज्यन्य फार पडला. गारा विशेष पडल्या. काली जमीनीत मुकाम आहे म्हणोन मागे पुढे कोस आत कोस माल जमीन पाहून कूच करून राहानार. कूच जाल्यावर लेखन केले जाईल. शृत होये. छ १९ माहे र॥लाखर आज्ञापत्र सादर केले ते छ १ माहे म॥री सेवकास पावले. पावोन बहुत संतोश जाला. सदैव साप्रदायाप्र आज्ञापत्रे सादर करनार स्वामी समर्थ. बहुत काय लिहिणे. कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ति.

---

**A. R. No. 45.**

६ जमादिलावल ११९५ हिजरी
३० एप्रिल १७८१

पुरवनी २

राजश्री परशरामपताचे कूच दोन दीड कोसाचे जाले. परशरामपंत सडे मात्र आज तलावर होते. वर्जवार म्हणौन सोमवारी श्रीमताची व परशरामपताची भेट पुरदराखाले होनार. उपरातिक परशरामपंत कूच दर कूच मिरजेस जाणार. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. विदित होये. छ ३० माहे रा॥खरचे आज्ञापत्र व छ २७ रा॥वल परियेत ज्यवाबी इनायेतनामा सादर करून रा। हैबतराव याचे तैनाती जोडीसमागमे पाठविला, तो छ १५ माहे म॥री पावला. इनायेतनामा व आज्ञापत्र पावले. बहुत संतोश जाला. सदैव याचप्रकारे इनायेतनामे व आज्ञापत्रे सादर करनार स्वामी समर्थ आहे. सर्व प्रकारे सेवकास त्राते स्वामीचे चरन आहेत. बहुत काये लि (हिणे). कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ति.

———

**A. R. No. 46.**

१६ जमादिलावल ११९५ हिजरी
१० मे १७८१

श्रीनिवास

पोष्य हयबतराव गोपाळ सां। नमस्कार विनतीजे. येथील वर्तमान ता। छ १६ माहे जमादिलावल वैशाख वद्य चतुर्थी शुक्रवारपर्यंत मा। लश्कर नजीकचिंचवड स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. पूर्वीं छ १५ माहे म॥रीं डांकेवर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी विनतीपत्र पाठविलें ते दारागे हरकारें यांचे विद्यमानें प्रविष्ट होऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल.

सांप्रत छ म॥रपर्यंत अखबार लिहून सांप्रदायाप्रमाणें पत्रें डांकेवर पाठविली आहेत. सविस्तारें पत्रावलोकनी ध्यानास येईल. कृपापत्रें दोन येक छ ३० माहे रबिलाखरचें व येक छ २ माहे म॥रचे सेवकाचे तैनाती जासूदासमागमें पाठविली, ते छ १५ रोजी व छ १६ रोजी यथाक्रमेंकडून पाऊन बहुत संतोष जाहला. हुजूरीहून इनायतनामा सादर जाहला तो पाऊन सरफराजी जाहली. जासूदांचे विषईं मीं अर्जी लिहिली होती, त्याचा दरजवाब इनायतनामा सादर जाहला नांहीं. याकरितां हुजूर अर्ज करून इनायतनामा पाठविला पाहिजे. व इनायतनाम्याप्रमाणें वर्तणूक करावी. हा सांप्रदाय सेवकाचा व स्वामीसमान आप्त मुरबी यांची नीती याचप्रमाणें, यास्तव विनती लिहिली असे. मौजे रेलेस पटी न घेण्याविषईंची याद मखलसी होऊन सिध जाहली. याउपरि पत्र लिहून राजश्री भगवंतरावजीकडें पाठऊन देतों. बहुत काय लिहिणें. भोसल्याची फौज बंगाले प्रांताहून माघारा आली. याकरितां कारभाऱ्यांचे चिंतात वैषम्यतेचा भाव दिसतो हे विनती.

श्रीनिवास

अखबार लश्कर पंतप्रधान अज इ॥ छ १५ माहे जमादिलावल लगायत छ १६ माहे म॥र सन ११९५ हिजरी, रोज शुक्रवार. करनेल गाडर मौजे पनवेलीनजीक व हरीपंत व तुकोजी होळकर मौजे खालापुरानजीक आहेत. माधवराव रामचंद्र व बाजी गोविंद यांस सुरत प्रांती जावयाकरितां रुखसत करून उपरांतिक पंत म॥रनिले बोंरघांटावर येणार. व परशराम रामचंद्र मिरजकर येका दों दिवसा कूच करून मिरजेकडें जाणार. या वितरिक्त कितेक वर्तमान लिहून छ १५ माहे जमादिलावलीं प्रातःकालीं अखबार हुजूरपाठविली. त्याजवरून वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्यानंतर यैकिलें व जाहलें वर्तमान सांप्रदायाप्रमाणें दफेवार लिहिले असे. परशरामपंत मिरज-कराचे विद्यमानें सवारांची निगाहदास्त बाळाजीपंतानीं करविली होती. त्याचे तलबाचे रुपये पंत म॥रनिले आदा करीत नांहींत,

म्हणून परशराम रामचंद्र आजुर्दा व छ १४ रोज बुधवारीं फडनवीस म॥र परशरामपंताचे डेऱ्यास गेले होते. व समजाविश अकसर केली म्हणून पूर्वीं लिहिलेंच होतें. त्यास छ म॥रीं बाळाजीपंत म॥रनिलेचेथं गेले ते दिवसीं सवारांचे तलबेंपैकीं येक लाख रुपये नख्त म॥रनिलेस देऊन समजाविश केंली. त्यानंतर बाळाजीपंत आपल्या डेंऱ्यास आले. छ १६ रोजी परशराम रामचंद्र व रघुनाथराव नीळकंठ व हरिहरराव पुरुषोत्तम मिरजकर, फडनवीसाचे सूचनें-प्रमाणें भोजनास फडनवीसाचे डेंऱ्यास आले. भोजनोतर बाळाजी-पंतानीं त्रिवर्ग म॥र व या वितरिक्त कारकून वगैरें मिलून पंचवीस आसामियांस पैठणी, वस्त्रें, सेला, पागोटं व म॥रनिलेस बऱ्हानपुरी व जैनाबादी सेलें पागोटी व महमूदी थानें व किमखाब, दर आसामीस च्यार पारचें या प्रों बारा पारचें देऊन सर्वत्रांस रुखसत केलें. व अस्तमानपर्यंत परशरामपंत व बाळाजीपंत खिलवत करीत बसलें होते. अस्तमानीं पंत म॥रनिले आपल्या डेंऱ्यास गेले. सुरापुराकडें प्रशराम रामचंद्र यांनीं जांवें म्हणून फडनवीसाचे मानस होतं, परंतु परशरामपंतानी कबूल केले नांहीं. याजकरितां सुरापुराकडें जाणें म॥रनिलेचें सध्यां मवकूफ जाहलें. पुरंधरीं श्रीमंत पंतप्रधानांची भेटी घेऊन श्रीपंढरपुरास जाऊन देवदर्शन करून मिरजकडें जाणार या प्रों निश्चय ठरला. व छ १६ माहे म॥र रोज शुक्रवारीं हरिहर-राव पुरुषोत्तम फौजेसुधां कूच करून मौजे खडकीसमीप पुण्याचे रुखें गेले. परशरामपंत व रघुनाथराव जरीदा छ म॥रीं राहून फडन-वीसाकडे कांहीं बोलावयाकरितां त्रितीय प्रहरीं आलें. प्रहर रात्रपर्यंत फडनवीसासीं खिलवत जाहलें. उदईक छ १७ रोज मंदवारीं उभयतां म॥रनिले स्वार होऊन जाणार. व पुरंदरीं पंतप्रधानाची भेटी घेऊन पंढरपूरचे मार्गें मिरजकडे जातील म्हणून यैकिलें.

माधवराव रामचंद्र व बाजी गोविंद यांजसमागमें पांच साहा हजार फौज देऊन छ १४ माहे म॥रीं हरीपंत फडके यांणी उभयतां म॥रनिले रुखसत केले. वसई तालुकियांत जावयाकरितां कूच करून गेले म्हणून यैकिलें.

हरीपंत व तुकोजी होळकर घांटाखालें मौजे खोपवली व खाला-पुराचे दरमियान फौजसुधा आहेत. उभयेता म॥रनिले सत्वरच घाटावर येणार. व तुकोजी होळकर तळेंगांवासमीप छावणी करून राहणार म्हणून यैकिलें.

पुरंधरची हवा प्रकृतीस रास्त नांहीं म्हणून पंतप्रधानाचें मानस कीं पुण्यास यावें, व येविषईं बाळाजीपंतास बहुतवार सांगून पाठविलें. त्याजवरून पंत म॥रनिलेंनीं इंगरजाचा गलबा दूर जाहला म्हणून पंतप्रधानास पुण्यास आणावयाचा निश्चय केला. छ ३ माहे जमादिलाखरीं व छ १९ माहे जमादिलावलीं दोन मुहूर्तें नेमलीं आहेंत. प्रायाह छ १९ माहे म॥रींच पंतप्रधान पुण्यास येणार. छ म॥रीं न आले तर छ ३ माहे जमादिलाखरी येणार म्हणून यैकिलें.

श्रीनिवास २

पु॥ अखबार छ १६ माहे जमादिलावल सन ११९५ हिजरी. गोविंदराव गाइकवाड बाळाजीपंताचे लश्करास आले म्हणून पूर्वीं लिहिले होतें. छ १६ माहे म॥र रोज शुक्रवारीं गाइकवाड म॥राचे दरखास्तीप्रमाणें बाळाजीपंत वगैरें पंतप्रधानाचे मुतसदी व कारपर-दाज वगैरे आसाम्या पनासपर्यंत गाइकवाडाचे डेऱ्यास मामुली कायद्या-प्रों गेले. दर आसामीस पारचे दोन पैठणीं व जालनापुरी सेले पागोटीं बमय फडनवीस यांस दिल्हीं. त्यानंतर गुलाब व अतर पानदान देऊन गाइकवाड म॥रानीं फडनवीस वगैरे मंडलीस रुखसत केले.

करनेल गाडर जंगी सरंजामानसी अद्यापी पनवेलीनजीक मुकामात करून आहे. बलके छावणीहीं मौजे म॥रींच करणार म्हणून यैकिलें. खंडेराव भोंसले मुधोजी भोंसल्याचे पुत्र, कटक प्रांतास बंगाल्याचे रुखें गेले होते, ते माघारा नागपूरचे रुखें फिरले म्हणून खारिज यैकिल्याप्रों पेशजी लिहिलें होते. सांप्रत पंतप्रधानाच्या वकीलाचीं पत्रें कारभारीयांस आलीं. त्यांत म॥र लिहिला आहे कीं, खंडोजी भोंसल्याचे हमराही फौजेतील घोडीं फार सक्त जाहलीं. व कांहीं हाल लोकांत राहिला नांहीं म्हणून खंडेराव म॥र माघारा फिरलें. सत्वरच

नागपुरास येणार म्हणून वर्तमान यैकिलें. चंदी चंदावराकडें हैदर नाईकाची फौज कांही गेली होती, त्यांणी चंदीचा किला फितुरानें घेतला म्हणून येथे वदंता आहे.

छ १६ रोज शुक्रवारी दोन प्रहर रात्रीनंतर परशरामपंत व रघुनाथराव बाळाजीपंताचा निरोप घेऊन स्वार होऊन मौजे खडकीचे मुकामास गेले. तेथून पुरंधरास जाणार. श्रुत होये हे विनती.

---

**A. R. No. 47.**

१७ जमादिलावल ११९५ हिजरी
११ मे १७८१

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. येथील कुशल त।। छ १७ माहे जमादिलावल मु।। पुनालेनजीक चिंचवड स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणोन स्वानंद लेखन आज्ञा करीत असिले प।। विशेष. यथील वर्तमान छ १५ माहे म।।र रोज गुरुवारी प्राथःकाली विनंतीपत्र डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान शृत होईल. तदनतर येथील वर्तमान राजश्री परशराम रामचद्र व रघुनाथराव व हरिहरराव वगैरे दाहावीस आसामी नानाचे येथे डेऱ्यास भोज्यनास आले होते. रघुनाथराव व हरिहरराव वगैरे यानी भोज्यने केली. राजश्री परशरामपंत यानी भोज्यन केले नाही. कारन की त्याची मातोश्री शात जाली आहे म्हणोन वर्षभर कोठे भोज्यनास जात नाहीत. म्हणोन परशरामपतानी भोज्यन केले नाही. वरकडानी भोज्यने वगैरे केली. परशरामपंत वगैरे आदिकरून दाहा वीस असाम्यास वस्त्रे दिल्ही. याप्रमाणे समारंभ होऊन उपरातिक परशरामपताचा व नानाचा खिलवत जाला. खिलवत जाल्यावर रा।। दौलतराव घोरफडे, मुराररराव घोरफडचाचे बधु हे परशरामपताचे समागमे आहेत, हे नानाचे भेटीस आले होते. नानाची व घोरफडे

म।।र याची भेट जाली. दोन घटका बसले होते. उपरातिक घोरफडे म।।र उठून गेले. परशरामपंत सध्याकालपावेतो नानाचे डेऱ्यास होते. उपरातिक ते आपले डेऱ्यास गेले. उदईक परशरामपताचे कूच होनार. वर्तमान होते की परशरामपंत कूच करून सुरापुरचे रुखास जानार. उपरातिक मिरजेकडे जाणार यैसे होते. प्रस्तुत वर्तमान आहे परशरामपंत सुरापुराकडे न जाता पढरपुराकडून मिरजेस जाणार. मग काये निश्चये होऊन कोन्हीकडे जातील हे लेखन केले जाईल. बहुत करून मिरजेस जातील यैसे असे. शृत होये. इग्रज तो पनवेलीस आहेत. राजश्री हरीपंत वगैरे अलीकडे दाहा कोसाचे अतराने आहेत. हरीपत वगैरे घाट चहडून वरते येणार. वरते आलियावर घाटाचा बदोबस्त करून हरीपत व नाना येकत्र जालिया पुन्यास जावे यैसां निश्चये आहे, व श्रीमंतही पुन्यास येणार याप्रमाणे निश्चयात आहे. त्यास नानासी व परशरामपतासी खिलवत जाला. खिलवताचा भाव यैकिन्यात आला की इग्रजाचे पारपत्य न होता तो पनवेलीस आहे. अद्याप कोन्हीकडे जात नाही. तस्मात तेथे छावनी करितो, कदाचित त्याने तेथे छावनी केल्यास घट दाहा पधरा कोस आहे. यैसे असता शह सोडून पुन्यास जावे. कदाचित त्याने चाल करून घाट घेतला तेथे पाच च्यार पलटने ठेऊन खाले त्याने छावनी केल्यास पेच भारी पडल. याअर्थी हरीपताने घाटाखाले छावनी करावी. व आम्ही जेथे आहे तेथेच छावनी करून राहू. यैसी भवति न भवति परशरामपतासी होऊन हरीपतास व होलकरास नानानी पत्रे लिहिली की, ज्याअर्थी इग्रजाचे पारपत्य न होता तो पनवेलीस आहे, त्यास तुम्ही घाट न चहडता खाले घाटाजवल छावनी करावी. आम्ही मुकाम म।।रींच छावनी करू. यैसे पत्रे लिहिली कारन की इग्रजास शह पडावा. यैसी पत्रे यानी हरीपतास लिहिली. परतु घाटाखाले हरीपंत छावनी करितात यैसे नाही. फौजेचा गवगवा, अन छावनीही घाटावर अथवा खाले हरीपंत करितात यैसे नाही. परतु वदता यैसी यानी घातली आहे की इग्रजास शह पडावा. राजश्री बाजीपताची रवानगी सुरतअठाविशीकडे करावयाचा निश्चये

जाला आहे. त्याची रवानगी जालियावर हरीपंत घाट चहडून वरते येणार. जेष्ट सुद ५ पचमीस नाना हरीपतासहित पुन्यास दाखल होनार यैसे आहे. मग काये निश्चये होईल हे लेखन केले जाईल. शृत होये. श्रीमत माहे म।।री छ १९ वीस पुन्यास दाखल होनार यैसे आहे. शृत होये. छ १६ माहे म।।र रोज शुकरवार राजश्री परशरामपंत फौजेसहित कूच करून वानोडीस गेले. उदईक पुरदरास जाणार. पुरदरास जाऊन श्रीमताची भेट घेऊन पुढे कूच दरकूच परशरामपंत मिरजेस जातात. दोन हजार फौज परशरामपताची येथे राहनार. राजश्री नाना फडनीस वगैरे दाहावीस असाम्यासहित गोविदराव गायेकवाडाचे डेऱ्यास बहुमानास गेले होते. गायेकवाड म।।र यानी नानास वगैरे मडलीस वस्त्रे दिल्ही. उपरातिक नाना आपले डेऱ्यास आले. शृत होये. राजश्री बाजीपंताची रवानगी चिंचनी तारापुराकडे गुजरातचे लत्यास केल्यानतर हरीपंत घाट चहडून वरतें येणार यैसे वर्तमान आहे. शृत होये.

श्री

छ २ माहे जमादिलावलचे आज्ञापत्र राजश्री हैबतराव याचे तैनाती जोडीसमागमे पाठविले ते छ १६ माहे म।।री पावले. पावोन सतोश जाला. सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर करनार स्वामी समर्थ. रा॓ परसरामपंत याचे फौवजचे कूच होऊण आज गेली, ते सडे नानाचे डेऱ्यास आलेत. खिलबत होऊण मुकामास जातील.

---

**A. R. No. 48.**

२० जमादिलावल ११९५ हिजरी
१४ मे १७८१

पै।। छ २७ जमादिलावल सन ११९५ हिजरी रोज मंगलवार अस्तमान सरकारच्या डाकेबराबर आले, म।। दारोगे_हरकारे.

## १३०

### श्रीनिवास

पोष्य हैबतराय गोपाळ सां। नमस्कार विनतीजे. येथील वर्तमान ता। छ २० माहे जमादिलावल वैशाख वद्य अष्टमी भौम्यवासर पर्यंत मु।। लष्करनजीक चिंचवड, स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केलीं पाहिजे. विशेष. पूर्वी छ १६ माहे म।।र पर्यंत अखबार लिहून छ १७ माहे म।।रीं हुजूर अखबार रवाना केलीं त्याजवरून वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रत छ म।।रपर्यंत अखबार लिहून सांप्रदायाप्रमाणें अर्जी व अखबार हुजूर व स्वामीचे सेवेसी विनतीपत्र डांकेवर दारोगे हरकारें यांजकडें पाठविलें असें. म।।र-निले प्रविष्ट करतील. हुजूरीहून डांक बसवण्याविषईं दारोग्यास आज्ञा जाहली व सेवकास इनायतनामा आला. त्यांत इरशाद होता कीं सत्वर वर्तमान कळत जांवें. याकरितां डांक बसविली आहे. डांकेवर अखबार पाठवीत जाणें. सेवकाचे निगाहदास्ती व तैनाती जासूद डांकेवर बसवणें म्हणोन आज्ञा नांहीं व दारोग्यानी लिहिलें की डांकेस उणे कमती जासूद जाहलियां साहा सात जोडया देणें. त्यास काम सरकारचें व इकडील उपयोगी व पत्राचा सिलसिला याच संमधीचा या अर्थी व हुजूर विचारून परवानगी दारोग्यानीं घेतली म्हणोन लिहिलें किवा कोणे प्रकारें म्हणोन संशय आणिला. परंतु जोडचा साहा डांकेवर बसविल्या व हुजूर अर्जी व स्वामीस पत्र लिहिलेंजे. दारोग्याचे लिहिल्यावरून जोडचा डांकेवर बसविल्या आहेत. याविषईं काय आज्ञा त्यास स्वामीनीं स्पष्टन लिहिलें व हुजूरचे इरशादेप्रमाणें कांहीं आज्ञा लिहिली व माघाहून इनायतनामा पाठऊं म्हणोन आज्ञा केली. त्यास इनायतनामा सिध जाहला असेल तो डांकेवर पाठवावा. किंवा येथोन जोडी उदईक रवाना करितों त्याजसमागमें पाठऊन द्यावा. डांकेवर पाठविल्यासही माझे मते चिता नांहीं. याउपरि जे ध्यानास यईल त्याप्रमाणें अमलांत येईल. परंतु सेवकानें अर्जी लिहिल्याचें उतर यांवें व येविषईं हुजूर अर्ज करून उतर पाठवावें. बहुत काय लिहिणें. चिरजीव रघोतमराव यांस

सेवेसी पाठवायाचा उद्योग केला आहे. निश्चय करून पुन्हा सेवेसी विनती लिहीन हे विनती.

———

**A. R. No. 49.** २० जमादिलावल ११९५ हिजरी
१४ मे १७८१

पै॥ छ २७ जमादिलावल सन ११९५ हिजरी

श्रीनिवास

अखबार लष्कर पंतप्रधान. अज इ॥ छ १७ माहे जमादिलावल लगायत छ २० माहे म॥र सन ११९५ हिजरी, मंगळवार. पंतप्रधान पुरंधरीहून छ १९ माहे जमादिलावली किंवा छ ४ माहे जमादिलाखरी पुण्यास येणार, व परशरामपंत मिरजकर छ १६ माहे म॥रीं कूच करून गेले. पुरंधरी पंतप्रधानाची भेटी घेऊन पुढे मिरजकडें जाणार. व हरीपंत व तुकोजी होळकर मौजे खोलापुरावर व करनेल गाडर पनवेलीनजीक आहे. सुरत प्रांती जावयाकरितां माधवराव रामचंद्र व बाजी गोविंद यांस छ १४ माहे म॥र रोज बुधवारीं हरीपंतानी रुखसत केले. नकल मकान करून येका कोसावर जाऊन राहिले आहेत. या वितरिक्त कितेक वर्तमान छ १६ माहे म॥रपर्यंत लिहून छ १७ रोजी अखबार हुजूर रवाना केंली त्याजवरून वर्तमान श्रुत जाहले असेल. सांप्रत यैकिलें व जाहलें वर्तमान छ २० रोजपर्यंत सांप्रदायाप्रमाणें दफेवार लिहिलें असें.

परशरामपंत छ १८ रोज रविवारीं पुरंधरास गेले. छ १९ रोज सोमवारीं प्रातःकालीच पंतप्रधानांची भेटी घेऊन तेच समईं रुखसत मिरजेस जावयाकरितां घेतली. रुखसतीचे वेळेंस पंतप्रधानानीं पंत म॥रनिलेस वगैरे जेवाहर व वस्त्रें दिल्हीं.

पुरशराम रामचंद्र

३ जेवाहर रकम

  १ सिरपेंच मुरसा
  १ मोत्याची कंठी
  १ चौकडा
  ---
  ३

५ वस्त्रे जैनाबादी

  १ पागोटं
  १ सेला
  २ ज्यामेवार थान
  १ किमखाब
  ---
  ५

रघुनाथराव नीलकंठ,
परशरामपंताचा पुतण्या

२ जेवाहर

  १ कंठी मोत्याची
  १ चौकडा
  ---
  २

पारचे बऱ्हानपुरी

  १ पागोटं
  १ सेला
  २ ज्यामेंवार थान
  १ किमखाब
  ---
  ५

हरिहराव पुरुषोत्तम

२ जेवाहर

  १ कंठी मोत्याची
  १ चौकडा
  ---
  २

५ वस्त्रें बऱ्हानपुरी

  १ पागोटं
  १ सेला
  २ ज्यामेवार थानें
  १ किमखाब
  ---
  ५

दौलतराव घोरपडे, मुऱ्हार-
राव घोरपड्याचा पुतण्या यास

२ जेवाहर

  १ सिरपेंच
  १ चौकडा
  ---
  २

५ वस्त्रें पैठणी

  १ पागोटं
  १ सेला
  १ किमखाब
  २ ज्यामेवार थान
  ---
  ५

या प्रमाणें जेवाहर व वस्त्रें पंतप्रधानानीं परशरामपंत वगैरेंस देऊन रुखसत केले व पंत म॥रनिलें मिरजकडें कूच करून गेले

पंतप्रधानाचे मानस पुण्यास यावयाचें, व येविषईं पैहम बालाजी-पंतास पत्रें येत गेली. त्याजवरून पंतप्रधानांस पुण्यास आणावयाचा निश्चय केला म्हणून पूर्वीं लिहिलें होतं त्यास बाळाजीपंताचे सूचनेप्रमाणें छ १९ माहे म॥र रोज सोमवारीं प्रातःकाली पंतप्रधान

पुरंधरीहून स्वार होऊन छ म॥री अस्तमानी पर्वतीसमीप आलें. हवेली दाखल व्हावयाचे मुहूर्त रात्रौचं होतं. याजकरितां बेवीस घटका रात्र गुजरल्यानंतर छ म॥रीं पंतप्रधान हवेली दाखल जाहलें. हवेंली दाखल जाहले म्हणून खुषीच्या तोफा पंचवीस सोडल्या. जनार्दन आपाजी वगैरें हमराह होते. त्यांनी नजरा केल्या. कृष्टणराव बलाळ पुण्यांत आहेत. ते श्रीमंताचे भेटीस छ म॥रीं गेले होते.

पै॥ छ २७ जमादिलावल सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास २

पु॥ अखबार छ २० माहे जमादिलावल सन ११९५ हिजरी. माधव रामचंद्र व बाजी गोविंद यांनी सुरत प्रांती जाऊन हंगामा करावयाकरितां छ १४ माहे म॥र रोज बुधवारीं हरीपंतापासून रुखसत जाहलें म्हणून पेसजी लिहिलेंच आहे. त्यास पंत म॥रनिले समागमें फौज जाणार त्यांची समजाविश होत नांहीं. माघील रोजमरें बाकी राहिले आहेत ते देणे म्हणजे जाऊं. या प्रमाणें आड पडली आहे म्हणून छ १८ रोज पर्यंत म॥रनिले कूच करून गेले नांहींत. छ १९ रोजी तीन कोसाचें कूच करून गेले. परंतु लोकाची समजाविश होऊन रुपये पावज्योपर्यंत म॥रनिल पुढें जात नांहींत. हरीपंताचे पासखातरेंकरितां छ म॥रीं कूच करून अलाहिदा जाहलें आहेत.

करनेल गाडर आजपर्यंत जंगी सरंजामासहित पनवेलीनजीक होंता. सांप्रत म॥रनिलेकडील वर्तमान.यैकिलें कीं करनेल म॥रानें मौजे पनवेलीनजीक खाडीचे आश्रयास दोन पलटणें ठेऊन वरकड जमीयत खुष्कीचे मार्गानें झाडून कल्याणीस पाठविली, व आपण जातीनें मुंबईस कौसलाकरितां गेला आहे. या प्रमाणें बाळाजीपंतास हरिपंतानीं लिहिलें आह म्हणून यैकिले.

हरीपंत फडके व तुकोजी होळकर सत्वरच घांटावर येणार म्हणून पूर्वीं लिहिलें होतें. त्यास गाडरानें पनवेलीहून आपली जमीयत

कल्याणीस पाठविली व पंत म।।रनिले वगैरें घांटावर आल्यास येखाद्या किल्यास इंग्रेज लागतील. शह सोडून जाणें मुनासब नांहीं म्हणून सध्या आठ च्यार दिवस बोंरघांटावर म।।रनिले येत नांहींत. व मौजे खालापुरानजीक पाण्याची किलत फार म्हणून कल्याणीचे रुखें मौजे दंहींगांवावर पंत म।।रनिले येका दों दिवसां जाणार म्हणून यैकिलें.

परशरामपंतासमागमें सात आठ हजार फौज होती. त्यास सध्या फौज ठेवावयाचें प्रयोजन नांहीं म्हणून पंत म।।रनिलेनीं लोकास निरोप दिल्हा व पुंन्हा देत आहेत. या उपरि जें वर्तमान होईल ते सेवेसी लिहिण्यांत येईल हे विनती.

---

**A. R. No. 50.** २२ जमादिलावल ११९५ हिजरी
१६ मे १७८१

श्रीनिवास

पौष्यें हयबतराय गोपाळ सां। नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान त।। छ २२ ज।।लावलपर्यंत वास्तव्य सासवड स्वामीचे कृपेकरून क्षेम असे. विशेष. पूर्वी छ १७ माहे म।।रीं पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असल. सांप्रत छ १० माह म।।री कृपापत्र पाठविलें तें छ २१ रोजी पावलें. स्वामीचे आगमनाचा म।।र रो। जिवाजी रघुनाथ यानीं श्रीमंत बापूस लिहिला होता. ज्यांत बंदगानआलीचा संतोष व यजमानाचे व यांचे स्नेहाची वृधी, तोच प्रकार स्वामीचे आगमनोत्तर घडावा यैसा प्रकार राजश्री कृष्टणरावजीनी योजिला आहे. इकडील वर्तमान. आनंदराव रास्ते आपले प्रांताचे बंदोबस्ताकरितां विज्यापूर प्रांती गेले आहेत. रो। वामनराव यानी श्रीमंतासमीप राहांवें हा कारभाऱ्यांचा मनोदय. मिरजेस जाऊन पुन्हा समयास सत्वर यांवें यास्तव निरोप घेऊन जाणार. रघुनाथरायांकडील वर्तमान बापूचे मुखोदगत यैकिलें कीं नर्मदा उतरोन आले.

चांदवडापर्यंत आल्यानंतर सिंदे व होळकर उभयतां सरदारातून येकानीं श्रीमंत पंतप्रधान स्वामीसमीप येऊन करारमदार निश्चयांत येईल. सरदारांचे रदबदलीकरितां कांहीं अधिकउणें यैकांवें लागेल या प्र॥ बापूनी सांगितलें. लोकिक चर्चा यैकतों कीं रघुनाथरायानीं कितेक खानदेशप्रांतीचे कमाविसदारास पत्रें पाठविलीं आहेत कीं सखाराम भगवंत व बाळाजी जनार्दन यांजकडें वसूल न देणें. हाही म॥र बापूस विचारिला. उतर केलें कीं असत्य आहे. रो मोरो बाबूराव यांचे यैक्यतेंचा प्रकार हा काळ घडिला नांहीं. रो कृष्टणराव बलाळ छ म॥रपर्यंत पुण्यांत आहेत. छ २४ जमादिलावलीं येणार म्हणोन त्यांज-कडील कारकून सांगत होते. आपले येण्याचे संधीत येतील. रो धोंडोराम कृष्टणरावजीसमागमें आले व बापू व नानाची भेट रावजीचे विद्यमानें घेतली. रावजी पुण्यास गेले त्या समईं समागमें गेले. रघुनाथरायांकडील लक्ष ठेवीत होते म्हणोन त्याजवर शब्द आला आहे. अद्यापि रघुनाथरायांकडील फितुर तुटला नांहीं, व येथेंहीं कितेक उभयपक्षीचे आहेत. यास्तव कोणाची भेट न घेतां रावजी-चाच समागम धरला आहे. मदगिरीचा किल्ला टिपूनें घेतला म्हणोन पूर्वीं सशयात्मक लिहिलें होतें. सांप्रत कलमी वर्तमान आलेजे मदगिरी घेऊन चेनरायदुर्गास माहासरा केला आहे. तें स्थळ घेत-ल्याचप्रमाणें. तेथोन गुरमकोंड्यास जाणार. रो भेवानराव प्रतिनिधीचा प्रांत श्रीमंताचे जप्तींत होता तो भवानरायास देविला राव म॥र निरोप घेऊन किले वगैरे माहालाचे बंदोबस्तीस जाणार श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

**A. R. No. 51.** — १६ जमादिलाखर ११९५ हिजरी

९ जून १७८१

२

पुरवणी दुसरी

म राहिले यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलि-

यास लेखन केले जाईल. श्रुत होये. हिंदुस्थान प्रांती सिंद्यासी व इंग्रजासी लडाई होती. प्रस्तुत वर्तमान आहे कीं इंग्रज कोल्हर-सिपरीहून सिंद्याचा शह सोडून माघारा गेले. व सिंदे फौजेसहित त्यांचे पाठीमागे लागले आहेत यैसे वर्तमान आहे. सिंद्याचे दिवाण राजश्री बाळाराव मृत्य पावले हे वर्तमान पूर्वी लेखन केले होते, त्याजवरून ध्यानास आले असेल. मागती सिंद्याकडील वर्तमान आल्यास लेखन केले जाईल. श्रुत होये. दरबार वगैरे जाला होता. श्रीमंत वाड्यांत घोडी वगैरे फिरवीत असतात व तीरंदाजी करीत असतात. विदित होये. छ १५ शुक्रवार वाराणसीकर राजे बलवंतसिंग याचा पुत्र याणे पूर्वी इंग्रजाचे पारपत्य करून इंग्रज मारले हे वर्तमान पूर्वी सविस्तर लेखन केले होते, त्याजवरून ध्यानास आले असेल. प्रस्तुत वर्तमान आहे कीं मागती ते इंग्रज जमले. त्यास शामील सुज्यायेतदौलाचें पुत्र जाले. इंग्रज व सुजायेतदौलाचे पुत्र येकत्र होऊन वारणसीस आले. वारणसीचे ठाणे घेतले. वाराणसीकर बलवंतसिग राना याचा पुत्र धरला यैसे वर्तमान आले आहे. मागती तिकडील वर्तमान आलियास लेखन केले जाईल. श्रुत होये. राजश्री नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. उभयेताचा खिलवत जाला. खिलबत होऊन नाना आपले घरास आले. खिलबतीचा भाव यैकिल्यात आला कीं राजश्री कृष्णरावजीकडील पत्रे आली होती ते वाचली. पत्राचा भाव यैकिल्यात आला कीं येजमानसाहेब तहाचे काम आपले मुद्या-प्रो करून घेणार, येविसी काये मर्जी ते लिहून पाठवावी यैसे रावजीनी कारभारीयास लिहिले होते. त्याचे उतर येथून कारभारी काय लिहितात हे पाहावे. दुसरे माहे म॥री वद्य सप्तमीस र॥ नाना डेरे दाखल होणार. याअन्वये खलवत जाला यैसे यैकिल्यात आले. नाना डेरे दाखल जालियास लेखन केले जाईल. श्रुत होये. छ १६ शनवार. राजश्री बाजीपंत अणा माहे म॥री छ १८ स बाहेर निघून डेरे दाखल होणार यैसे वदंता आहे. डेरे दाखल जाल्यास लेखन केले जाईल. श्रुत होये . राजश्री गोविंदराव गायेकवाड याची उभारणी करितात . त्यांजवल हजार दीड हजार स्वार जमा

जाले आहेत. परंतु लोकास द्यावयास पैसा नांहीं हे पूर्वी विनंतीपत्री त॥वार लेखन केले होते, त्याजवरून श्रुत जाले असेल. वर्तमान आहे कीं गायेकवाड म॥र येथे येणार यैसे वर्तमान आहे. श्रुत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान जे ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. शृत होये. छ ८ माहे म॥रचे आज्ञापत्र सरकारचे डाकेसमागमे सादर केले ते छ १६ माहे म॥री पावले. पावोन सतोश जाला. सदैव याच प्रकारे आज्ञापत्रे सादर करनार स्वामी समर्थ. बहुत काय लिहिणे. कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ति.

---

**A. R. No. 52.** २२ जमादिलाखर ११९५ हिजरी
१५ जून १७८१

पै॥ छ १ माहे रजेब सन ११९५ हिजरी, रविवार दीढ प्रहर दिवस मै डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां॥ नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान त॥ छ २२ ज॥लाखर शुक्रवारपर्यंत मो पुणें स्वामीचे कृपे करून क्षेम जाणून, स्वकीय कुशळ लेखनाज्ञा करावी (वि)शेष. पूर्वीं छ १८ माहे म॥रीं हुजूरी अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर पाठविलें तें दारोगा हरकारे यांचे विद्यमानें हुजूर व स्वामीचे सेवेसी पाऊन वर्तमान कळलें असेल. सांप्रत छ २२ माहे म॥रपर्यंत वर्तमान लिहून पत्र पाठविलें आहे तें सेवेसी पावेल. मोइनुदौला बाहादरानीं चौथाईचे तहाविषईं हुजूरचे आज्ञेप्रमाणें कृष्टणरावजीस व नानास पत्र पाठविलें आहे. त्याचें उतर अद्यापी गेलें नांहीं. प्रत्योतर इकडून रवाना होईल, त्याप्रमाणें हुजूर व सेवेसी खासगत जोडीसमागमें लिहून पाठवीन. बहुत काय लिहिणें हे विनती.

प॥ छ १ माहे रजेब सन ११९५ हिजरी, रविवार, दीढ प्रहर दिवस मै डांक सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इ॥ छ १८ जा॥लाखर लगायत छ २२ माहे म॥र सन ११९५ हिजरी, रोज शुक्रवार. तुकोजी होळकराकडें चौथ व सरदेशमुखीचे मख्त्या बा॥ रुपये बाकी होते, त्यापैकीं निमे पंतप्रधानांचे कारभाऱ्यानी होळकरास माफ केले. व निमे तवकूफ ठेविले. हुजराती फौजेस दरमाह रोजमरे मोकरर केले त्यापैकीं बाकी राहिले रोजमऱ्याचे यैवजीं कोण्हास दोन कोण्हास तीन येणें-प्रमाणें रोजमऱ्याचे रुपये देऊन रुखसत केलें. घोरपडे व पाटणकर वगैरे यांस रुखसत जाहली नांहीं. तळेगांव व बोरघांटावर फौज पाठवावयाची तजवीज येथील कारपरदाजांची आहे. परंतु फौजेची नेमणूक व रवानगी अद्यापी जाहली नांहीं. करनल गाडर मुंबईस हवेलींत उतरला आहे. परंतु मुबईकर जनरालाची व गाडराची भेट जाहली नांहीं. याकरितां लोकानीं कयासी वर्तमान उठविलें आहे कीं गाडरास जखम लागली व पनवेलीहून मुंबईस गेल्यानंतर मेला असेल. या वितरिक्त अवांतर वर्तमान लिहून पूर्वीं हुजूर व स्वामीचे सेवेसी छ म॥रीं पत्रें डांकेवर पाठविलीं तें पाऊन सेवेसी वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रतचें वर्तमान दफेवार लिहिलें असे. मालोजी व शंकराजी घोरपडे व आपाजीराव पाटणकर वगैरे यांस रुखसत अद्यापी जाहली नांहीं. तलबेचे रुपये करारप्रमाणें माहबमाही रोजमऱ्यापैकीं बाकी राहिला यैवज नख्त द्यावा व बाकीचे रुपये आखरसाल द्यावे याप्रमाणें निश्चय जाहला. घोरपडे वगैरेंनी हमराही लोकांस रुखसत करून जरीदे पुण्यांत राहिले आहेत.

तळेगांव व बोरघांटावर फौज अद्यापी रवाना जाहली नांहीं. मुंबईकडून इंगरेजांची कांही हरकत दिसत नांहीं याकरितां येथील कारभारी इंगरेजांविषईं प्रस्तुत सुस्त आहेत.

करनेल गाडराची तहकीक खबर कळावी याकरितां येथोन कारभाऱ्याचे तरफेनें कोण्हीं खिदमतगार व हरकारे खुफिया मुंबईस गेले होते, ते परतोन आले. त्यांचे जुबानी गाडर गोसेनिसीन होऊन बसला आहे. बाहेर निघत नांहीं. आपली मसलहत सेवटास गेली नांहीं व सिकस्त जाहली याची पशेमानीं व शरमिंदगी गाडरास फार जाहली आहे. लोकानीं कयास मेला म्हणून केला, तेंही वर्तमान लोकांचे जुबानी यैकिल्यांत येतें, परंतु गाडर मेला या वर्तमानाचा निश्चय येथील कारभारी करीत नांहींत.

गाडराचे हमराही जमीयतेपैकीं दोन पलटणें समुद्राहून तरीचे मार्गानें मुंबईहून जाहाजांत बसून चिनापटणास रवाना जाहलीं होतीं. तें त्यापैकीं दोन जाहजांतील जमीयत तुफानाचे गर्दीकरितां समुद्रांत बुडालीं म्हणून गोवे बंदरीहून बातनी आली म्हणून वर्तमान कारपरदाजांचें जुबानीं यैकिलें व गोवेकर वकीलानेंही सांगितलें.

भगवंतराव निंबाळकर सोळापुरीं आहे. व त्याचें दरख्वास्तीप्रमाणें येथील कारपरदाजांची पत्रें पुण्यास येण्याविषईं गेलीं आहेंत. हें वर्तमान पूर्वीं रबिलाखरचे महन्यांत लिहिलें होतें. सांप्रत भगवंतराव निंबाळकर शंभर स्वारानसीं छ २० माहें म॥रीं पुण्यास वानवडीसमीप येऊन उतरला.

पै॥ छ १ माहे रजेब सन ११९५ हिजरी, रविवार.

२

पुरवणी अखबार छ २२ ज॥लाखर सन ११९५ हिजरी. छ २१ माहे म॥रीं हरीपंत व कृष्टणराव बलाळ उभयतां म॥रनुलेचे भेटीस पुण्याहून पाव कोस गेले होते. भगवंतराव आपले डेऱ्याहून स्वार होऊन आला. परस्परें भेटी होऊन भगवंतराव पुन्हां आपले डेऱ्यास गेला व हरीपंत व कृष्टणराव बलाळ आपले हवेलीस आले. भगवंतराव याचा वकील कृष्टणराव बलाळ यांचे विद्यमानें नौकर राहावयाचे विषईं बोलणार. चिमापा पानसे याचा पुत्र गणपत

विश्वासराव यास मातमीची वस्त्रें व इस्तकलालीचें श्रीमंताकडून देणें होतें. मातमीची वस्त्रें कारकूनासमागमें सोनोरीस पाठविलीं, व गणपतराव यास पुण्यास आणविलें. छ २१ माहे म॥रीं पंतप्रधानानीं आपले सन्मुख च्यार पारचें खलअत व येक कंठी मोत्याची गणपतराव यास देऊन, चिमापाचें जातीची जागीर जे होती ते गणपतराव याजवर बाहाल केली. म॥रनुलेचें वय साहा वर्षाचें आहे. सांप्रत तोफखान्याचा कारभार जयवंतराव व सखाराम वगैरे पानसे करीत आहेत.

कोंकणांत बिरेवाडीं म्हणून गड जंजीऱ्याचे रुखें पंतप्रधानांचे तालुकियाचा आहे. गड म॥रासमीप जंजीऱ्याहून हबसी यांचे हजार बारासे प्यादे आले होते. येकदोन दिवस मुकाम करून राहिले. हें वर्तमान पुण्यांत कारपरदाजांस कळल्यानंतर बिरेवाडीचे गिर्दनवाह कितेक गड किले आहेत, तेथील किलेदारांस ताकीदपत्रें लिहून पाठविलीं कीं बिरेवाडीचे कुमकेस जमीयत सत्वर पाठऊन देणें. दोन हजारपर्यंत कुमकी प्यादे गेले होते. हबसीयांची जमीयत कुमकी लोक आल्याहून पूर्वीं पुन्हां माघारा जंजीऱ्यास गेली. व कोण्हेहीं मकानास त्यांचा उपद्रव लागला नांही म्हणून येथील कारपरदाजांस वर्तमान आलें.

माहदाजी सिंदे सिपलीकोल्हारसाहून पांच सात कोस पुढें व इंगरेजांची पलटणें सिंद्यापासून च्यार पांच कोसी, हररोज सिंद्याची फौज तयार होऊन इंगरेजांचे मुकाबिल्यास जात आहे. तोफाची लढाई परस्परें होत आहे म्हणून सिंद्यांचे वकीलाचे जुबानी यैकिलें. खारीज वर्तमान यैकिलें कीं कालपीस इंगरेजांचीं पलटणें आलीं आहेत. ते ग्वालेरीस येणार व करनल पापड ग्वालेरीस जाणार आहे.

बाजी गोविंद व माधवराव रामचंद्र पारनेरापर्यंत गेल्याचें वर्तमान पूर्वीं लिहिलें होतें. सांप्रत यैकिलें कीं नवापुरापर्यंत जाऊन सुरत जिल्याचे माहाल ताख्तताराज केले. गणेशपंत व दुरगोजी भापकर त्याच प्रांतांत आहेत. सोनगडांत इंगरेजांची कांहीं जमीयत होती, ते बाजीपंताचे रुखावर आली म्हणून पूर्वीं लिहिल होतें. सांप्रत यैकिलें कीं सोनगडीहून

दोन पलटणें सुरतेस गेलीं. बाजीपंत व माधवराव रामचंद्र यांस छावणीकरितां पुण्यास येणें म्हणून पंतप्रधानांची पत्रें गेलीं आहेंत. रजबाचे महिन्यांत येतील. दुर्गोजी भापकरहीं माघारा येणार. गणेशपंत बहिरे कोंडाइबरीचे जिल्यांत राहतील.

हैदर नाईक चंदावर प्रांतीं आहे. सांप्रत ताजें वर्तमान नाईक म॥राकडील विशेष अैकिलें नांहीं. याउपरि नवल विशेष होईल तें सेवेसी लिहिल्यांत येईल हे विनती.

---

**A. R. No. 53.** २७ जमादिलाखर ११९५ हिजरी
२० जून १७८१

पै॥ छ १० माहे रजेब सन ११९५ हिजरी मंगळवार. सांइंकाली मै डाक सरकार.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. यथील कुशल त॥ छ २७ माहे ज॥खर मु॥ क॥ पुणे स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानद लेखन आज्ञा करीत असिले प॥. विशेष. यथील वर्तमान छ म॥री प्राथःकाली विनंतीपत्र सेवेसी व हजूरात अखबार व अर्जी सरकारचे डाकेसमागमे रवाना केले. विनंतीपत्र दारोगे याचे विद्यमाणे पावोन सविस्तर वर्तमान ध्यानास येईल. यानतर प्राथःकाली डाके-समागमे पत्रे रवाना जाली. दो प्रहरा हैबतराव यानी सागून पाठविले की जोडी रवाना होते. पत्रे काही द्यावयाची असली तर द्यावी. अखबार तो प्राथःकालीच सेवेसी डाकेसमागमे रवाना जाली, त्याज-वरून सविस्तर ध्यानास येईल. काही जरूरी वर्तमान असल म्हणोन आजच हैबतरावजीनी जोडी रवाना केली. काये वर्तमान असेल ते ध्यानास येईल. शृत होये. वाड्यात श्रीमतानी मानकरी वगैरे

सरदार भोज्यनास आनिले होते. भोज्यने वगैरे होऊन मानकरी वगैरे सरदार आपले डेऱ्यास गेले. शृत होये. होलकर जेजुरीहून वाफगावाकडे गेले म्हणोन वर्तमान आले. शृत होये. राजश्री भगवतराव निबालकर येथे आले आहेत. त्याची व नानाची वगैरे भेट जाली. याच्या भेटी होऊन उपरातिक श्रीमताची व भगवतराव निबालकर याची भेट वाड्यात जाली. श्रीमताची भेट होऊन उपरातिक निबालकर म॥र आपले डेऱ्यास गेले. शृत होये. इग्रजाची पलटने कल्यानीवर छावनी करून आहेत. करनेल गाडर सुरतेस गेला होता. मागती तो ममईस आला यैसे वर्तमान आहे. ममईस व कल्यानीस इग्रजाचा जंगी सरजाम होतो. पुढे ते उद्वोग सत्वरच इकडे करनार, यैसे वर्तमान आहे. शृत होये. हफशानी कोकनप्राती तल्याघोसाल्याचे किल्याकडे उपद्रव माडला आहे. हपशासी व किलेवाल्यासी लडाई जाली, यैसे वर्तमान आले आहे. येथून त्याचे पारपत्यास काही गारदी वगैरे पाठविनार. शृत होये. राजश्री बाजीपंत आना सुरत प्राती होते ते कोडाईबारी चहडून वरते आले. इकडे येतात यैसे वर्तमान आले आहे. शृत होये. सिद्यासी व इग्रजासी लडाई सुरू आहे. इग्रजास कलकत्याहून काही पलटने मदत आली. इग्रज सिद्यावर गालिब आहेत, म्हणोन वर्तमान आहे. शृत होये. नाना व हरीपत याचा नित्य खिलवत होत असतो. भाव यैकिल्यात आहे की, पुढे दौलतीचा बदोबस्त येथास्थित करावा व इग्रजाचे पारपत्य करावे. या अनवये

पुरवनी २

खिलवत होत असतो. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. शृत होये. दो ती दिवसाआड सरकारचे डाकेसमागमे वरचेवर सेवेसी विनंतीपत्रे व हजुरात अर्ज्या व अखबार रवाना होतात. विनंतीपत्रे पावोन सविस्तर वर्तमान शृत होत असेल. विदित हाये. छ १० माहे म॥रचे आज्ञापत्र रा। हैबतराव याचे तैनाती जोडीसमागमे सादर जाले ते छ २३ माहे म॥री पावले.

दुसरे छ १७ माहे म॥रचे आज्ञापत्र डाकेसमागमे सादर जाले ते छ २५ माहे म॥री सेवकास पावले. पावोन बहुत सतोश जाला. सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर करनार स्वामी समर्थ. बहुत काय लिहिणे. कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ति.

पै॥ छ १० माहे रजेब सन ११९५ हिजरी मंगळवार साइंकाळ मै डांक सरकार.

---

**A. R. No. 54.** २८ जमादिलाखर ११९५ हिजरी
२१ जून १७८१

पै॥ छ १० माहे रजेब सन ११९५ हिजरी, मंगळवार, साइंकाळ मै डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सा। नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान त॥ छ २८ ज॥लाखर ज्येष्ठ वद्य अमावास्या, गुरुवासरपर्यंत मो। पुणें स्वामीचे कृपे करून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. छ १० व छ १७ माहे म॥रचें पत्र पाठविलें होतें त्याचें प्रत्योतर इकडील अखबारेसहित छ २६ माहे म॥रपर्यंत छ २७ रोजीं डाकेवर रवाना केलें, तें दारोगे हरकारे याचे विद्यमानें सेवेसी पाऊन वर्तमान कळलें असेल. येथील अखबार डांकेवर पय दर पय रवाना होत आहे व डांकेवरील पत्रें साहा साता दिवसात पावतात व जासुदांस बारा तेरा किंवा चवदा दिवस लागतात. याकरितां अखबारीं वर्तमान डांकेवरच पत्रें सेवेसी हुजूर येतांत त्यांत लिहितों.

कांही विशेष वर्तमान सांप्रत सेवेसी लिहिण्यांत येतेंजे. अजिमुदौला बहादरांस हरीबावाजी ब॥ रुपये माघारा द्यावयाचा करार होऊन दोन किस्ती दुसाला ठराव जाहला. त्यापैकीं येके किस्तीच्या चिठचा बहादर म॥राकडें पाठविल्या. दुयम किस्तीच्या चिठयाकरितां बहादरानीं च्यार पांच पत्रें कृष्टणरावजीस कांहीं सेवकाचे विद्यमानें कांहीं आलाहिदा पाठवलीं. त्याचें उतरें कांही हीला उजर करून लिहिलीं. याचा तपसील पूर्वीं पत्र पाठविलें त्यांत लिहिला होता. सांप्रत राजश्री कृष्टणराव बलाळ बारामतीहून पुण्यास आल्यानंतर, सेवकानें रावजीस सांगितलें कीं, अजिमुदौला बहादराकडील करारमदार तुमचे मारफतीनें जाहला. व चिठ्याचा जिमा तुम्हीं आपला केला असतां, सांप्रत बालाजीपंत फडनवीसांचे परवानगीचा उजर करितां वि(?)चिठ्या पाठऊन देत नांहींत. यांत तुमचे बोलण्यास दोष लागतो. ते समई रावजीनीं उतर केलें कीं, वाजबी कामें पंतप्रधानांचे सरकारचे निसबतींची त्यास बहादर म॥राकडून अडथळा पडला आहे. याकरितां बालाजीपंतांनी चिठ्या अटकाविल्या आहेत. सांप्रत पंतप्रधानाचे सरकारचीं कामें बहादराकडून जें होणें त्याचा जिमा आम्हीं आपला करून घेऊन, चिठ्या देण्याची परवानगी घेतों. याप्रमाणें बोलून परवानगी घेतली. व मजला सांगितलें कीं, सदासिवपंत नामे कारकून रावजीचे तरफेनें औरंगाबादेस आहेत, त्यांजसमीप चिठ्या पाठऊन देतों. ते बहादरास चिठ्या देतील. च्यार पांच कामाचे वेढ उगऊन द्यावे. याप्रमाणें बोलिले. चौथाईचे तहाचा प्रकार पूर्वी करार जाहला आहे कीं हजरत मगफरतमाब यांचे समई अमल होता त्याप्रमाणें तह होऊन अमल ज्यारी व्हावा. त्या करारास येथील कारभारी रजावंद आहेत. परंतु हरयेक माहालांत कची रुजवात व्हावी, त्या उपरि तह व्हावा. त्यास मोरो गिरमाजी अठरा वीस महिने हुजूर राहिले, रुजवात होत नांहीं. व जमीदारांनी लिहून दिधल्याप्रमाणें अमल ज्यारी व्हावा म्हणून इरशाद हुजूरचा. तो यांस मान्य नांहीं. नवाब मोइनुदौला बहादरानीं कृष्टणरावजीस पत्र जिवाजीपंताचे विद्यमानें पाठविलें. त्यांत दोन शखला

२

पै॥ छ १० माहे रजेब सन ११९५ हिजरी.

पुरवणी श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी. लिहिल्या होत्या. अवल जमीदारांनी जो वसूल लिहून दिधला आहे त्याप्रमाणें सध्या अमल ज्यारी करावा. व उपरांतिक रुजवात करावी. रुजवातीमुळें कमज्याद जे रुपये निघतील ते परस्परें मुजरा द्यावे. दुसरी शकल सुबे बेदर व विज्यापूर येथील चौथ सरदेशमुखीचा अमल जो चालतो त्याची तादाद करून त्यापैकीं हुजूर नियाज करावयाचा करार करून बाकीचे यैवजाची तफरीक करून घ्यावी. या प्र॥ दोन शकली लिहिल्या होत्या. रो॥ बालाजीपंत नानानी कृष्टणरावजीस याच कामाकरितां बारामतीहून बोलाऊं पाठऊन आणिलें व दोन तीन दिवस प्रत्यहीं येकांत होत होता. त्याउपरि मोइनुदौला बहादरास प्रत्योतर रावजीनी आपले तर्फेचें व नानाकडील लिहून पाठविलें. पत्राचा खुलासा कृष्टणरावजीनीं जुबानीं मजला सांगितला कीं हुजूरचे इरशादे-प्रमाणें पूर्वीं कारपरदाजानी करार केला आहे कीं हजरत मगफरतमाब यांचे समई स्वराज्याचा अमल होता. त्याप्रमाणें ठराव रुजवातीनें करावा. आम्हास कबूल आहे. या करारास बालाजीपंत रजावंद आहेत. याप्रमाणें करार केला म्हणून रुजवातीस मोरो गिरमाजीस पाठविलें आहे. सांप्रत हुजूरचा इरशाद जमीदारानी लिहून दिधल्या प्र॥ अमल ज्यारी करावा. किंवा महमदाबाद व विज्यापूरचा वसूल चौथ व सरदेशमुखीचा निवडून त्यांत सोड द्यावी, हे बाबत नवीन आहे. पूर्वीं जो इरशाद जाहला आहे तो मवकूफ होऊन दुसरे तऱ्हेनें इरशाद होत असल्यास याचें उतर हुजूरचे मर्जीप्रमाणें करूं. याप्रमाणें बालाजीपंत पेंचून बोलतात. याकरितां सांप्रत बालाजीपंताचे सांगित-ल्याप्रमाणें मोइनुदौलास पत्र लिहिलें आहे. हा म॥र हुजूर अर्ज करून हुजूरचा खुलासा लिहून पाठवितील. त्याप्रमाणें येथें उतर प्रत्योतर. दुसरा म॥र मोइनुदौलानीं कृष्टणरावजीचे पत्रीं बमोजिब इरशाद हुजूरचे लिहिला होता कीं खिसाऱ्याची बाबत सध्यां

मवकूफ केली. जे समईं पंतप्रधानास काम पडेल ते समईं समजोन घेऊं. याची चर्चा नानानी केली. ते रावजीचे जुबानीं सेवकानें यैकिली कीं इंगरेजासी बिगाड करावा म्हणून हुजूरीहून इरशाद होऊन नकशा जाहला. व आम्हीं हुजूरचे इरशादेप्रमाणें वर्तणूक केली. सांप्रत हुजूरांत नकशा केला तो इरशाद जाहला तो मंजूर नांहीं, व आम्हास गरज पडेल ते समईं हुजूरचे आज्ञेप्रमाणें खिसारा कबूल करावा. त्यानंतर इंगरेजांचे तंबीचा अज्म हुजूरीहून व्हावा. हा करार व शर्त रोज अवल बोलण्यांत आली नांहीं. श्रीमंत पंतप्रधानास वडील व आम्हांस पंतप्रधानांचे स्थलीं हजरत बंदगानआली आहेत याप्रमाणें बालाजीपंत बोलतात म्हणून रावजीनीं सांगितलें. याचा खुलासा चिरजीव राजश्री रघोतमराव यांजसमागमें जो निरोप मतालिबा हुजूर अर्ज करावयाचे सांगितले आहेत त्याचें उतर हुजूरीहून इरशाद होईल व कृष्टणरावजीस वर्तमान कळेल ते समईं निखालसतेनें सर्व कामाचा गुंता उरकेल. तोपर्यंत कागदपत्राचे लिहिण्यांत निखालसता होण्याचा मार्ग दिसत नांहीं. सविस्तारें वर्तमान सेवेसी व हुजूर विदित व्हावें म्हणून विनती लिहिली असे. बहुत काय लिहिणें हे विनती.

## ४ श्रीनिवास

पुरवणी श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. प्रभाकरपंत नामे कोण्ही ग्रहस्त मकरंदनायका ब।। रुपयाचे हवाल्यांत व जिवाजीपंतानीं हुजूर रुपये दिल्हे असतां प्रभाकरपंत त्यास रुपयाचा फैसला करीत नांहीत . सबब जिवाजीपंतानी म।।रनुलेस तकाजा केला असतां श्रीमंत राजश्री राजे भाऊसाहबानीं प्रभाकरपंताचा पक्ष धरला व हुजूरांत रूबरू जिवाजीपंताचा. श्रीमंत राज्याजीचा कांहीं ज्वाबसाल जाहला हा म।।र जिवाजीपंतानीं रो कृष्टणरावजीस लिहिला होता. त्यावरून रावजी गोविंदरावजीनी सेवकास सांगितलें कीं पंतप्रधानांकडील वाजबी कामास उभयतां राज्याजीनीं अनकूळ होऊन हुजूर अर्जमारूज करीत जावा. जिवाजीपंत व आमचें काम

जें असेल तें उभयताचे घरचे कामाप्रमाणें. वाजबीस तरी जिवाजी-पंताचा पक्ष धरावा. परंतु गैरवाजबी असल्यासहीं बाह्यात्कारें येक पक्ष दाखवावा. घरांत समजाऊन सांगावें कीं तुम्हीं अन्याय करितां. याप्रमाणें परस्परें श्नहाचा मार्ग असतां, राज्याजीनीं प्रभाकरपंताचा पक्ष दरबारीं धरला हें लोकांत विपरीत भासेल. याउपरि जिवाजी-पंतानी व उभयता राज्याजीनीं येकचितें असावें यांत आम्हास बहुत समाधान, म्हणून उभयतानी सांगितल्याप्रमाणें लिहिलें असे. हे विनती.

पै।। छ १० माहे रजेब सन ११९५ हिजरी. मंगळवार साइंकाळ मै डांक सरकार.

५ श्रीनिवास

पुरवणी पत्र श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी. विनतीजे. येशवंतराव निंबाळकराचा म।।र खारिज कळला. व येथें कितेक हुजूरचे दौलतख्वाह फिदवी, त्यांचे सूचनेवरून सेवकास अवगत जाहला. त्यावरून हुजूर व स्वामीचे सेवेसी पत्रीं व अर्जीत म।।र लिहिला आहे. व येथील कारपरदाज बालाजीपंत व कृष्टणराव बलाळ यांस हुजूरहून इनायतनामे येण्याचा मसवदा बमोजिब सलाह-दौलतख्वाह लिहून चिरजीव राजश्री रघोतमराव यांजसमीप पाठविला आहे. ते सेवेसी विनती करतील त्याप्रमाणें हुजूरीहून इनायतनामे उभयतांस व इनायतनामे उभयतांस पावते करावयाकरितां सेवकास इनायतनामा हुजूरचे डांकेवर यावा याचा आशय समग्र चिरजीव विनती करतील. त्याप्रमाणें जें मुनासिब जाणतील आपण त्याप्रमाणें हुजूर अर्ज करून इनायतनामे येण्याचा म।।र अर्ज करावा किंवा मसवदा दाखवावा. हे विनती.

पै।। छ १० माहे रजेब सन ११९५ हिजरी. मंगळवार साइंकाळ मै डांक सरकार.

———

**A. R. No. 55.**

६ रजब ११९५ हिजरी
२८ जून १७८१

पै।। छ १४ माहे रजेब शनवार सन ११९५ हिजरी, अडीच प्रहर दिवस, मै डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ. सां नमस्कार विनती उपरि. येथील वर्तमान त।। छ ६ रजब शुक्रवारपर्यंत मो पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ २ माहे म।।रीं डांकेवर पत्रें पाठविलीं तें व छ २८ ज।।लाखरीं जासूद जोडी रवाना केली, ते पत्रासहित सेवेसी पावली असेल. दारोग्याचे विद्यमानें डांकेवर पत्र पाठविलीं तें जासूदासमागमींचीं पत्रें सेवेसी व हुजूर पाऊन वर्तमान कळलें असेल. सांप्रत छ ६ माहे म।।रपर्यंत इकडील प्रत्यक्ष पाहिलें व यैकिलें वर्तमान लिहून डांकेवर हुजूर व स्वामीचे सेवेसी अर्जी व अखबार व पत्र पाठविलें आहे. दारोग्याचे विद्यमानें पत्र पावेल. चौथाईचे प्रकरणाचें वर्तमान यैकिलें, व रो कृष्टणरावजीस पुसोन माघाहून खांसगत तैनाती जोडीसमागमें लिहून पाठवितों. मानाजी फांकडे व येशवंतराव नाईक व सटवाजी भोंसले येकत्र होऊन तीन हजारपर्यंत जमीयत जमा केली. पंढरपुरासमीप आहेत. बाजीराव बरवेहीं यांत मिळनार. पंतप्रधानांचे प्रांतांत कांही हंगामा करीत नांहींत. येशवंतराव नाईकानें पूर्वी करमालें वगैरे सरकार आलीचे प्रांतांत हगामा केला व सांप्रत सरकार तालुकियांत हगामा करणार म्हणून यैकिलें. याचा तपसील पूर्वी लिहिला आहे. जे सलाह दौलत असेल त्याप्रमाणें तदबीर हुजूरीहून होईल. बहुत काय लिहिणें हे विनती.

विनतीजे. चिरजीव राजश्री रघोतमराव सेवेसी पावले असतील. त्यास पत्र लिहिले ते पावतें होईल. हे विनती.

पै।। छ १४ माहे रजेब शनवार सन ११९५ हिजरी, अडीच प्रहर दिवस, मै डांक सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इ।। छ २ माहे रजब लगायत ६ माहे म।।र शुक्रवार सन ११९५ हिजरी, आषाढ मास. बिरेवाडी प्रांत कोंकण तालुका पंतप्रधान येथें हबसी व इंगरेज बइतिफाक येऊन मोरचे लाविले व लढाई शुरू जाहली. व करनल गाडराकडील पलटणें कल्याणीहून चौक्यास येणार. व बाजी गोविंद व माधवराव रामचंद्र गंगातीरास आले. सत्वर पुण्यास येतील. माहदाजी सिंदे इंगरेजांचे मुकाबिल सिपरीकालारसेसमीप व सिंद्यांची व इंगरेजांची लढाई जाहली म्हणोन खारीज वर्तमान यैकिलें. व हैदरअलीखान चंदावर प्रांतीहून पुन्हा अरकाट चिदांबरास जाणार. या वितरिक्त अवांतर यैकिलें वर्तमान लिहून हुजूर अखबार व स्वामीचे सेवेसी पत्रें डांकेवर पाठविलीं तें दारोग्याचे विद्यमानें सेवेसी व हुजूर पावलीं असतील. सांप्रत प्रत्यक्ष जाहलें व यैकिलें वर्तमान लिहिलें असे.

बाजी गोविंद व माधवराव रामचंद्र दोन हजार फौजेनसीं छ ५ माहे म।।रीं पुण्यास आले. राजश्री बाळाजीपंत व हरीपंत इस्तकबाल मुळामुठेचे पार गेले होते. परस्परें भेटी जाहल्यानंतर उभयतां म।।रनुलेस हरीपंत आपले समागमें पंतप्रधानासमीप घेऊन गेले. माधवराव व बाजीपंतानीं सांप्रदायाप्रमाणें पंतप्रधानास नजर करून भेटले. श्रीमंतानीं सर्वत्रांस विडें देऊन रुखसत केलें.

करनल गाडर व मुंबईकर जनरालांची पलटणें तीनपर्यंत पूर्वीपासून कल्याणीस आहेत. सांप्रत वर्तमान यैकिलें कीं, पांच पलटणेंपर्यंत कल्याणीस इंगरेजांची जमीयत जमा जाहली आहे. पुढें चौक्यास येणार म्हणोन वदंता आहे. अद्यापि कल्याणीहून हरकत केली नांहीं.

बिरेवाडीचे किल्यास हबसी यानीं मोर्चे लाविले आहेत. त्यांची परस्परें अद्यापि लढाई होत आहे. बाजारी खबर बिरेवाडी हबसियानी घेतली. परंतु तहकीक खबर नांहीं. पंतप्रधानाचे कारभाऱ्यांचे सांगण्यांत बिरेवाडीस दोन तीन हजार प्यादा व जंगी सरजाम पोख्त आहे. कुमकी गाडद पुण्याहून रवाना जाहली तेही पोंहचले असतील. हबस्यास मुकाबिल लढाईंत मारून काढतील. किल्याचे आसऱ्यानें कायम व मजबूत राहावयाचें काय आश्चीर्य आहे. किंवा हबसी माघारा गेल्याचें वर्तमान सत्वरच येईल.

इंगरेज करनल पापड वगैरे पंधरा सोळा पलटणेंपर्यंत सिपरीकोलारसासमीप, व त्यांचे गिर्दनवाह माहदाजी सिंदे आहेत. सांप्रत तहकीक कलमी वर्तमान सिद्याचे लष्करीहून आलें कीं इंगरेजांचा मजहला दूर होय. जोपर्यंत सिंदे मा॥र इंगरेजांचे मुकाबिल्यावर मजबूत कायमीन राहिले, पर्जन्यकाळात व बादज दसहरा इंगरेजांचा मुकाबिला टाकून अलाहिदा होत नांहींत.

हैदरअलीखान यानीं कोण्हीं मातबर सरदार व दाहा हजार स्वार व बार दाहा हजार चंदावर प्रांती ठेऊन जातील. खान मा॥र आरकाट चिदांबरासमीप पूर्वी फौज करनल कूटाचे रुखावर ठेविली होती तिकडें गेला म्हणून वर्तमान यैकिलें.

बाजीपंताचे हमराह फौज गेली होती. त्यां लोकांस रवानगीचे समई रोजमरे देऊन रवाना केलें होतें. सांप्रत सर्वत्रांस हरीपंतानीं सांगितलें कीं दसऱ्याकरितां पुण्यास येणें . नालबं(दी)

२

पुरवणी अखबार पुणें छ ६ रजब सन ११९५ हिजरी.

व समजाविशीचे रुपये येकादांच देऊं. बहुत करून आपले घरास गेले व बाकीचे जाणार.

गणेशपंत बहिरे पुण्यास यावयाकरितां माघारा फिरले होतें. परंतु दुर्गोजी भापकर यांजकडील पत्रें वरचेवर कारपरदाजास

येतात कीं आपल्यास खर्चास माकूल पाठवाल तरी आपण छावणीस या प्रांतीं राहूं. खर्चास न आलियां हमराही लोक उठोन जातील. ते समईं आम्हासहीं माघारा येणें प्राप्त होईल. भापकर मा।र नवमुलाजम. यांचा भरवसा पुरतेपणें नांही. याकरितां येथील कारपरदाजानीं गणेशपंतास लिहून पाठविलें कीं तुम्हीं कोंडाईबारी-समीप पूर्वीलप्रमाणें कायम राहणें. माघारा न येणें.

मानाजी फांकडे व यशवंतराव नाईक दहींगावकर येकत्र होऊन फौज जमा करणार. याचा तपसील पूर्वी लिहिला आहे. सांप्रत वर्तमान यैकिलें कीं येशवंतराव नाईक अद्यापि दहीगांवी आहे . परंतु मा।रनुलेचे कारभारी भांबूराव व मानाजी फांकडे व सटवाजी भोंसले दोन तीन हजार पर्यंत स्वार जमा करून पंढरपुरासमीप आहेत. पंढरपुरकर सावकारांस कर्ज सूदी मागत आहेत. येकदोघा सावकारापा-सून दाहा हजार रुपयें कर्ज जबरदस्ती व रजावंदी ज्याप्रमाणें सावकार यैकतील त्या पधतीनें सागून रोखे लिहून देऊन रुपये घेतले व घेतात. पंतप्रधानाचे तर्फेनें प्रतिनिधीची फौज पांच सातसें स्वार मानाजी फांकडे वगैरेवर रवाना जाहलें. ते पंढरपुरीहून पांच कोस फासल्यानें उतरले आहेत. पंतप्रधानांचे हरकारे व बातनी लिहिणार मानाजी फांकडयाचे लश्करांत त्यांचे इतिल्यानें आहे. फौजेचे जमाव वरचेवर करीत आहेत. येशवंतराव नाईक दहीगांवकर मानाजी फांकडयासमीप सत्वरच जाणार, गेला असेल. परशरामपंत मिरजकराचे विद्यमानें पंत-प्रधानाचे कारपरदाजासीं फांकडे वगैरेनीं यैक्यता केली. हें वर्तमान पूर्वील पत्री लिहिलें आहे. सांप्रत पंढरपूर प्रांती ताख्ततराज व लोकास उपद्रव किमपि करीत नांहींत. पंढरपुरकर सावकरास कर्ज मात्र मागतात. याउपरि त्यांचा दाइया फिसादाचा दिसतो.

बिरेवाडीचे कुमकेस पंतप्रधानानी गाडदी रवाना केले ते आजी-पर्यंत तळेगांवासमीपच आहेत म्हणून यैकिलें.

मानाजी फांकडे यांचे तंबीकरितां पंतप्रधानानीं प्रतिनिधीची फौज हजार स्वार पर्यंत रवाना केले होतें. ते व फांकडे पंढरपुरासमीप

पांच कोसाचे फासल्यानें आहेत म्हणून पंतप्रधानांचे कारभाऱ्या-समीप वर्तमान यैकिलें. प्रतिनिधीचे मुतालिक वासुदेवबावा पुण्यांत आहेंत . त्यांचेथें बातंनी आजी छ म।।री आलीं कीं फांकडचासीं व प्रतिनिधीचे फौजेसी लढाई जाहली. फांकडयाचा मोड होऊन फरारी जाहला. यैकिल्याप्रमाणें लिहिलें असे. पुन्हां शोध कळल्या-प्रमाणें सेवेसी सूचना लिहिण्यांत येईल. हे विनती.

पै।। छ १४ माहे रजेब शनवार सन ११९५ हिजरी, अडीच प्रहर दिवस, मै डांक सरकार.

**A. R. No. 56.**

७ रजब ११९५ हिजरी
२९ जून १७८१

श्रीशंकर

पै।। छ १४ माहे रजेब शनवार सन ११९५ हिजरी, अडीच प्रहर दिवस मै डांक सरकार.

विनंतीं विज्ञापना यैसीजे. यथील कुशल त।। छ ७ माहे रजब मु।। क।। पुणे, स्वामी कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन, स्वानद लेखनआज्ञा करीत असिले प।।. विशेष. यथील वर्तमान छ २ माहे म।।र रोज सोमवारी प्राथ:काली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले. ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर येथील वर्तमान जंजिरेवाले हपसी यानी कोकनप्राती तल्या-घोसाल्याकडे उपद्रव माडला आहे. हपशास इग्रजाचे येक दोन पलटन शामील जाले यैसे वर्तमान आहे. तल्याघोसाल्याचे किल्यासी हपशाने उपद्रव माडला आहे. किल्याचे लोकासी व हपशासी लडाई आहे. किल्याचे साहित्यास व हपशाचे पारपत्यास येथून दोन हजार गारदी रवा(ना) जाले आहेत. शृत होये. कोकनप्राती कितीक किले राहिले आहेत त्यास उपद्रव करावयास इग्रजानी प्रारंभ माडला आहे. इग्रजानी हपशास अपनात मेलऊन त्याजकडूनही उपद्रव माडविला आहे. शृत होये. राजश्री बाजीपंत अना वगैरे येका दो दिवसा

पुन्यास दाखल होनार. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे काम जाले. उपरातिक राजश्री नाना व हरीपंत याचा खिलवत जाला. भाव यैकिल्यात आला की पुढे इग्रजाचे पारपत्याचे मसलतीविशई जाला. दुसरे, थोडेबहुत लोकास देऊन राजी ठेवावे कारन की पुढे दसऱ्याचे सधीस फौज जमा जाली पाहिजे या अनवये खिलवत जाला. शृत होये. छ ३ माहे म॥र रोज मगलवार इग्रजाची पलटने कल्यानीस आहेत. करनेल गाडर कल्यानीस व ममईस राहतो. पलटने सपूर्ण कल्यानीस आहेत. जंगी सरजाम वगैरे करितात. पुढे भाद्रपद मासीच इग्रज इकडे चाल करनार यैसी वदंता दाट आहे. दुसरे, कल्यानीही घाटाजवळून वीस पचवीस कोस आहे, याअर्थी कारभाऱ्याचे मानस आहे की श्रावन सुद पचमीस सरकारचे डेरे बाहेर करावे. कारन की दसऱ्याचे संधीस फौज जमा जाली पाहिजे. याकरिता श्रावन मासी डेरे बाहेर करावे यैसी यौज्यना करितात. शृत होये. सिद्यासी व इग्रजासी लडाई आहे. सिद्यावर इग्रजानी आनिक छापा घातला यैसे वर्तमान आहे. सिद्यावर इग्रज गालिब आहेत यैसे वर्तमान आहे. शृत होये. राजश्री सखारामपंत बापू याचे पायात बेडी आहे. रायेरीचे किल्यात कैदेत आहेत. त्या किल्याची हवा फार वाईट. फार दिवस त्या किल्यास मणुश राहिल्यास वाचत नाही. त्यास बापू बहुत श्रमी आहेत. पाये वगैरे सुजले, अवस्ता कठिन, यैसे वर्तमान आहे. शृत होये. राजश्री चिंतो विठल मासूरचे* किल्यात कैदेत आहेत. त्यानी आपले हाते आपली सेडी उपडली, संन्याशाचे रूप धरले आहे यैसे वर्तमान आहे. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. शृत होये. छ ४ रोज बुधवार फौजेचे लोकास दोन दोन रोजमुरे देऊन समाधान करून वाटे लावितात. लोकास ताकीद करितात की दसऱ्यास सत्वर येऊन जमा व्हावे. ताकीद करावयाचे कारन की पुढे इग्रजावर स्वारीचा उद्वोग. शृत होये. होलकर वाफगावास दाखल जाले हे पूर्वीचे विनंतीपत्री लेखन केले होते. शृत जाले असेल. होलकर वाफगावास आहेत फौजेस निरोप

---

* मंदोसर असावें.

दिल्हा. जवल दोन हजार स्वार आहेत. दसरा जालिया होलकरही फौज जमा करणार. शृत होये. हैदर नायेकाचे वर्तमान. नाईक मा।र यासी इग्रजासी लडाई चिनापटनाकडे आहे. प्रस्तुत इग्रजाचे शहावर फौज ठेऊन नाईक मा।र चंदावराकडे गेला, यैसे वर्तमान आहे. त्यास इग्रजाचा ज्यमा(व) भारी जाला. नाईक मा।र यासी लडाई आहे, यैसे वर्तमान आहे. दुसरे, नाईक मा।र याचा पुत्र टिपू तो काही फौज घेऊन वलदेज फिरगी आहेत त्याचे मुलकात गेला. वलदेजासी व टिपूसी लडाई आहे. वलदेजाची नागपटन म्हणौन ठिकान आहे तेयत्रर टिपू गेला. नागपटनास वलदेजाची कोठी होती ते टिपूने लुटली. तेथे दाहाबारा लक्ष होन साप(ड)ले व लूटही फार सापडली यैसे वर्तमान येथे आहे. त्याजवरून कारभारी म्हनत होते की हैदर नायेकास मुल(ख)गिरी बरीच साधली. पैका फार मिळाला. व इग्रजावरही त्याचा शह बराच आहे. अन तारीफही करीत होते. यैसी भाशने होत होती. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. शृत होये. उदईक रा। बाजीपंत वगैरे येथे पुन्यास दाखल होनार. त्यास सामोरे कारभारी कोस आत कोस जाणार. शृत होये. छ ५ रोज गुरुवार रा। बाजीपंत अना व राजश्री माधवराव रामचद्र व गगाधरराव रास्ते वगैरे पुन्यास येऊन दाखल जाले. बाजीपंत वगैरे आले म्हणौन त्यास पेशवा आत कोस नाना व हरीपंत वगैरे गेले होते. बाजीपंत वगैरेच्या भेटी जाल्या. भेटी होऊन बाजीपंत वगैरे श्रीमताचे भेटीस वाड्यात आले होते. श्रीमताची भेट होऊन बाजीपंत वगैरे आपले डेऱ्यास गेले. बाजीपंत पुन्याबाहेर उतरले आहेत. येका दो दिवसा बाजीपंत मोहर्तानसी आपले वाड्यात दाखल होनार. बाजीपंत वगैरे यानी सुरत अठाविसीचा मुलुक गुजरात प्रातीचा लुटून जालला. लोकानी गुरे वगैरे लूट आनली. तो प्रात वगैरे लुटून बाजीपत वगैरे येथे आले. गने(श)पत बेहेरे याचे शहावर दोन पलटने होती. ते बाजीपंत तिकडे गेले होते म्हणौन ते पलटने सुरतेस गेली यैसे वर्तमान आहे. शृत होये. राजश्री गनेशपंत बेहेरे यानी कोडाईबारीवर छावनी करावी यैसा निश्चये होता. त्यास लोकाचे देन्याचा गवगवा भारी. त्यामधे त्यास

तीन वरशे तिकडे जाली याकरिता गनेशपंतही पुन्यास येतात. तेथून कूच करून निघाले. पाचच्यार मजली आले. पुन्यास येतात यैसे वर्तमान आले. राजश्री दुर्गोजी भापकर हजार पाचसे स्वारानसी गनेशपतासमागमे होते. त्यास भापकर म॥र यास कोडाईबारीजवल ठेऊन गनेशपंत बेहेरे पुन्यास येतात. सत्वरच येणार. आलियावर लेखन केले जाईल. शृत होये. श्रीमंत राजश्री दादासाहेंब सुरतेत आहेत. आसपास वगैरे कोसी दो कोसी चौक्या इग्रजाच्या आहेत. त्याचे खर्चास इग्रजानी पचवीस हजार रुपये वसूलाची खेडी दिल्ही आहेत. सिवाये दोन हजार रुपये दरमाह देत असतात. यैसे वर्तमान आहे. शृत होये. तिसरे प्रहरी रा। नाना व हरीपंत व कृष्णरावजी याचा खिलवत जाला. भाव यैकिल्यात आला की पुढे कितीक बदोबस्ताविशई जाला. दुसरे, येज्यमानसाहेबाकडे व हैदर नायकाकडे पत्रे लिहिणार. शृत होये. छ ६ रोज शुकरवार राजश्री भगवतराव निबाळकर माढेकर हे आपले रोजगाराचे उद्वोगे व हजूरातून जागीरचा बदोबस्त करावा म्हणौन येथे आले आहेत. हे पूर्वी विस्तारे लेखन केले आहे त्याजवरून शृत जाले असेल. निबालकर म॥र चालीस पनास स्वारानसी येथे आहेत. मग काये त्याजकडील जाबसाल होईल हे ध्यानास आलिया लेखन केले जाईल. शृत होये. सिवराम नाईक नासिककर याजकडे नारो शकर याची दाहा पधरा लक्ष रुपयाची ठेव होती. तो देईना म्हणौन त्यास येथे आनिले होते. यैवज देईना म्हणौन त्यास कैद करून किल्यास पाठविले. शृत होये. राजश्री भादूराव प्रतिनिधी व मानाजी फाकडे वगैरे यानी हजार बारासे स्वार मेलऊन मसवडाजवल खूल माजविले होते. भादूराव प्रतिनिधी यानी खूल केले म्हणौन भवानराव प्रतिनिधी याचे हजार दीड हजार स्वार त्याजवर गेले होते. पढरपुरापलीकडे दाहा बारा कोसावर भादूराव प्रतिनिधी व मानाजी फाकडे यासी व भवानराव प्रतिनिधी याची फौजे गेली होती त्यासी लडाई जाली. भवानराव प्रतिनिधीचे फौजेनी भादूराव प्रतिनिधी धरला. पाचसातसे घोडे पाडाऊ करून आनिले. मानाजी फाकडा पलून गेला. त्याचा दिवान धरला गेला.

यैसे वर्तमान सध्याकाली सरकारात आले. मानाजी फाकडा सुरापुराकडे गेला. तिकडे सटोजी भोसले वगैरे यानी ज्यमाव केला आहे. त्याजकडे गेला. यैसे वर्तमान आले. शृत होये. सोहोलतजंग बाहादूर बीडाकडे गेले यैसे वर्तमान आहे. शृत होये. राज.....

## पुरवनी २

पै।। छ १४ माहे रजब शनवार सन ११९५ हिजरी, मै डांक सरकार.

श्री भगवंतराव निबालकर याजला पाचसे रुपये मेजमानी भेट जाल्यावर दिल्ही. भगवतराव याजसमागमे पनास पऊ(न)से स्वार आहेत. त्याचे खर्चाची वगैरे नेमणूक करून द्यावी यैसी रदबदली आहे. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. राजश्री बाजीपंत नानाचे घरी आले होते. नाना व हरीपंत व बाजीपंत या त्रिवर्गाचा खिलवत जाला. खिलवत होऊन हरीपंत व बाजीपंत आपले घरास गेले. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. शृत होये. सेवकाचे जागिरीस याजकडील सुभ्याचा व सरदार वगैरेचा उपद्रव लागतो. घासदाना वगैरे घेतात. दुसरे,खानदेशचे सुभेदार मोगलाई जागीर असता सुभेपटी घेतात. नानाप्रकारचा उपद्र(व). यामुले गावची वसाहत येथास्थित होत नाही ये विशई कारभाऱ्यास इनायेतनामे सादर जाले पाहिजेत. ये विशई येक दोन विनंतीपत्री विनंती लिहिली होती. त्यास विनंती मान्य करून लिहिल्याप्रमाणे सेवकाचे साहित्य जाले पाहिजे. सर्व उमेद सेवकास स्वामीचे चरनाची आहे. जे विनंती करणे ते स्वामीचे चरनासी आहे. विनंती मान्य करून कारभाऱ्यास इनायेतनामे व स्वामीचे पत्रे माझे गावखेड्याचे साहित्याविशई आले पाहिजेत. सर्वस्वे दास स्वामीचा आहे. बहुत काये लिहिणे, कृपालोभ कीजे हे विनंती.

---

**A. R. No. 57.**

७ रजब ११९५ हिजरी
२९ जून १७८१

पै॥ छ २० माहे रजेब शुक्रवार सन ११९५ हिजरी . अडीच प्रह्र दिवस मै जोडी तैनाती राये हैबतरावजी

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. यथील कुशल त॥ छ ७ माहे रजब मु॥ पुणे स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानंद लेखन आज्ञा करीत असिल प॥ विशेष. येथील वर्तमान छ म॥री प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान ध्यानास येईल. तदनतर यथील वर्तमान राजश्री बाजीपंत अना वगैरे सुरतअठाविसीकडे गेले होते. तो प्रात ताराज करून बाजीपत वगैरे येथे पुन्यास येऊन दाखल जाले. श्रीमताच्या कारभारी वगैरे याच्या व बाजीपंत वगैरे याच्या भेटी जाल्या. शृत होये. इग्रज कल्यानीवर छावनी करून आहेत. पलटने सपूर्ण कल्यानीस आहेत. करनेल गाडर ममईस जातो. पुन्हा कल्यानीस ग्रेतो. कल्यानीस सरजाम वगैरे होतो. भाद्रपद मासीच ते इकडं उद्वोग करणार यैसी वंदता आह. याअर्थी कारभारीही श्रावन मासी सरकारचे डेरे बाहेर करविणार. कारन की दसऱ्याचे सधीस फौज जमा जाली पाहिजे म्हणोन श्रावन मासी डेरे बाहेर करावें यैसी यौज्यना करितात. शृत होये. राजश्री भादूराव प्रतिनिधी व मानाजी फाकडे वगैरे यानी हजार बारासे स्वार मेलऊन मसवडाकडे खूल उभे केले होते. त्यांजवर भवानराव प्रतिनिधी याची फौज गेली होती. त्यासी व भादूराव वगैरे यासी लडाई जाली. भादूराव प्रतिनिधी धरले गेले. पांच च्यारसे घोडी वगैरे लुटली गेली. मानाजी फाकडे पलून गेले. त्याचा दिवान धरला गेला. याप्रमाणे वर्तमान येथे आले. शृत होये. जजीरेवाले हपसी याजला येक दुसरे इग्रजाचे पलटन मिळाले. त्यानी तल्याघोसाल्याकडे कोकनप्राती उपद्रव माडला

आहे. तल्याचे किल्यासी व हपशासी लडाई आहे. हपशाचे पारपत्यास येथून दोन हजार गारदी रवाना जाले आहेत. शृत होये. सिद्यासी व इग्रजासी लडाई आहे. सिद्यावर इग्रजानी आनिक छापा घातला यैसे वर्तमान आहे. शृत होये. होलकर वाफगावास दाखल जाले. लोकास निरोप दिल्हा. दोन हजार स्वार याचजवल आहेत. दसऱ्या(स) फौज जमा करणार. शृत होये. हैदर नायेकासी व चिनापटनकर इग्रजोसी लडाई आहे. नाईक मा।र याचा पुत्र टिपू वलदेज फिरगी याचे मुलकात गेला होता. वलदेजाची कोठी नागपटनास होती. ते कोठी टिपूने लुटली. दाहाबारा लक्ष होन सापडले व लूट बहुत सापडली यैसे वर्तमान आहे. शृत होये. कारभाऱ्यास इग्रजाची मसलत दरपेश आहे येविशई नित्य खलवत होता. शृत होये. हे सविस्तर वर्तमान प्राथःकाली डाकेसमागमे विनंतीपत्र रवाना केले त्यात लेखन केले असे. त्याजवरून ध्यानास येईल. बहुत काय लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 58.**

८ रजब ११९५ हिजरी
३० जून १७८१

पै।। छ २० माहे रजेब शुक्रवार सन ११९५ हिजरी. अडीच प्रहर दिवस मै जोडी तैनाती राये मजकूर

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टांग नमस्कार, विनती उपरि. येथील वर्तमान ता।छ ८ माहे रजब आषाढ शुध दशमी रविवारपर्यंत मा। पुणें स्वामीचे कृपे करून क्षेम जाणून, स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. येथील अखबार डांकेवर छ ६ माहे मा।रपर्यंत सेवेसी लिहून पाठविली, त्यावरून वर्तमान श्रुत जाहलें असेल. पुन्हां वरचेवर डांकेवर अखबार रवाना करितों, तें पत्रें या जासूदापूर्वी सेवेसी

पावतील. सांप्रतचे प्रसंगोपाद इकडील कारभाऱ्याचे मसलतीचा खुलासा यैसाजे. हैदरअलीखानाचे सलाहानुरूप इंगरेजासीं बिगाड किंवा सलूक करावा. तोपर्यंत बिगाडाचे शकलेवर परस्परें चाल आहे. बादज बरसात पुन्हां मोहिमेचा अज्म होणार. याकरितां परस्परें जंगी सरंजामाची सिधता होत आहे. हैदरअलीखान तर बरसर मोहीम व लढाईस मुस्तैद आहेत. याचप्रमाणें माहदाजी सिंदे करनल पापड वगैरे इंगरेज सिपरीकोल्हारासमीप परस्परें लढाई काबूनें करीत आहेत. पर्जन्यकाळांत छावणी किंवा परस्परें लढाई रूबकार आहे. हुजूरीहून पंतप्रधानावर इनायात आहे. त्याप्रमाणें सांप्रत इंगरेजांचे बिगाडाविषयीं पूर्वीं इरशाद जाहल्याप्रमाणें व नकशा ठरल्या अन्वयानें इंगरेजांची तंबी हुजूरीहून व्हावी किंवा पुढें तजवीज कोणे प्रकारची व काय करावें याची सलाह उतम इरशाद व्हावी. याप्रमाणें बालाजीपंताचा आशय कृष्टणरावजीचे चितांत इंगरेजांसी ब्रिगाड करावा व हुजूरीहून त्यांची तंबी होईल, याप्रमाण इरशाद जाहला. त्याप्रमाणें पंतप्रधानांचे कारपरदाजानीं अमलांत आणिलें. हुजूरीहून इंगरेजांचे तंबीचा अज्म होत नांहीं. याकरितां हुजूरचे इरशादेचा व जमीर मुबारकेचा खुलासा काय हें वर्तमान कागदीपत्रीं लिहितां कळत नांहीं. यास्तव आपल्यास इनायतनामा मुतजमीनतलब हुजूर पाठवावा म्हणजे आपण हुजूर येऊन सादत मुलाजमत हासल करूं. व येथील कारपरदाजांचा खुलासा जनाबेंत अर्ज केल्यानंतर, ज्या कामांत-मर्जी मुबारक मुतवजे असेल, त्याच रीतीनें कारभाऱ्यांस समजाऊन सांगोन हमवार करून हुजूरचे सागितल्या मार्गावर यांजकडून वर्तणूक करऊं. यांत उभयपक्षीं स्पष्टता व सफाई होऊन परस्परें संशय राहात नांहीं. याउपरि इनायतनामा येण्याकरितां नच पाठवावा हेंच मंजूर असल्यापक्षीं चिरंजीव रघोतमराव यांस कितेक

२

पुरवणी पत्र श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी

वर्तमान हुजूर अर्ज करावयाकरितां समक्ष सांगितलें आहे. ते

स्वामीचे आज्ञेप्रमाणें हुजूर अर्ज करतील. त्याचें उतर येईल त्याप्रमाणें आपण वर्तणूक करूं म्हणून कृष्टणरावजी म्हणतात. दुसरा प्रकार राव म॥रचे सांगण्यात आपल्यास इनायतनामा पाठऊन हुजूर बोलाऊन न्यांवें किंवा हुजूरीहून मातबर मुख्तार पंतप्रधानाकडे यावा.या दोन्हीं वितरिक्त परस्परें संशय दूर होऊन इतिफाकानें येके कामावर सरगरम होण्याचा मार्ग दिसत नांहीं. चौथाईचा तह व्हावा म्हणून हुजूरचे इरशादेप्रमाणें नवाब मुइनुदौलानीं कृष्टणरावजीस पत्र लिहिलें होतें. त्याचें उतर राव म॥रनुलेनीं जें पाठविलें तें पूर्वीं लिहिलें आहे. त्याउपरि जिवाजी रघुनाथ यानीं येथील कारभाऱ्यास पत्रें पाठविलीं त्यांत म॥र लिहिला होता कीं चौथाईचा तह जाहल्यांवितिरिक्त चौथ वगैरे मामलतीचे रुपये न देणें म्हणून समग्र जागीरदार व आमीलास हुजूरीहून इनायतनामे सादर जाहले आहेत. यावरून कारपरदाजानीं हुजूर अर्ज करावयाविषईं जिवाजीपंतास म॥र पत्रीं लिहून पाठविला कीं हजरत मगफरतमाब यांचे समईं ज्याप्रमाणें अमल चालत होता त्या पधतीनें अमल ज्यारी व्हावा म्हणून प्रथमतां जो इरशाद हुजूरीहून जाहला तो आम्हीं कबूल केला व उभयपक्षीचे आमिल पाठऊन हरयेक माहालाची रुजवात करावी म्हणोन करार जाहला असतां रुजवात होत नांहीं. व सांप्रत नवीन शकलेनें इरशाद होतो व चौथाईचा अमल बंद व्हावा म्हणोन सांप्रत जागीरदार व आमिलास ताकीद जाहली. त्यास पूर्वीं मुबारुजुलमुलुक बहादराकडून अमल ज्यारी होत नांहीं, म्हणून हरयेक मामलतदार नालिस व सिकवा सांगत होते व सांगतांत. त्याची समजावीस आम्हीं करीत होतों कीं जनाब मुबारकेंत अर्ज करून तुमचे मामलतीचा फैसला करऊन देऊं. सांप्रत हुजूरीहून मामलतीचे रुपये न द्यावे म्हणून इरशाद जाहला. त्यापक्षीं कारपरदाजांस तालुकदारांची समजावीश करावयास कांहीच मार्ग राहिला नांहीं. व मामलेदार राज्याचे चाकर व चौथाईची मामलत राजे शाहूपासून सर्वत्रांस आहे. याकरितां आमचे म्हणजे कारपरदाजांचे ताबेदारींत मामलतदार राहणार नांहींत. व ज्यास ज्या प्रमाणें

कळेल त्या रीतीनें मुफसदी करून हंगामा करतील. याप्रमाणें जिवाजीपंतास उतर हुजूर अर्ज करावयाकरितां गेलें. व कृष्टणरावजीनी बालाजीपंताचे जुबानीचा इजहार मजलाहीं याप्रमाणें सांगितला. सविस्तारें वर्तमान हुजूर व स्वामीस कळावें म्हणून लिहिलें आहे. अजिमुदौला बहादरांकडील किस्त दुयमच्या चिठ्या रो कृष्टणराव-जीनी औरंगाबादेस सदासिवपंतनामे कारकून रावजीचे तरफेनें तेथें आहे त्यासमीप पाठविल्या. कितेक लहान मोठीं कामें बहादर म॥राकडून होणें त्याची याद लिहून पाठविली आहे. यादी प्रो कामें जाहल्यानंतर चिठ्या बहादरांस देईल. बहुत काय लिहिणें. हे विनती.

पै॥ छ २० माहे रजेब सन ११९५ हिजरी. मैं जोडी तैनाती राये मजकूर रो शुक्रवार.

---

**A. R. No. 59.**

१२ रजब ११९५ हिजरी
४ जुलै १७८१

पै॥ छ १९ माहे रजेब गुरवार सन ११९५ हिजरी. च्यार घटका दिवस बाकी असता मै डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टांग नमस्कार. विनती उपरि येथील वर्तमान ताा छ १२ रजब गुरुवासरपर्यंत माो पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ ७ माहे माारीं हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें होतें ते पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्याउपरि छ माारपर्यंत सविस्तारें दफेवार वर्तमान लिहून सेवेसी व हुजूर पत्रें डांकेवर पाठविलीं

आहेंत. दारोग्याचे विद्यमानें पत्रें सेवेसी पावतील. छ ८ रजबीं पृथक जोडी पत्रासहित सेवेसी पाठविली तेही पावेल. सांप्रत हैदर-अलीखानांचे वकीलासीं व येथील कारपरदाजासीं खिलवत दोन तीनदां जाहली. त्याचा शोध घेऊन माघाहून सेवेसी लिहून पाठवीन. बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

श्रीनिवास

विनतीजे. हैदर नायकाची व इंगरेजांची लढाई त्रिचनापली-समीप जाहली. त्याचें वर्तमान हैदरअलीखानांचे वकीलानीं समक्ष सेवकास सांगितलें, त्याची इतिला हुजूर व स्वामीस व्हावी म्हणोन लिहिलें असे. तीन च्यार हजार स्वार, व येक हजार बार व तोफासहित छ २१ जमादिलाखरीं चंदावरापासून स्वार होऊन बारा १२ कोस त्रिच-नापलीस रातोरात घटका दिवस प्राथःकाळचा आला, ते समईं जाऊन पोंहचले, व किल्यासमीप हजार बारासे लोक नमूद जाहले, ते समईं त्रिचनापलीहून तीन पलटणें जमियत व तोफा बाहेर निघाल्या. गोरा फिरंगी शंभरपर्यंत होते व तुरकस्वारही कांही होते. हैदरखानाचे लोकावर शलक करीत आले. खान म।।राचे लोकानीं त्यांस आंगावर घेऊन पसपा जाहले. दोन कोसपर्यंत इंगरेजांचे लोकास कसीस करून आणिलें. हैदरअलीखानाकडील आणखीं कुमकी बार व स्वार व खांसा येऊन पोंहचले व परस्परें लढाई जमले. ते समईं हैदरखानाचे लोकांनी बहुत निकड करून चालून घेंतलें. ते समईं पांचसातसे लोक खान म।।राकडील व हजारपर्यंत इंगरेजांकडील लोक जखमी व ठार जाहले. व इंगरेजांची जमियत पसपा जाहली, व त्यांचे पिछ्यावर खान मा।रचे स्वार व बार लढाई करीत गेले. त्रिचनापलीचे किल्यापर्यंत गेले. ते समईं किलेवाल्यानीं दरवाजे बंद करून तोफाचा मार केला, त्यांत दुतरफा लोक जाया जाहले व इंगरेजांचे लोक बेहिमत होऊन कांहीं

खंदकांत पडले, व कांहीं पळाले व कांहीं मारले गेले. व दोन तीनसें बार व कांही तुरक स्वार व येक दोघें कुमनदान सरदार व तीन तोफा पाडाऊ खानम॥रांचे फौजेत आले. त्याउपरि त्रिचनापलीसमीप चिंतामणीपेंठ म्हणोन होती ते लुटून जाळली व श्रीरंग व जंबुकेश्वर हें दोन्हीं ठाणीं घेंतलीं, व तेथे मुकाम केला. याप्रमाणें छ २२ जमादिलाखरीं लढाई जाहली. व छ २४ माहे म॥रीं खानम॥रनें बालाजीपंत व हरीपंत व कृष्टणराव व माहदाजी सिंदे यांचे नांवें पत्रें लिहून जासूद मुजरद पाठविले. ते छ ११ माहें रजबीं पुण्यास बालाजीपंतासमीप आले. व पंत म॥रनुलेनीं हरकाऱ्यांस इनाम दिधला. सेवेसी श्रुत होय, हे विनती.

पै॥ छ १९ माहे रजेब गुरवार सन ११९५ हिजरी. च्यार घटका दिवस बाकी राहता, मै डांक सरकार.

श्रीनिवास

पुरवणी, श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी, विनतीजे. राजश्री माधवराव रामचंद्र यांचे इनामी गांवची सनद स्वामीनीं करून दिधली, याची शुक्रगुजारी राजश्री फार करीत होते. चालीसगांव परगण्यांत दोन हजार रुपयाची जागीर राजश्रीस आहे. बशर्त नजर तनख्याप्रमाणें बहालीची सनद करून द्यावी. येविषईं स्वामीस विनती लिहिणें म्हणून मजला सांगितलें, व रा॰ गणेशपंत वकील त्यांजकडील स्वामीचे सेवेसी आहेत, त्यांचे नांवचा लिफाफा राजश्रीनी लिहून पत्र पाठविलें आहे. गणेशपंत स्वामीसमीप असलियां त्यास पत्र द्यावें, ते नसलियां चिरंजीव राजश्री रघोत्तमराव यानी लिफाफा फोडून पत्र वाचून, म॥र स्वामीस विनती करावी, म्हणोन मजला माधवरावजीनीं सांगितलें आहे. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणं, हे विनती.

पै॥ छ १९ माहे रजेब सन ११९५ हिजरी, गुरुवार. च्यार घटका दिवस बाकी राहता, मै डांक सरकार.

## १६४

## श्रीनिवास

पैा छ १९ माहे रजेब गुरवार सन ११९५ हिजरी. च्यार घटका दिवस राहता, डाक सरकार.

अखबार पुणें, अज इ।। छ ७ माहे रजब लगायत छ १२ माहे म।।र सन ११९५ हिजरी गुरुवासर, बाजीपंत व माधवराव रामचंद्र छ ५ माहे म।।रीं पुण्यास आले. गाडराची पलटणें कल्याणीस पांच पर्यंत जमा जाहलें आहेंत. बिरेवाडीस हबसियांनी मोरचे लाविले आहेत. माहदाजी सिंद्याची छावणी सिपरीकोलारसासमीप जाहली. हैदर अलीखान चंदावर प्रांतीहून पुन्हां चिदांबरास करनल कूट इंगरेजांचे रुखावर जाणार. मानाजी फांकडे व भांबूराव दोन हजार स्वारानसी पंढरपुरासमीप जमा जाहला होता. त्याची व प्रतिनिधीकडील फौज मा।रनुलेचे तंबीकरिता पंतप्रधानाकडून रवाना जाहली होती, त्यांसी लढाई जाहली. फांकड्याचा मोड होऊन पळाला. या वितरिक्त अवांतर वर्तमानासहित छ ७ माहे म।।रीं पत्रें पाठविलीं तें पाऊन वर्तमान कळलें असेल. त्याउपरि, प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान दफेवार लिहिलें असे.

प्रतिनिधीची फौज मानाजी फांकड्याचे तंबीकरितां रवाना जाहली होती. त्यांची व फांकड्याची लढाई पंढरपुरासमीप जाहल्याचें वर्तमान पूर्वी लिहिलें आहे. सांप्रत कलमी खबर आली कीं, भांबूराव दस्तगीर जाहला व तीन च्यारसें घोडीं लुटीत आली. मानाजी फांकड्या पळून सुरापुरचे रुखें गेला. येशवंतराव नाईक निंबाळकर दहीगांवी परशरामपंत मिरजकराचे विचारानें राहिला आहे. येथील कारभाऱ्यांनी भांबूराव यास पुण्यास आणविलें आहे. बिरेवाडीस हबसियानी मोरचे लाविले होते. याकरितां पंतप्रधानांनी पुण्याहून हजार बारासे गाडदी रवाना केले. ते अद्यापि घांटतोंडी पुण्याहून दाहाबारा कोसीं आहेत. गिर्दनवाह किल्याचे प्यादे दोन तीन हजारपर्यंत बिरेवाडीचे कुमकेस आले. त्यांनी हबसियांचे

मोरचे किल्याजवळील उठविले व किल्यांत मजबूतीनें आहेत. या दिवसांत कोकणांत पर्जन्य येकरूप दिवारात्र वृष्टी, याकरितां हबसियांची जमीयत पुन्हा माघारा जजिऱ्यास गेली. खारीज वर्तमान यैकिलें कीं, बिरेवाडीहून तीनच्यार कोसी हबसियांचें मकान आहे, त्या स्थळीं हबसियांची जमीयत राहिली आहे. पर्जन्य उघडल्यानंतर काबू पाहून पुन्हां येणार.

करनल गाडर व जनराल मुंबईकर यांची पलटणें कल्याणीत व पनवेलीस आहेंत, तेथोन हरकत करून पुढें येंत नांहींत. याकरितां येथील कारपरदाजानी तळेगांवासमीप व घांटावर बतरीक चौकी दोन तीनसें लोक ठेविले आहेत. इंगरेजांचे हरकतीप्रमाणें मातबर फौज रवाना करतील.

करनल गाडर मुंबईहून वसईस गेला. व जंगी सरजामाची तयारी होत आहे. मोमज्याम्याच्या खांद्या हजार बारासेपर्यंत तयार करविल्या आहेत म्हणोन येथील कारपरदाजासमीप खबर आली आहे. मोमज्यामे करवावयाचें प्रयोजन ध्यानास येत नांहीं.

२

पुरवणी अखबार छ १२ रजब सन ११९५ हिजरी. खंडोजी भोसले मुधोजीचें पुत्र यानीं इंगरेजापासून रुपये घेऊन माघारा फिरले. याकरितां बालाजीपंत कारपरदाज बहुत नाखुश होऊन दिवाकरपंतास तात्याचें पत्र लिहून पाठविलें होतें. त्याचें उतर पंतम॥रनुलेनीं पाठविलें कीं, श्रीमंत पंतप्रधानांचे सेवेंत मुधोजी भोंसले व आपल्यास दुसरा भाव सर्वथैव नांहीं. खंडोजी भोंसले व त्याजसमागमें जे कारभारी होते त्यानीं छावणीची ताबीसेची बरदास्त न करितां, घोडीं बेशुमार मेलीं, म्हणोन घाबरे होऊन माघारा फिरावयाचा निश्चय केला. रिकामें फिरोन येण्यापक्षीं, कांहीं येक आपला नफा व शत्रूचें नुकसान करावें, म्हणोन बतरीक जियाफत कांहीं रुपये घ्यावे, म्हणोन घेतले असतील. श्रीकृपेनें दसऱ्यानंतर मातबर व ताजें दमाचे फौजेनसीं पुन्हां इंगरेजांचे तंबीस बंगाल्याचे रुखें रवाना होतील. याप्रमाणें उजरख्वाही करून पत्र पाठविलें आहे म्हणोन यैकिलें.

हैदरअलीखानाकडील वर्तमान नरसिंगराव वकीलाचें जुबानीं यैकिलें कीं, खांनम।।र आखर जमादिलाखर चंदावरापासून च्यार कोसावर होता. चिदांबरास जावयाची तजवीज होती. कूच करून गेल्याचें वर्तमान आलें नांहीं. चंदावर प्रांती कितेक मातबर स्थळीं ठाणीं बसविलीं व तमाम प्रांत ताख्ततारा‌ज केला याप्रमाणें वर्तमान यैकिलें. खारीज यैकिलें कीं, पंतप्रधानांचे कारपरदाजानीं हैदरअलीखानास लिहून पाठविलें होतें कीं, हजरत बंदगानआलीचा कस्द इंगरेजांचे तंबीचा दिसत नांहीं. व मुधोजी भोंसल्यानीं इंगरेजापासून रुपये घेऊन आपली फौज माघारा आणविली. याउपरि आम्हीं व तुम्हीं उभयतां राहिलों. याउपरि इंगरेजांचे विषईंची काय तजवीज याचें प्रत्योतर खानम।।रानें कारपरदाजास पाठविलें कीं, उभयतानीं नेमाप्रमाणें इंगरेजांचे तंबीस सरगरम असावें हेंच उतम. कदाचित ते शरीक मसलहत न होतील तरी काय चिंता आहे. आम्हीं व तुम्हीं उभयतां एकचितेंकरून जे काम चितावर घेऊन, च्याहूं त्याचा बंदोबस्त करूं. मुंबई व सुरतकर इंगरेजांचे रुखावर तुम्हीं मजबूत राहणें. व माहदाजी सिंद्यानीं सिपरीकोलारसेसमीप इंगरेजांची जमीयत आली. त्यांची तंबी करारवाकई करावी. सांप्रत आमचे रुखावर इंगरेजांची जमीयत मातबर आहे, व पुन्हां जमा होत आहे. त्याची तंबी करारवाकई होईल याप्रमाणें पत्रें खानम।।राची आली म्हणोन खारीज यैकिल्याप्रमाणें लिहिलें असे.

छ ११ माहे मारीं हैदरअलीखानाकडील पत्रें मुजरद जासूदाबरोबर आलीं. पत्री म।।र लिहिला होता कीं, इंगरेजांची कांहीं पलटणें त्रिचनापलीसमीप आली होतीं खानम।।र चंदावरापासून स्वार होऊन गेला. परस्परें लढाई जाहली. इंगरेजांची सिकस्त जाहली येक दोन सरदार दस्तगीर जांहले व तोफा वगैरे लूट आली म्हणोन यैकिलें. पंतप्रधानांचे काभाऱ्यानी जासूद जोडीस वीस रुपये व दोन सेले व मुंडामे इनाम दिधला. पुन्हा शोध करून वर्तमान लिहून पाठऊं, हे विनती.

पै।। छ १९ माहे रजेब गुरवार सन ११९५ हिजरी. च्यार घटका दिवस बाकी राहता, मै डांक सरकार.

---

**A. R. No. 60.** १३ रजब ११९५ हिजरी

५ जुलै १७८१

पै।। छ १९ माहे रजेब गुरवार सन ११९५ हिजरी, च्यार घटका दिवस राहता मै डांक सरकार.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. येथील कुशल त।। छ १३ माहे रजब. मु।। क।। पुणे स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन, स्वानद लेखन आज्ञा करीत असिले प।। विशष. यथील वर्तमान छ ७ माहे म।।र, रोज शनवारी प्राथःकाली सरकारचे डाकेसमागमे दुसरे तिसरे प्रहरी राजश्री हैबतराव याचे तैनाती जोडीसमागमे यैसी दोन विनंतीपत्रे सेवेसी रवाना केली. ते पावोन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनतर यथील वर्तमान दरबार वगैरे जाला होता. उपरातिक राजश्री नाना व हरीपंत व बाजीप(त) आना या त्रिवर्गाचा खिलवत जाला. भाव यैकिल्यात आला की, राजश्री बाजीपतासमागमे फौज होती. त्या लोकाचे देन्याचा गवगवा. त्याचा काही थोडा बहुत देन्या(चा) फडच्या करून द्यावा. व पुढे लोकाची समजावीस करून लोकानी दसऱ्याचे हगामास जमा सत्वर व्हावे याअर्थी खलवत जाला. शृत होयें. राजश्री भादूराव प्रतिनिदी व मानाजी फाकडे वगैरे यानी हजार दोन हजार स्वार मेलऊन खूल केले होते. त्याचे पारपत्यास भवानराव प्रतिनिदी याची फौज गेली होती. त्याची लडाई होऊन र।। भादूराव प्रतिनिदी धरला. व मानाजी फाकडा पळून गेला. पाच सातसे घोडी पाडाऊ

करून आनिली. हे वर्तमान पूर्वीच विनंतीपत्री सविस्तर लेखन केले आहे. त्याजवरून शृत जाले असेल. र॥ भादूराव व मानाजी फाकडे यासी व भवानराव प्रतिनिदी याचे फौजेसी लडाई जाली. भादूराव व मानाजी फाकडे वगैरे सिकस्त जाले. भादूराव प्रतिनिदी धरले व मानाजी फाकडे वगैरे पलून गेले. भादूराव व फाकडे वगैर याजकडील पाच सातसे घोडी वगैरे येक हाती पाडाऊ करून, भवानराव याचे फौजेनी अनीक भादूराव धरला. मानाजी फाकडे वगैरे पलून सुरा-पुराकडे गेले. शृत होये. छ ८ माहे म॥र रोज रविवार आशाडी येकादसी म्हणौन श्रीमंत व नाना व हरीपत व बाजीपंत वगैरे सर्व मडली वगैरे परवतीस दशर्णास गेले होते. च्यार घटका बसले होते. वाघ व हाती आणून दोन घटका तमाशा केला. उपरातिक श्रीमंत वगैरे आपल्या वाड्यास आले. शृत होये. हैदर नायेकाची पत्रे आली. पत्रे घेऊन वकील दरबारास आले होते. पत्रे वकीलानी नानास दिल्ही. उपरातिक नाना व हरीपंत व कृष्ण-रावजी व बाजीपंत व हैदर नायेकाकडील वकील यासी खिलवत जाला. नाईक म॥र याचे पत्राचा व खिलवताचा भाव यैकिल्यात आला की हैदर नायेकासी व इग्रजासी सलूकाचा पैगाम लागला आहे. सलूक त्याचा होनार. या सलेची पत्रे नाईक म॥र यानी यास लिहिली आहेत की आपले मर्जीचा भाव ल्याहावा. या अनवये पत्राचा भाव यैकिल्यात आला आहे. परतु हे वर्तमान अद्याप कोठे कलू देत नाहीत. परतु वदंता पत्राची सलूकाची आहे. मागती शोध करून लेखन केले जाईल. हैदर नायेकासी व इग्रजासी याचे सूत्राने सलूक जाल्यास उतम आहे. याचे सूत्राने न जाल्यास याचे मसलतीस पेच भारी पडल, यैसे आहे. हैदरसी व इग्रजासी सलूक होतो, यैसी वदता आहे. मागती तहकीक वर्तमान यैकिल्यास लेखन केले जाईल. शृत होये. राजश्री हरीपत व नाना याचा खिलवत नित्य होत असतो. कितीक राज्यकारनाविशई व आपले दौलतीचे बदोबस्ताविशई होत असतो. परतु यास इग्रजासी मसलत दरपेश फार आहे. शृत होये. छ ९ रोज सोमवार इग्रजाची पलटने कल्यानीस आहेत.

जगी सरजाम कल्यानीस व ममईस भारी होतो. करनेल गाडर म़मईस व कल्या(नी)स येत जात असतो. या समई इग्रजानी भारी सरजाम करने माडला आहे. पुढे ते भाद्र(पद) मासीच इकडे उद्वोग करणार• यैसे वर्तमान आहे. या अर्थी कारभारीही श्रावन मासी सरकारचे डेरे बाहेर करनार यैसी वदता आहे. सरदारास व फौजेचे लोकास ताकीद करितात की दसऱ्यास सत्वर जमा व्हावे. लोकास दोन दोन रोजमुरे वगैरे कापड देऊन रुखसत घरास केले आहेत. त्यास ताकीद केली आहे की दोन महिने घरास राहून दसऱ्यास यावे. पुढे तुम्हास नालबदी वगैरे देऊ. परतु सागितल्याप्रमाणे सत्वर यावे. यैसी ताकीद केली आहे. शृत होये. कमावीसदार वगैरे मिळाले आहेत. माहाली वगैरे कामकाज ज्यारी आहे. शृत होये. राजश्री गनेशपंत बेहेरे व दुर्गोजी भापकर कोडाईबारीकडे होते. त्यास दुर्गोजी भापकर दोन हजार फौजेनसी कोडाईबारीवर पिपलनेरास छावनी करून राहिले. गनेशपंत पुन्यास येतात, कारन की त्याचे फौजेचा गवगवा, याकरिता येतात. हे पूर्वी लेखन केले होते. त्यास भापकर म॥र कोडाईबारीकडे राहिले. गनेशपंत पुन्यास येतात. दोन तीन कूचे गनेशपंताची जाली. सत्वर येथे येणार यैसे वर्तमान आहे. आलियावर लेंखन केले जाईल. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे काम जाले. शृत होये. छ १० रोज मगलवार, हपशानी कोकनप्राती तल्याघोसाल्याकडे उपद्रव माडला आहे. त्याचे पारपत्यास येथून गारदी वगैरे गेले आहेत. प्रस्तुत वर्तमान आहे की हपशानी येक स्थल लहानसे तल्याचे किल्याजवल होते, ते घेतले. मागती वर्तमान आलिया लेखन केले जाईल. परतु हपशानी इग्रजास मेलऊन उपद्रव माडला आहे. शृत होयें. सिदे कोल्हारसिप्रीवरी आहेत. इग्रज तेथून नवा दाहा कोसावर आहेत. इंग्रजासी व सिंद्यासी लढाई आहे. इग्रजाजवल दाहा पधरा पलटण जमली आहेत. इंग्रज गालिब आहेत यैसे वर्तमान आहे. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. विदित होये. छ ११ रोज बुधवार, राजश्री कृष्णरावजी दरबारास गेले होते. नाना व हरीपंत व

कृष्णरावजी या त्रिवर्गाचा खलवत जाला. खलवताचा भाव कितीक आपले दौलतीचे बंदोबस्ताविशयी जाला. दुसरे इंग्रजाचें पारपत्याविशई जाला की दसऱ्याचे सनास फौज जमा करून इंग्रजाची मोहीम करावी. येंविशई येंज्यमानसाहेबास पत्रे ल्याहावी म्हणौन रावजीस सागितले. या अनवयें खलवत जाला म्हणून यैकिल्यात आले. शृत होये. हैदर नाइकाची पत्रे आली. त्यांचा अनवये यैकिल्यात आला, तो बजिनस पत्री लेखण केला आहे. त्याजवरून ध्याणास येईल. पत्राची उतरे नाईक मजकुरास लिहिणार. काये उतरे लिहितील ते ध्याणास आलिया सेवेसी लेखण केले जाईल. श्रुत होयें. छ १२ रोज गुरुवार, रा॥ भगवंतराव निबालकर येथे चाकरीचे उद्वोगे व येज्यमानसाहेबाकडून जागीर मोकली करावी या उद्वोगे आले आहेत. हे येक दोन विनंतीपंत्री सविस्तर लेखण केले आहे. त्याजवरून ध्याणास आले असेल. निबालकर मजकूर याचे कारकूण कृष्णरावजीचे घरी येतस्तात. रोजगाराविशई व जागीर मोकली करवावयाविशई रावजीसी बोलने बोलतात. रावजीही त्यासी समाधानपूर्वक गोष्टी सागतात की तुमचा सर्व बंदोबस्त करून देऊ. हाजूरातून बंदोबस्त करून देऊ अथवा येथील रोजगाराची सोये करून देऊ. यैसी भाशने करितात. श्रुत होये. दरबार वगैर जाला होता. उपरातिक नाना व हरीपंत यासी खिलवत जाला. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. सर्व प्रकारे दासाणुदास स्वामीचा असे. बहुत काये लिहिणे. कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 61.** १७ रजब ११९५ हिजरी
९ जुलै १७८१

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां॥ नमस्कार, विनती उपरि. येंथील

वर्तमान ताा छ १७ रजब आषाढ वद्य पंचमी मंगळवारपर्यंत मो पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ १३ माहें म।।रीं डांकेवर हुजूर अर्जी व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें. तें दारोग्यांचे विद्यमानें सेवेसी पावलें असेल. सांप्रत छ १७ माहे म।।र पर्यंत येथील वर्तमानासहित हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्रें पाठविलीं आहेंत. पृथकपत्रावरून सविस्तारें वर्तमान सेवेसी व हुजूर श्रुत होईल. खांसगत तैनाती जोडी छ १९ माहे म।।रीं रवाना करितों, तेहीं अर्जी व विनतीपत्रासहित सेवेसी पावतील. चिरंजीव राजश्री रघोतमराव सेवेसी पाऊन येथील कचें वर्तमान व खानगी सर्व विनती केली असेल. मुलकी कामाचा बंदोबस्त खांवद जबरदस्त वालीमुलक आहेत, त्यापक्षीं होईल. व सर्वत्र इलतिजा व मिनतवार इरशादेप्रमाणें अमल करतील. सेवकाकडील खानगी काम स्वल्प. स्वामी हुजूर अर्ज करतील. परंतु अर्ज हुजूर-पिजीरा होऊन काम मनोदयानुरूप व विनतीरूप होण्याची आशा व उमेद स्वामीचे कृपेची आहे. कृपापत्र छ २९ ज।।लाखरचे हणमता व कृष्टणा जासूदासमागमे पाठविलें तें छ १३ माहे रजबीं पाऊन संतोष जाहला. विशेष काय लिहिणें हे विनती.

श्रीनिवास

पुरवणी. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी. विनती उपरि. चौथाईचा तह कारपरदाज करून देत नांहींत. व मोरो गिरमाजीस बोलांऊ पाठविलें आहे. व अजीमुदौला बाहादरांस किस्त दुयमच्या चिठ्या देत नांहींत. व खिसाऱ्याची बाबत कबूल न करितां इंगरेजांची तंबीस मुतवजे होणें म्हणून कारपरदाज म्हणतात. यावरून हुजूरची मिजाज मुबारक बरहम होऊन येथील कारपरदाजांचे कोतेअंदेसीचा अंज्याम ठीक नांहीं. व अमार्गानें चालल्यास तदारूक होईल. या अन्वयानें मजला इनायतनामा हुजूरचा आला. त्याचा म।।र राजश्री कृष्टणरावजीस सागितला. राव म।।रनिलेनीं त्याचे उतर केलें कीं, अजीमुदौला बाहादरांकडील

किस्त दुयमच्या चिठचा पाठऊन दिधल्या. जुजवी कामाकरितां बहादर म॥र दिकत करितात, ते न करावी. या करितां दोन दिवस बालाजीपंतानीं चिठचा आटकाविल्या होत्या. खिसाऱ्याचा म॥र बहुतवार बोलण्यांत व लिहिण्यांत आला. परंतु इंगरेजांची मसलत कोणे प्रकारें करावी, हे सलाह इरशाद हुजूरीहून जाहल्याप्रमाणें येथील कारपरदाजानीं अमल केला आहे. सांप्रत खिसाऱ्याची बाबत कबूल जाहल्यावितरिक्त इंगरेजांचे तंबीचा अज्म हुजूरीहून होत नांहीं, म्हणोन इरशाद होत आहे. त्यास ज्याप्रमाणें मर्जी मुबारकेचा खुलासा असेल त्याप्रमाणेंच येथील कारभारी वर्तणूक करतील. परंतु हुजूरचे मर्जीमुबारकेचा खुलासा व येथील कारपरदाजांचा येतकाद हुजूरांत कोणे प्रकारचा, याचा विस्तार परस्परें कागदपत्रीं कोठवर ल्याहावा, व लिहिल्यांत येणार नांहीं. याचप्रमाणें चौथाईचे तहाचा म॥र, चौथाईचा तह सनदीपत्रीं करून देणें. काम लहान नांहीं. पूर्वीं शंकराजी मल्हार या कामाकरितां साताऱ्यास आले होते. व बालाजीपंत अमीरुलउमराव याजकडें गेले तेव्हां तह ठरला. या अर्थी कृष्टणरावजीनीं स्वामीस व हुजूर व मोईनुदौला बाहादरांस आपले तरफेणे लिहिणें म्हणोन मजला सांगितलें नांहीं. परंतु रावजीचे बोलण्याचा खुलासा जो सेवकाचे ध्यानास आला तो हुजूर व मोईनुदौला बहादर व स्वामीचे सवसी लिहितों. इंगरेजानीं अरकाट व सिकाकोल राजंबदरी वगैरे सरकारआलीचा प्रांत घेतला. बंगाला वगैरे बादशाही सुबा व सुजायदौलाचा मुलक घेऊन ते दौलत पायमाल केली. सांप्रत पंतप्रधानांचे रियासतींत खलेल पाहून हगामा करितात. या अर्थी इंगरेज बदमामली व हिंदुस्तान व दक्षणेचे रियासतीचा दाईया त्यांचा आहे. याचप्रमाणें हैदरअलीखान बदकौली. दोघांचे कराराचा भरवसा नांहीं. सांप्रत समयोचित हुजूरचे इरशादेप्रमाणें हैदरअलीखानांसीं व पंतप्रधानासीं दारमदार जाहला आहे. त्यास हुजूरीहून पंतप्रधानांची दस्तगिरी जाहली आहे. त्याची परवरश मंजूर आहे व व्हावी. व दौलतचे उपयोगी हरवक्त जे सलाह खातरमुबारकेस येत जाईल त्याचा इरशाद व्हावा. व येथील

कारपरदाजांची व या दौलतेचा अहवाल कोणे प्रकारचा याची पुरसीस सदैव होत जावी. बालाजीपंताकडून फिदवियतींत हरगिज कसूर होणार नांहीं. व कृष्टणराव तर प्रतिक्षणीं हुजूरचे इनायतीचा दम मारतात व शरीरेंकडून नौकर व ताबेदार पंतप्रधानांचे परंतु अंत:करणापासून फिदवी व ताबेहुकम हुजूरचे म्हणवितात. जाहिरा नौकर पंतप्रधानांचे, याकरितां मुख्तार नांहींत. दुसऱ्याचे ताबेदार त्यांचे सांगितल्याप्रों व्रर्तणूक करावी लागती. राव म॥रनुलेचे चितापासून हुजूर येऊन सादत मुलाजमत हासल करावी. व हुजूरची व पंतप्रधानांची दौलतख्वाहीचा यत्न आपले मकदुराप्रमाणें करावा हे चितापासून आरजु. यार्करितां साल गुजस्तां सेवकाकडून अर्जी हुजूर लिहविली. जे इनायतनामा

२

पुरवणी पत्र श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी

मुतजमनतलब राव म॥रचे नांवें व कृष्टणराव यांस हुजूर पाठवणें. म्हणोन बालाजीपंतास पाठऊन द्यावा म्हणोन लिहविल त्यास हुजूर व अर्ज मंजूरपिजीरा न जाहला. याकरितां सांप्रत चिरजीव राजश्री रघोतमराव यांचे मुखोदगत किते म॥र अर्ज करावयाचा सांगोन चिरंजीवास हुजूर रवाना केलें. त्यानीं स्वामीचे विचारें हुजूर अर्ज केला असेल. प्रस्तुत पुन्हा रावजीचे बोलण्याचा खुलासा हाच कीं, इतर नौकराप्रमाणें मीं नौकर परंतु ताबेदार पंतप्रधानाचा. याकरितां आपले यख्तियारीनें हुजूर येतां येत नांहीं. येथील कारभाऱ्यांनी आपले तरफेनें पाठवावें. तरीं पूर्वी औरंगाबादचे छावणींत हुजूरीहून इनायतनामा सादर जाहला. त्यावरून कारपरदाजानीं येथोन राव म॥रनुलेस रवाना केलें. श्रीकृपेनें हुजूरचे मर्जीमुबारकेप्रमाणें सर्व कामाचा फैसला जाहला. वैकुंठवासीं माधवराव जातीनें पोख्तकार होते. व त्यास कर्नाटकची मोहीम करणें, ते समई आपले तरफेनें हुजूर अर्ज मारूज करीत होते. सांप्रत बालाजीपंत पंतप्रधानासहित हुजूरचे ताबेदार. व यांची परवरश व अहवालपुरसीस

सदैव हुजूरीहून होत जावी. याकरितां राव म॥रनुलेस इनायतनामा हुजूर येण्याविषईं व पाठवण्याकरितां बालाजीपंतास बहुत सत्वर यावा. पत्रदर्शनीं रावजी हुजूर येतील. चौथाईचा बंदोबस्त व इंगरेजांकडील मोहिमेचा निश्चय, व ज्यांत हुजूरची मर्जीमुबारक खुश, व पंतप्रधानांचे अहवालावर मुतवजे, व पंतप्रधानांची बेहबूदी, व कृष्टणरावजीस व हुजूरचे मुकरब व मुसाहबांस येश व रावजीचे अहवालावर हुजूरची इनायत व सरफराजी व हमजीनसांत सुरखरुई इतकीं कामें होत आहेंत. या अर्थी इनायतनामा सादर व्हावा हा रावजीचा खुलासा. सेवकाचा वोहदा यैकिलें वर्तमान हुजूर ल्याहावें त्याप्रमाणें लिहिलें आहे. परंतु येथील प्रकार पाहतां कयासास जो निश्चय जाहला त्याची इतिला स्वामीस लिहण्यांत कांहीं संशय नांहीं. परंतु धैर्य व जुरत करून हुजूर व मोईनुदौला बहादरासही लिहिलें आहे. जे कृष्टणरावजीची अरजू हुजूर येण्यांची व येथील कारभारी कां पाठवीत नांहींत म्हणोन आपण म्हणतील. तरी हे नवीन कारभारी. यांस हुजूरचे मर्जीचा प्रकार पुरतेप्रमाणें ध्यानास आला नांहीं. व अरण्यचराप्रमाणें संवशई. व रावजींनी हजूरचा पक्ष धरून कांहीं सलाह सांगावी तर हुजूरची ज्यानबदार. याप्रमाणें संशय करून निवड करतील. याकरितां रावजीस हुजूरचे तरफेंचा ज्वाबसाल स्पष्ट करता येत नांहीं. याकरितां यांस हुजूर बोलाऊन न्यांवें. व हुजूर आल्यानंतर येथील कारपरदाजास माकुल करून लिहतील. व ज्यांत मर्जी मुबारकेंचा खुलासा त्या डौलावर रसायणें करून कारभार उतरतील. चौथाईचा तह ज्यांत हुजूरची किफायत त्याप्रमाणें होईल. परंतु इंगरेंजासी बिगाड किंवा सलाह करणें याचाही निश्चय मर्जीमुबारकेंचे इरशादेप्रमाणें होईल. या प्रकारचें काम होत आहे त्यापक्षीं रावजीस हुजूर बोलाऊन नेण्यांत सरकार किफायत सेवकाचे ध्यानास आली. यास्तव विनती लिहिली आहे. याउपरि जे सलाहदौलत असेल त्याप्रमाणें हुजूरीहून अमल होईल, हे विनंती. स्वामीनी सेवकाचे लिहिल्याप्रमाणें व ज्यांत मर्जीमुबारक मुतवजे होऊन कृष्टणरावजीस येण्याविषईं

इनायतनामा सादर होईल त्याप्र।। विनती करून प्रत्योतर डांकेवर सत्वर पाठवावें, हे विनती.

---

श्रीनिवास

अखबार पुणें. अज इ।। छ १३ रजब लगायत छ १७ माहे म।।र सन ११९५ हिंजरी. पंचमी मंगळवार आषाढ वद्य. मुंबईहून करनल गाडराची पलटणें च्यार कल्याणीस येऊन जमा जाहलीं. व खांसा गाडर वसईस गेला म्हणोन खारिज यैकिलें. व वसई व मुंबईत जंगी सरंजामाची तयारी होत आहे. व बिरेवाडीस हबस्यानीं मोरचे लाविले होते. तें उठऊन माघारा तीन च्यार कोस जाऊन आपले तालुकियाचे मकानांत राहिले आहेत. पंतप्रधानाचे तरफेनें बिरे-वाडीचें कुमकेस गाडदी रवाना जाहले ते घांटावर आहेत. हैदरअली खानांची व इंगरेजांची लढाई त्रिचनापलीसमीप जाहली. इंगरेजांची सिकस्त होऊन कितेक मारले गेले. व कांहीं फरारी व दस्तगीर जाहले म्हणोन व आवांतर वर्तमानासहित हुजूर अर्जी व स्वामीचे सवसी पत्रें डांकेवर पाठविलीं. ते दारोग्याचे विद्यमानें सेवेसी पावलीं असतील. त्याउपरि प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान सविस्तारें लिहून हुजूर व स्वामीचे सेवेसी पत्रें पाठविलीं आहेंत.

बिरेवाडीहून च्यार कोसाचें फासल्यानें हबसियांकडील जमीयत आहे. पुन्हां काबू पाहून बिरेवाडी अथवा दुसरे मकानास येऊन माह-सरा करतील. याकरितां पंतप्रधानाचे तरफेंनें गाडदी कुमकेस रवाना जाहले होते ते घांटावर मुकामात करून राहिले होते. त्यास येंथील कारपरदाजानी ताकीद पाठविली कीं, बिरेवाडीस जलदीनें जाणें व तेथेंच राहणें.

करनल गाडर मुंबईहून वसईस गेला म्हणोन खारिज वर्तमान यैकिल्याप्रमाणें पूर्वीं लिहिलें होतें. सांप्रत येंथील कारपरदाजाचे

जुबानीं यैकिलें कीं, गाडर म॥राकडील च्यार पलटणें वसईत आहेंत व तीन च्यार कल्याणीसमीप. व खांसा गाडर व च्यार पलटणें मुंबईत आहेंत. महिना पंधरा दिवसानंतर पलटणाची तबदिल होत आहे.

हैदरअलीखानांची पत्रें छ ११ माहे म॥रीं आलीं. त्रिचनापलीचे लढाईंत खान म॥राची फते होऊन जंबुकेश्वरासमीप मुकाम करून राहिला आहे. छ म॥रचे पत्री खान म॥रानें येथील कारपरदाजास पत्री म॥र लिहिला आहे कीं, भोंसल्याची फौज बंगाल्याचे रुखावरून माघारा फिरली, व भोंसल्यानीं इंगरेजासीं साख्त केली. याकरितां बंगाल्याचे मोहिमेस तुम्हांकडील सरदार मातबर फौजेनसीं गेला तर भोंसलें त्या फौजेस शरीक होतील. व इंगरेजांस पायबंद होऊन कसीस पडेल. याकरितां बंगाल्याचे रुखें फौज रवाना करणें सलाह आहे. याप्रमाणें पत्र आलें. याचें उतर पाठवावयाकरितां पांच साहा दिवस कारपरदाजांची परस्परें बहस व सला व मसलत होत होती. त्यानंतर प्रत्योतर खान म॥रनुलेस लिहून पाठविलें कीं, बंगाल्यास फौज पाठवावी म्हणोन तजवीज बहुता दिवसापासून आमची आहे. परंतु चालीस हजार पर्यंत स्वार पाठविल्यावितिरिक्त तिकडील मोहिमेची सरबराई होत नांहीं. चालीस हजार फौजेचे रवानगीस तीस लाख रुपये नख्त पाहिजेत. पंतप्रधानांचे सरकारांत रुपया नांहीं. लोक तीन पिढ्याचे नौकर. सांगितल्याप्रमाणें चाकरी करतील परंतु त्यांचे रफीकास रुपये दिधल्यावितरिक्त रिफाकत करणार नांहींत. याकरितां रुपयाची मदद तुम्हाकडून बतरीक कर्ज हसना किंवा पेशकसी

२

पुरवणी अखबार छ १७ रजब सन ११९५ हिजरी.

चे यैवजी जाहलियां, येके महिन्याचे फुरसतींत फौज जमा करून बंगाल्यास रवाना करितों. या प्रमाणें पत्र लिहून खान म॥रास पाठविलें, म्हणोन कारपरदाज व कृष्टणराव बलाळ यांचे जुबानीं यैकिलें. खारिज यैकिलें कीं, बंगाल्यास फौज पाठविलियां इंगरेजास पायबंद

होऊन त्यांची पलटणें दक्षणेस येत आहेंत तें मवकूफ होतील. व हे सलाह पोख्त आहे म्हणोन येथील कारपरदाजानी तजवीज करून हैदरआलीखानास आपले तरफेनें लिहून पाठविलें. व वीस लाख किंवा पंधरा लाख पर्यंत रुपये पेशकसीचे यैवजीं पेशगी तुम्हीं द्याल तर हे मसलहत सेवटास जाईल व फौजेची रवानगी बंगाल्यास होईल म्हणून पंतप्रधानांचे कारपरदाजानीं आपले तरफेनें नूरम।।खान व नरसिंगराव वकीलास सांगोन त्यांजकडून पत्रें लिहविलीं व आपण लिहून पाठविलीं.

माहादाजी सिंदे सिपरीकोलारसेसमीप इंगरेजांचें रुखावर पांच साहा कोसाचे फासल्यानें सडे फौजेनसी आहेत. बाहिर बुनगा जाजती सरंजाम उजनसी माघारा पाठविला. सिंदे म।।रानीं येथील कारपरदाजास लिहिलें आहे कीं, सांप्रत पंचेवीस हजार स्वारानसीं इंगरेजाचे रुखावर आम्हीं आहोंत. परंतु इंगरेजांची जमीयत भारी. सोळा सतरा पलटणें सांप्रत मुकाबिल आहेंत. व च्यार पलटणें ग्वालेरींत व पांच साहा पलटणें कालपीसमीप राहिलीं तेंही येणार. याकरितां पुन्हां दाहा हजार स्वार अम्हास जरूर पाहिजेत. स्वाराचे निगाहदास्ती-करितां येथोन मुतसदी रवाना करितों. मदद खर्चाची कांहीं कुमक तुम्हांकडून जाहलियां यांसमईं बहुत उपयोगी आहे. त्यास येथील कारपरदाजांनीं अबाजी नाईक वानवळे वगैरे सावकारांस पत्रें पाठविलीं आहेंत कीं, माहदाजी सिंदे कर्ज मागतील त्याप्रमाणें देणें. रुपये आम्हीं उगऊन देऊं.

मानाजी फांकडा फरारी होऊन तुळजापूरचे मार्गानें सुरापुराकडें गेला म्हणोन येथें चर्चा आहे. भांबूराव लढाईंत प्रतिनिधीचे सरदारानी दस्तगीर केला. त्यास वासुदेवबावा प्रतिनिधीचे मुतालिक कारभारी यांचा पुतन्या भांबूराव, याकरितां वासुदेवबावानीं पंढरपुरींच म।।रनुलेस ठेविलें आहे. घोडीं वगैरे लूट सांपडली. त्यापैकीं निमे हिसा पंतप्रधानास द्यावा म्हणोन येथील कारपरदाजानीं वासुदेवबावास तकाजा लाविला आहे. अमलात येईल त्या

प्र।। सेवेसी सूचना होईल. गणेशपंत बहिरे यांचे समागमेचें लोकास तीन वर्षेपर्यंत सालझाडा पावला नांही. याकरितां लोक बेदिल. यास्तव म।।रनुलेनी पय दरपय कारभाऱ्यांस पत्रें पाठविली कीं येकदां पुण्यास येऊन स्वारांची समजावीस करून पुन्हां आज्ञेप्रमाणें मोहिमेस जाऊं. त्यावरून दुर्गोजी भापकरास पंधरा हजार रुपये खर्चास देवऊन कोंडाईबारीस छावणीस ठेविलें व गणेशपंतास पुण्यास येण्याविषईं आज्ञापत्र लिहून पाठविलें. त्या प्र।। गणेशपंत पुण्यास येणार. पुण्यात जुना कसब्याचे दरवाज्यासमीप कांही द्रव्य सांपडले म्हणून सुभानशाह मस्तान आहेत. त्यानीं सांगितलें त्यावरून पंतप्रधानांचे कारपरदांजानीं खाणती लाविली आहे. दाहा हातपर्यंत खाणलें. येक देवालय लागलें आहे. तीन तोफेचे गोळे निघाले. याउपरि जें प्रत्यक्ष वर्तमान होईल तें सेवेसी श्रुत होईल.

———

**A. R. No. 62.**

१८ रजब ११९५ हिजरी
१० जुलै १७८१

छ ३ माहे शाबान संन ११९५ हिजरी रोज बुधवार दोन प्रहरा

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. येथील कुशल त।। छ १८ माहे रजब मु।। पुणे स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानद लेखन आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष. येथील वर्तमान छ म।।री प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले. ते पावोन सविस्तर वर्तमान शृत होईल. या नतर येथील वर्तमान हैदर नायेकाचे वकीलाचे येथे पत्रे आली. वर्तमान होते की; हैदर नाईक यासी व इग्रजासी त्रिर्चनापलीजवल लडाई जाली. हैदर नायेकानी इग्रजाची दोनतीन पलटने गारद केली. व हजार बारासे मणुश व

सेपनास गोरे धरून आनिले. इग्रज लडाईत सिकस्त होऊन माघारा पाचसात कोस गेले. यैसे पत्र नाईक मजकुराचे वक़ीलास आलें. वकीलानी बजिनस पत्र येथे कारभाऱ्यास दाखविले. इग्रज सिकस्त जाले व दोन तीन पलटना बुडविल्या व मणुशे वगैरे गोरे धरले, यैसे लिहिले होते. त्याजवरून कारभारी बहुत संतोश जाले. दोन घटका हैदर नाईकाचे मरदानगीची तारीफ करीत होते. लडाईची बातनी जासूदाने आनिली म्हणौन त्यास दाहा रुपये नगद व दोन दोन वस्त्रे इनाम दिल्हा. नाईक म॥र यास यानी पत्रे पाठविले की, इग्रजाचे पारपत्य येथास्थितच करावें. कदाचित त्यानी सलूकाचा पैगाम पाठविला तर हरगिज न यैकावे. यैसे पत्रे लिहिली. शृत होये. ज्याफर:दौला बहादुर मरहूम याचे पुत्राची सरकारातून सरफराजी जाली म्हणौन येथून श्रीमताची व कारभाऱ्याची वस्त्रे त्यास निर्मले(स) जाणार. येका दो दिवसा वस्त्रे रवाना होनार. शृत होये. कल्यानीस व ममईस इग्रजाचा सरजाम जंगी मातबर तयार होतो. भाद्रपद मासीच ते इकडे उद्योग करणार, यैसे वर्तमान आहे. त्याजवरून कारभारीही श्रावनमासी डेरे वगैरे बाहेर करनार यैसी वदंता आहे. शृत होये. हपशानी तल्याघोसल्याकडे कोकन प्राती उपद्रव माडला आहे. तल्याचे किल्याजवल बिरवाडी होती ते हपशानी घेतली. पुढे तल्याचे किल्यास उपद्रव करनार यैसे वर्तमान आहे. त्याचे पारपत्यास गारदी वगैरे पाठविले आहेत ते अद्याप बोरघाटावरच आहेत. पुढे ते तल्याचे किल्याकडे हपशाचे पारपत्यास जानार. शृत होये. राजश्री नाना व हरीपंत व कृष्णराव वगैरे याचा खलवत होत असतो. खिलवताचा भाव हाच की, पुढे इग्रजाचे पारपत्याविशई व पुढे आपले दौलतीचे बदोबस्ताविशई होत असतो. व येज्यमानसाहेबाकडेही रावजीचे विद्यमाने अर्ज्या वगैरे पाठवीत असतात. याअर्थी खिलवत होत असतो. शृत हाये. हे सविस्तर वर्तमान छ म॥री प्राथःकाली डाकेसमागमे विनंतीपत्र सेवेसी रवाना केले आहे त्याजवरून ध्यानास येईल. येथील प्रसगाचे वर्तमान वरचेवर डाकेसमागमे सेवेसी व हजुरात रवाना होते त्याजवरून

ध्यानात येत असेल. विदित होये. छ २९ माहे जमादिलाखरचे आज्ञापत्र पाठविले ते छ १३ माहे म॥री सेवकास पावले. त्याचे उतर डाकेसमागमे विनंतीपत्र पाठविले आहे. त्यात अक्षरशा लिहिलें आहे. त्याजवरून ध्यानास येईल. सदैव आज्ञापत्री परामृश होत असावा. बहुत काये लिहिणे कृपा लोभ कीजे, हे विज्ञाप्ति.

---

**A. R. No. 63.**

१८ रजब ११९५ हिजरी
१० जुलै १७८१

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. येथील कुशल त॥ छ १८ माहे रजब मु॥ क॥ पुणे स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानद लेखन आज्ञा करीत असिलें प॥. विशेष येथील वर्तमान छ १३ माहे म॥र रोज शुकरवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाके-समागमे सेवेसी रवाना केले ते दारोग्ये हरकारे याचे विद्यमाने पावोन सविस्तर बर्तमान शृत जाले असेल. तदनंतर यथील वर्तमान. हैदर नायेकाकडील वर्तमान, हैदर नाईक त्रिचनापलीजवल फौजेसहवर्तमान होते. इग्रजाचे पलटने तेंथे होती. नाईक म॥र यासी व त्या पलटनासी लडाई जाली. दोन पलटने नाईक म॥र यानी गारद केली व हजार बारासे मणुश धरले, सेपनास गोरे धरले, बाकी पलटने सिकस्त होऊन माघारा गेले, दोनतीन पलटने गारद केली. या प्रमाणे वर्तमान नाईक म॥र याचे वकील येथे आहेत त्याचे येथे आले. वकीलानी बजिनस पत्रे कारभाऱ्यास दाखविली. दोन तीन पलटने गारद केली, हा म॥र पत्री होता, त्याजवरून कारभारी बहुत संतोश जालें. जासुदास दहा रुपये व दोन दोन वस्त्रे इनाम दिल्हा. नाईक म॥र याचे मरदानगीची दोन घटका तारीफ होत होती. याप्रमाणे

हैदर नायेकाकडील लडाईचे वर्तमान आले. पुढे नाईक म॥र इग्र-जावर गालिब आहेत, यैसे वर्तमान आहे. शृत होये. पूर्वी वर्तमान होते की इग्रजानी हैदर नाइकासी सलूकाचा पैगाम लावला आहे यैसी वदता होती. वर्तमान आहे की नाईक म॥र सलूकाचा जाबसाल इग्रजाचा यैकत नाही. प्रस्तुत नाईक म॥र यानी इग्रजाची दोन तीन पलटने बुडविली. पुढे पारपत्य येथास्थित करावे हाच नाईक म॥र याचा निश्चयें आहे, यैसे वर्तमान आहे. नाईक म॥र याजवल फौजेचा भरना मातबर आहे. चालीस पनास हजार स्वार व साठ सतर हजार गारदी वगैरे प्यादे, सिवाये तिकडील सवस्थानिकाचे प्यादे पचवीस तीस हजार व दोनसे तोफा, याप्रमाणे ज्यमाव आहे यैसे वर्तमान आहे. प्रस्तुत हैदर नायेकाचे लडाईचे वर्तमान आले. इग्रजाची दोन तीन पलटने गारद करून सिकस्त केले यैसे वर्तमान आले आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. दरबार वगैरें जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. विदित होये. छ १४ रोज शनवार ज्यफरःदौला बाहादुर याचे पुत्राची हजुरातून सर्फराजी झाली म्हणोन त्यास येथून श्रीमताची वस्त्रे व येक रकम ज्यवाहेर व नानाची व हरीपताची व कृष्णरावजीची व भवानी सिवराम याची वस्त्रे त्यास निरमलेस जातात. येका दो दिवसा त्याजकडे वस्त्रे वगैरे रवाना होनार. शृत होये. कल्यानीस व ममईस इग्रज सरजाम करितात. करनेल गाडर ममईस राहातो व कल्यानीसही येतो. सरजाम वगैरे तयार करून श्रावन गेलिया-नतर सत्वरच इकडे उद्वोग करनार यैसे वर्तमान आहे. शृत होये. राजश्री नाना व हरीपंत वगैरे याचा नित्य खलवत होत असतो. खलवतीचा भाव हाच यैकिल्यात येतो की पुढे फौज वगैरे सत्वर दसऱ्याचे हगामास जमा करून इग्रजाचे पारपत्य करावे या अर्थी खिलवत होत असतो. शृत होये. होलकर वाफगावी आहेत. फौजेस नरोप प्रस्तुत दिल्हा आहे. दसऱ्याचे हगामास होलकराचीही फौज जमा होनार. शृत होये. तिसरे प्रहरी कृष्णरावजी नानाचे घरास गेले होते. नाना व हरीपंत व रावजी या त्रिवर्गाचा खिलवत जाला.

भाव यैकिल्यात आला की हैदर नायेकाकडे पत्रे लिहिणार व येज्यमान-साहेबासही अर्जी वगैरे पत्रे लिहिणार. दुसरे कितीक आपले दौलतीचे बदोबस्ताविशई खलवत जाला. शृत होये. छ १५ रोज रविवार हपशानी कोकन प्राती तल्याघोसाल्याकडे उपद्रव माडला आहे. तल्याघोसाल्याकडे बिरवाडी येक लाहानसे स्थल आहे ते हपशाने घेतले. तल्याघोसाल्यासही उपद्रव करणार. हपशाचे पारपत्यास येथून गारदी वगैरे रवाना केले ते अद्याप बोरघाटावरच आहेत. पुढे ते गारदी घाट उतरून तल्याघोसाल्याचे किल्याकडे जाणार, शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. शृत होये. भोसल्याची पत्रे नागपुराहून आली. वर्तमान यैकिले की पत्रे श्रीमतास व कारभाऱ्यास बहुत ममतापूर्वक लिहिली होती. पुढे दसरा जालियानतर भोसलेही इग्रजाकडे स्वारीचा उद्योग करणार यैसे वर्तमान आहें. शृत होये. भोसल्यानी निर्मलेस बाहादर मरहूम याचे पुत्रास सर्फराजी जाल्याची वस्त्रे पाठविली, यैसे वर्तमान आहे. शृत होये. छ १६ रोज सोमवार सिद्यासी व इग्रजासी लडाई आहे. सिद्याजवल तीस चालीस हजार फौज आहे. इग्रजाजवल चवदा पधरा पलटने आहेत. लडाई होत असती. इग्रज मुस्तौद आहेत यैसे वर्तमान आहे. शृत होये. हैदर नायेकानी दोनतीन पलटने दुडविली व लडाई मातबर जाली. इग्रज सिकस्त केले म्हणौन कारभाऱ्यानी बहुत ममतापूर्वक नाईक म॥रास पत्रें लिहिली व याचे वकील तेथे आहेत त्यास पत्रे लिहिली. पत्रे कासद जोडीसमागमे नाईक म॥र याचे लश्करात रवाना केली. नाईक म॥र यास कार॰ भाऱ्यानी लिहिले आहे की इग्रजानी कदाचित सलूकाचा पैगाम पाठविला तर न यैकावे, त्याचे पारपत्यच करावे, यैसे लिहिले आहे म्हणौन यैकिले. शृत होये. राजश्री हरीपतास येक दोन दिवस ज्वर येत होता, आता आराम आहे. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. शृत होयें. छ १७ रोज मगलवार श्रीमत वाडयात घोडी वगैरे फिरवीत असतात व तीरदाजी वगैरे करितात. शृत होये. इग्रज कल्यानी वगैरेस सरजाम जंगी करितात. पुढे उद्योग

सत्वरच करनार याअर्थी कारभारीही श्रावन मासी डेरे, बाहेर करनार, अन उद्योगही डेरे वगैरे जालिया लवकरच करतील, येसाही विच्यार करितात. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. शृत होये. छ २९ माहे जमादिलाखरचे आज्ञापत्र राजश्री हैबतराव याचे तैनाती जोडीसमागमे सादर केले ते छ १३ माहे मा।री सेवकास पावले. पावोन बहुत संतोश जाला. सेवकाचे जागीरीस याजकडील सुभ्याकडील उपद्रव होऊन सुभेपटी व दहकपटी वगैरे यैवज घेतला. येविशई विनंती लिहिली होती की येथील कारभाऱ्यास इनायेतनामे पाठवावे की सुभ्याकडून यैवज माघारे देवावा. पुढे सुभे व कमाविसदार वगैरे उपद्रव न करीत व कोन्ही सरदार येतात जातात ते उपद्रव घासदान्या वगैरेचा न करीत या अनवये इनायेतनामे सादर जाले पाहिजेत. आज्ञापत्री उतर सादर जाले की लिहिल्याअनवये इनायेतनामे सादर करून पाठऊ. त्याजवरून संतोश जाला. सर्वस्वे माझी गनना चिरजीवात आहे, सर्व माझी लज्या स्वामीस आहे. विनंती लिहिल्याप्रमाणे इनायेतनामे सादर करनार स्वामी समर्थ. मौजे भालगाव प्र।। राताजन येथील पाटलाचे नावे कौल व रफअत:दौला बहादुर याचे नावे इनायेतनामा सादर करून रा।। कोनेर बाबूराव याचे स्वाधीन केला. ते तुम्हाकडे पाठवितील म्हणोन आज्ञापत्री सादर केले, त्याजवरून संतोश जाला. आज्ञापिले गाव कोन्हाकडून आहे, त्यास सरकारातून आमचे आतेचे चिरजीव माहापुरुश आहेत, त्याचे नावे आहे. त्याचे देवस्थानाचा वगैरे सर्व खर्च माहाराजाकडूनच चालतो. सर्व पुन्यप्रताप स्वामीचा आहे. त्याचे नावे मात्र करून घेतले आहे. परतु सर्व देवाचा वगैरे खर्च स्वामीसच चालवावा लागतो यैसे आहे. येविशई इनायेतनामा व कौल सादर करून दिल्हा, हे सर्व पुन्यायेश स्वामीस आहे. तेथील पाटलाने मारा केला व खूल केले. त्याचे पारपत्यास येथून पागा गेली होती. खूल त्या प्राताताच जाले होते. त्यासह पाटीलही मिलाला होता. फौज गेली होती त्यानी गाव

मारूनताराज केला. गाव खाणून टाकला यैसी त्या गावची अवस्ता जाली. या अर्थी कौल वगैरे इनायेतनामा मागविला होता. विदित होये. सदैव आज्ञापत्रे सादर होत असावी. बहुत काय लिहिणे. कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

———

**A. R. No. 64.**

१९ रजब ११९५ हिजरी
११ जुलै १७८१

पै।। छ ३ माहे शाबान संन ११९५ हिजरी रोज बुधवार दोन प्रहरा जोडीबरोबर.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टांग नमस्कार, विनंती उपरि. येथील वर्तमान त।। छ १९ रजब, आषाढ वद्य सप्तमी गुरुवासरपर्यंत, मो।। पुणें स्वामीचे कृपेकरून, क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष छ १७ माहे म।।रीं डांकेवर हुजूर अर्जी व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें. तें पाऊन राजकी वर्तमान व राजश्री कृष्टणरावजीचे बोलण्याचा खुलासा सर्व ध्यानास आला असेल. हुजूरचे अर्जीत व मकारनामकास संक्षेप रीतीनें मुख्तसर म।।र लिहिला आहे. याकरितां स्वामीचे सेवेसी जे विनती लिहिली तो म।।र हुजूर अर्ज करावया योग्य व करावा म्हणून पत्रीं विनती लिहिली होती. अर्ज करण मुनासिब असल्यापक्षी केला असेल. सारांश चिरंजीव राजश्री रघोतमराव यांचे मुखोदगत कृष्टणरावजीनीं जो म।।र हुजूर अर्ज करावयाचा सांगितला व चिरंजीवानीं स्वामीचे विचारें हुजूर रावजीचे विनतीचा भाव अर्ज केला असेल. त्यांत कांहीं बाकी मरातिब राहिला नांहीं. छ १७ रजबीं डांकेवर जें पत्र व अर्जी मी पाठविली यांत कांहीं गुंता ठेऊन लिहिलें नांहीं. यांत जे सलाह दौलत असेल ते

तदबीर हुजूरीहून होईल. सांप्रत पंतप्रधानांचे राजद्वारी वकील मुतलक व मुख्तार बज्याय श्रीमंत राजश्री बालाजी जनार्दन फडनीस व यांचे किळदकार किंवा गुरू हरी बलाळ, उभयतां वितरिक्त तिसरा कोण्हीं नांहीं. फडनसीचें कामाची नियाबत लक्ष्मणपंत देशमुख करितात. व मुलकी व फौजेचे कामाचे बानीकार हरीपंत, यांचे हस्तक विसाजी अपाजी अठवलें व बाजी गोविंद सलाह मसलत मुलकी कामाची जे होणें ते कृटष्णराव बलाळ यांचे इतिल्यावितरिक्त व यांस जे पसंद पडेल ते मंजूर, व बहुत करून मुलकी कामाची तजवीज राव म॥राचे सांगितल्याप्रमाणें होत आहे. अखबारेपैकीं विशेष वर्तमान, येथील स्नेहिताचे मुखें यैकिलें कीं, हैदरअलीखानानीं आपले वकीलास स्पष्ट लिहिलें आहे. व वकीलानीं तेंच पत्र बजिनस येथील कारपरदाजास दाखविलें, त्यांत म॥र लिहिला आहे कीं, देशची फौज दाहा पंधरा हजारपर्यंत आपल्यास नोकर ठेवणें आहे, त्यांस नालबंदी देऊन रजावंदीनें दरमाहे वगैरे मोकर करून फौज जमा करून घेऊन येण्याकरितां येथोन मुतसदी व मातबर सरदारास पुणे प्रांती रवाना करितों. स्वारांची बोली करून नालबंदी मुतसदी देईल. परंतु कोण्हीं बदमामली केलियां व चाकरीस न येईल त्यास सिक्षा करून रुपये गुन्हेगारीसहित माघारा देववावे. किवा त्यापासी जामीन घेऊन चाकरीस पाठऊन द्यावयाचा बंदोबस्त पंतप्रधानांचे कारपरदाजानीं करावा. व सदर कौल पंतप्रधानांचे मोहरेनसीं लिहून द्यावा कीं, पंतप्रधानासी व हैदरअलीखानासीं अकृत्रिम स्नेह आहे. खुषरजावंदीनें ज्याचे चितास येईल त्यानें चाकरीस जांवें. ये विषईचा म॥र व बजिनस पत्र वकीलानें कारपरदाजांस दाखविलें. याचें उतर काय द्यावें याची तजवीजींत कारभारी आहेत. नौकरीस जाणें म्हणोन सिपाह लोकांस परवानगी

२

पुरवणी पत्र श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी

दिधलियां खान म॥रासमीप रुपये देण्यास कांही गुंता नांहीं.

लोक रुपयाचे लालुचीनें समग्र उठोन जातील. कौल लिहून द्यावा तरी खान म॥रनुलेचे चितांत संशय उत्पन्न होईल. याकरितां प्रत्योतर सांगावयाचा सिधांत अद्यापि जाहला नांहीं. खारिज यैकिल्याप्रमाणें हुजूर व स्वामीचे सवसी विनती लिहिली आहे. बहुत काय लिहिणें. चिरंजीव राजश्री रघोतमराव समग्र श्रावणमास सेवेसी राहतील. उपरांतिक चिरंजीवास सत्वर आज्ञा देऊन मार्गस्त करावें. येथील बातनीचे कामास त्यांजवितरिक्त सेवकास बहुत साहस करणें प्राप्त होतें. हे विनती.

---

छ ३ शाबान संन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

विनतीजे. बिरेवाडीचे बंदोबस्तास व कुमकेस पुण्याहून गाडदी रवाना केले होते. ते घाटाखाले गेलें. हें वर्तमान छ १७ रजबचे अखबारेंत लिहिलें आहे. आनि छ १९ रजबी खारिज वर्तमान यैकिलें कीं, गाडद्यांसी व हबसी यांचे जमियतीसीं तळेंघोंसाळयासमीप लढाई जाहली. पंतप्रधानांकडील गाडद्यांचा मातबर सरदार ठार पडला व गाडद्यांची सिकस्त जाहली व माघारां पांच कोस येऊन राहिले. वर्तमान तहकीक करून डाकेवर अखबारांते लिहिलें जाईल. हे विनतीं.

---

**A. R. No. 65.**

२३ रजब ११९५ हिजरी
१५ जुलै १७८१

पै॥ छ २ साबान सन ११९५ हिजरी बुधवारी अस्तमानी सरकारच्या डाकेबराबर म॥ दारोगे.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टांग नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान ता। छ २४ (किंवा २३) रजब आषाढ वद्य दशमी इंदुवासरपर्यंत मो। पुणें स्वामीचे कृपे करून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ १८ माहे म॥रीं विनती-पत्र डांकेवर पाठविलें. तें दारोग्याचे विद्यमानें पाऊन वर्तमान सेवेसी श्रुत जाहलें असेल. त्या उपरि कृपापत्र हुजूरचे इनायतनामे दोन किते छ १४ माहे म॥रीं चिरंजीव राजश्री रघोतमराव यांचे लिफा-फियासहित रवाना केलें. तें छ २१ रजबीं पाऊन सविस्तारे वर्तमान कळलें व संतोष जाहला. येशवंतराव नाईक व मानाजी फांकडे मुतफिक होणार. व परशरामपंतभाऊचे विद्यमानें फांकडा व नाईकाची सफाई जाहली. व येकत्र होऊन हंगामा करणार हें सत्य वर्तमान. त्यांस वासुदेवबावा गमाजीबावाचे भाऊ, प्रतिनिधीचें कदीम मुतालिक, व सांप्रत पुण्यांत बाळाजीपंतासमीप प्रतिनिधी-कडून मुख्तारीनें वासुदेवबावा आहेत. यांचा पुतन्या भांबूराव त्यासीं व वासुदेवबावासीं द्वेष. व प्रतिनिधीचे जागिरींत कितेक गांव भांबूराव यानें मारले, व कितेक गांवापासून खंडणी रुपये घेतले. याकरितां वासुदेवबावानीं त्याचे पारपत्यास्तव फौज पाठविली होती. येशवंतराव नाईक व बाजीराव बरवे व सटवाजी भोंसले वगैरे समग्र येकत्र होणार. यापूर्वी प्रतिनिधीची फौज गेली व लढाईंत भांबूराव यास धरले व मानाजी सिद्या पळाला. याकरितां येशवंतराव नाईक वगैरेचा मनसुबा सेवटास गेला नांही. परंतु नाईक म॥र दहींगांवांत आहे. याकरितां हुजूरचा इनायतनामा रा॥ कृष्टणराव-जीस देऊन रावजीचे विचारें बालाजीपंतनानास मींच नेऊन दिधला. चिरजीव रघोतमराव हुजूर पावले. व तुम्हीं सांगितला म॥र हुजूर अर्ज केला. व हुजूरीहून पंतप्रधानावर कृपा चितापासून व इंगरेजांची तंबी मंजूर. परंतु कितेक कामें तुम्हाकडून हुजूरची होणें, तें होत नांहींत. याकरितां मर्जी मुबारक नाखूष. हुजूरची

कामें कोणतीं व तुमचा खुलासा काय, याची दरयाफ्त व्हावयाकरितां कांही येक तजवीज ठराऊन त्याची इतिला तुम्हास होणार. याप्रमाणे सांगोन येशवंतराव नाईक व मानाजी सिंद्याची तंबी तुम्हीं करावी. ये विषईं इनायतनामा सादर जाहला आहे. याप्रमाणें सांगोन इनायतनामा दिधला. बालाजीपंत नानानीं उतर केलें कीं, येशवंतराव नायकास पूर्वीं ताकीद प्रखर केली आहे, पुन्हा करितों. व मानाजी लढाईंत पळोन गेला, व भांबूराव दस्तगीर केला. बाजीराव बरवे वगैरे येणार होते, ते मानाजीचे सिकस्त जाहल्याचें वर्तमान यैकोन सुरतेकडें गेले. आम्ही सर्व प्रकारें स्थापित व फिदवी हुजूरचे आहोंत. व जो इरशाद जाहला त्या कामावर कमरबस्ता सरगरम व लाखों रुपयाचे पेंचात आलो. हजरतेचे इनायतीनें व मदतीनें इंगरेजांस अजीज आणनें अगाध नांहीं. याप्रमाणें बोलिले. समयोचित श्रीमंत पंतप्रधानांचे कामास, राजश्री राजे दियानतरामजी धोंडोपंत व राजे आमानतरामजी नानाजीपंत बहुत उपयोगी व अर्ज-मारूज युक्तीनें करीत आहेत. व सांप्रत दुसरे ग्रहस्त बानीकार. याकरितां उभयतां हुजूरचे इरशादेप्रमाणें आपले कामावर सरगरम. परंतु श्रीमंताकडील लक्ष ठेवितात. याप्रमाणें नानास सांगितलें. त्यावरून उभयतां स्वामीचा स्तव बहुत केला कीं, तें फार प्रमाणिक. सांप्रत कामाचा बखेडा पाहून अलाहिदा (अपूर्ण)

---

श्रीनवास

पै।। छ २ साबान

अखबार पुणें अज इ।। छ १८ रजब लगायत छ २३ माहे म।।र सन ११९५ हिजरी आषाढवध दशमी सोमवार.

पंतप्रधानांचे कारपरदाजानीं बंगाल्यांत फौज पाठवावयाची तजवीज करून, रुपयांची मदद पेंशकसीचे यैवजीं किवा करज द्यावें,

याकरितां हैदरअलीखानास पत्रें लिहून पाठविलीं. व माहदाजी सिंद इंगरेंजांचे मुकाबिल्यास सिपरीकोलारसेसमीप आहे. इंगरेजाकडील जमाव पंधरा सोळा पलटणें सध्या अहेंत व पुन्हां सात आठ येणार. याकरितां सिंदे म॥रानीं येथील कारपरदाजास पत्रें पाठविलीं होतीं कीं, फौजेचे निगाहदास्तेकरितां आपले तरफेचा मुतसदी पुणे प्रांती पाठऊन देतों. रुपयाची कांही मदत करावी. त्यावरून कारपरदाजानीं आबाजी नाईक वानवळे वगैरेस सूचना लिहून पाठविली कीं, बतरी (क)कर्ज दोन च्यार लाख रुपयें सिंद्यास देणें. रुपयाचा निकाल करऊन देऊं. गणेशपंत बहिरे कोडाईबरीपासून निघाले. पुण्यास येणार. करनल गाडर मुंबईस आहे. जंगी सरजामाची तयारी करितो. या वितरिक्त वर्तमानासहित हुजूर व स्वामीचे सेवेसी पत्रें पाठविलीं ते पावलीं असतील. त्यानंतर यैकिले व प्रत्यक्ष जाहलें वर्तमान दफेवार लिहिलें आहे.

बिरेवाडीस हबसियांकडील जमीयत आली होती, तें पांच कोस माघारा जाऊन, काबू पाहून कोण्ही मकान घ्यावें व धामधूम करावी, या तजवीजींत आहेत. व पंतप्रधानाचे तरफेनें गाडदी रवाना जाहले ते घांटाखालें गेले. हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें होतें. सांप्रत छ २० माहे म॥रीं वर्तमान यैकिलें कीं, पंतप्रधानाकडील गाड्यांसी व हबसियांसी तळेंघोसाळयाचेसमीप लढाई जाहली. दुतर्फा लोक ठार व जखमी जाहले. त्याउपरि गाडदी वगैरे पंतप्रधानाकडील तळेघोंसाळयाचे गडचे आश्रयास येऊन राहिले व हबसी माघारा आपले मकानास गेले. टिकाराम नामे जमादार मातबर गाड्याचा ठार जाहला. गाडदी माघारा हटले म्हणोन जनवेदंता. दरबारी यैकिलें कीं गोळा गोली परस्परें होऊन हबसी माघारा गेले व गाडदी मजबूतीनें तळयाचे किल्यासमीप आहेत.

जुनें पुण्यांत खजाना आहें म्हणोन कोण्ही मस्तानानें किंवा इतरानें सांगितलें त्यावरून खाणती लाविली. व देंवळाचा पाया

लागला. हें वर्तमान पूर्वी लिहिलें होतें. त्यानंतर खाणतींत तळघराप्रमाणें संगी भोयारें लागलें. त्यांतील माती काढली. आंत कांही निघालें नांहीं. दगड ढासळून पडूं लागले. व सेवटपर्यंत शोधं घेतला. कांही नफा व लाभ नांहीं. याकरितां चौकी उठविली व शोध घेण्याचा उद्योग मवकूफ केला.

गणेशपंत बहिरें खानदेशांत गिरना नदीपर्यंत आले. पागा जमा दोनतीनसे स्वार पुढे रवाना केले. ते पुण्यास आले. गणेशपंत सत्वरच येणार.

माहदाजी सिंदे इंगरेजांचे मुकाबिल लढाईस सिपरीकोलारसासमीप आहेत. उमरावगिरी वगैरे गोसावी आठ हजार प्यादे व स्वार सिंद्यासमीप नौकर राहिले आहेत. ते इंगरेजासीं बहुत मजबूतीने लढत आहेत, म्हणोन बालाजीपंत आपले मुखं सागतात. देशची फौज नवी निगाहदास्त करविली आहे. पांचसात हजार स्वार सिंद्याकडें जातील. हेही पंत म॥रनुलेचे जुबानीं यैकिलें. खंडोजी भोसलें संबलपुरासमीप मोहसरा करून आहेत. ते जागा हस्तगत जाहल्यानंतर, तेथील बंदोबस्त करून नागपुरास येणार म्हणोन भोंसल्याकडील वकीलाचे जुबानीं यैकिलें.

मानाजी फांकडे व भांबूराव दोघांस प्रतिनिधीकडील फौजेंनें लुटल्यानंतर भांबूराव दस्तगीर जाहला व मानाजी पळोन गेला. हें वर्तमान पूर्वी लिहिलें आहे. येशवंतराव नाईकाचा बानीकार भांबूराव होता, तो दस्तगीर जाहला. याकरितां नाईक म॥र दंहीगांवी दम खाऊन बसला आहे. बाजीराव बरवे व सटवाजी भोंसले यानीं मानाजी व भांबूराव यांचें सिकस्तीचें वर्तमान यैकोन, मुलाजिम जमा करून, सुरतेस रघुनाथराव याजकडें गेले म्हणोन बालाजीपंताचे मुखं यैकिलें.

---

पै।। छ २ साबान

श्रीनिवास

पु।। अखबार पुणें. छ २३ रजब सन ११९५ हिजरी. हैदरअली-खानाने त्रिचनापलीस जाऊन इंगरेजासी लढाई केली, व कितेक इंगरेज लढाईंत मेले, व कितेक खंदकांत पडले. व येकदोन मातबर सरदारा-सहित दोनतीनसे लोक दस्तगीर केले. हे वर्तमान पूर्वील अखबारेत लिहिल होतें. त्याउपरि छ २२ रजबी हैदरअलीखानाची पत्रें बाळाजीपंत व रास्त्यांस आली, ते नूर म।। खान व नरसिंग वकील बाळाजीपंतासमीप घेऊन आले. दोन घटका बसले होते. पत्रें देऊन खान मजकुराकडील वर्तमान सांगून रुखसत होऊन गेले. त्या उपरि हुजूरचा इनायतनामा येशवंतराव नाईकाचे तंबीकरिता आला होता. तो सेवकांनें बाळाजीपंतास द्यावयाकरिता दरबारास गेलो. पंत म।।रनिलेची भेट घेऊन हुजूरचा इनायतनामा दिल्हा व उतर प्रत्योतर जाहले. ते वर्तमान पृथकपत्री लिहिलें आहे. हैदरअलीखानाने पत्रीं म।।र लिहिला व तो वकीलानी निवेदन केला. तो बाळाजीपंतानी सेवकास सांगितला कीं, त्रिचनापलीची लढाई जाहल्यानंतर खान म।।र जंबुकेश्वरासमीप मुकामात करून राहिला. करनल कूट इंगरेजाचे रुखावर. चिंदबरासमीप मीर रजोअलीखान वगैरे फौज होती. ते, खान म।।रचे सूचनेप्रमाणें, चिंदबरचें देऊळ किल्याप्र।। मजबूत, तेथील बंदोबस्त करून त्रिचनापलीचे तालुकियांत आली. खाली मकान पाहून करनल कूटनें आपले जमीयतीसुधा तयार होऊन चिदंबरास आला व देवळावर हला केली. देवळाहून हैदरअली खानाचे लोकानीं व खालून इंगरेजाकडील लोकानी दुतर्फा तोफा व बदुखाची सिलक होत होती. इगरेंजानीं बहुत अंगेज व निकड करून बातेरी व येक दरवाजा देवळाचा घेतला, व तेथून दोन तोफा देवळास लागू केल्या. त्यास हैदरअलीखानाकडील लोक देवळांत होते. ते समग्र येकत्र होऊन शत्रूस मारावें किंवा आपण मरावें, हा निश्चय करून दरवाजा उघडोन बाहेर आलें. व बंदुखाची सिलक करीत इंगरेजानी

तोफा लागू केल्या होत्या, व जमाव जमून मोरचे लावावयाचें तजविजीत होते, त्याजवर चालून आले. दुतर्फा फार निकडीची लढाई जाहली. इंगरेजाकडील लोक फार मारले गेले. व बाकीचे बेइस्तकलाल होऊन तोफा टाकून, मोरचा सोडून माघारा हटून गेले. हैदरअलीखानाचे लोकानीं तोफा त्याच स्थली ठेऊन, इंगरेजावर लागू केल्या, व मजबूतीने देवळाची बंदोबस्ती करून राहिले. हें वर्तमान दुसरे दिवसी हैदरअलीखानास कळलें. तेंच समई जंबुकेश्वरापासून बमयफौज कूच करून चिदंबराचे रुखे रवाना जाहला. खान म॥र आल्याचें वर्तमान इंगरेजास कळतांच, चिदंबरापासून कूच केले. प्रहर साहा घटकाचे फुरसतीने हैदरअलीखान फौजेसहित चिदंबरास आला. इंगरेज कूच करून माघारा गेले हे वर्तमान यैकोन ताकुब केला. इंगरेज महमदमही बंदराचे पनाहास जाऊन राहिले. हैदरअलीखान तीन कोसाचे फासल्याने माहासरा करून मुस्तैदजंग आहे. याप्रमाणे आपले पत्री मजकूर लिहिला. व वर्तमान वकीलानी सांगितलें म्हणोन बाळाजीपंतानी आपले मुखें सेवकास सांगितलें. त्याप्रमाणे हुजूर व स्वामीचे सेवेसी लिहिले आहे, हें विनती.

---

**A. R. No. 66.** २४ रजब ११९५ हिजरी

१६ जुलै १७८१

पै॥ छ २ साबान सन ११९५ हिजरी बुधवारी अस्तमानी सरकारच्या डाकेबराबर म॥ दारोग्याच्या.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. येथील कुशल त॥ छ २४ माहे रजब मु॥ क॥ पुणें, स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानद लेखन आज्ञा करीत असिले प॥. विशेष येथील वर्तमान

छ १८ माहे म।।र रोज बुधवारी प्राथःकाली, सरकारचें डाकेंसमागमे, दुसरे दो प्रहरा राजश्री हैबतराव याचे तैनाती जोडीसमागमे, अर्जीसहित, यैसे दोन विनंतीपत्रे सेवेसी रवाना केली. ते पावोन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनतर येथील वर्तमान राजश्री भगवतराव निबालकर येथे से पनास स्वारानसी आले आहे. कारन की याचे पदरी राहून चाकरी करावी अथवा कृष्णरावजीचे विद्यमाने येज्यमानसाहेबाकडून जागीरचा बदोबस्त करून घ्यावा, या अर्थी येथें आले. भेटी वगैर सर्व जाल्या. हे वर्तमान पहिले पाचच्यार विनंतीपत्री तपसीलवार लेखन केले होते, त्याजवरून ध्यानास आलें असेल. निबालकर म।। येथे तो मोठी उमेद धरून आले. प्रस्तुत त्याची खर्चाची बहुत विपत्य. याचे सरकारचे लोकास रोजमुरें वगैर मिलत नाहीत. मग याचे खर्चाची सोये कसी पडते. असो. निबालकर म।।र याचे कारकून रावजीचे घरी येतात की आमचे खर्चाची सोये करून द्यावी. त्याजवरून रावजीनी उतर केले की प्रस्तुत हजार रुपये दरमाहा देत जाऊ, मग पुढे काय करणें ते करू. त्याजवरून निबालकार म।।र याचे वकील रदबदली करीत होतें की, हजार रुपये दरमाहां कैसा पुरल. मागती रावजीनी उतर केले की या वेगलें काही अधित होत नाही यैसे आहे. मग पुढे ये विशईचे जे वर्तमान ध्यानास येईल ते लेखन केले जाईल, शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. उपरातिक नाना व बाजीपंत व कृष्णरावजी वगैर याचा खिलवत जाला, शृत होये. १९ माहे म।।र रोज गुरुवार हैदर नायकासीं व इग्रजांसी चिरचनापलीस लडाई जाली. नाईक म।।र यानी इग्रजाची दोन तीन पलटने गारद केंली. हजार पाचसे मणुश धरून आनिले. हे वर्तमान येथें आलियावर कारभारी बहुत संतोश जाले. नाईक म।।रास पत्रें लिहिली की त्याचे पारपत्यच करावें. कदाचित त्यानी सलूकाचा डौल लावला तर हरगीज न यैकावें. हे वर्तमान पूर्वीचे विनंतीपत्री अक्षरशाह लेखन केले होते, त्याजवरून ध्यानास आले असेल. नाईक म।।र यानी इग्रजाची दोन तीन पलटने दुडविली म्हणौन कारभारी

बहुतच संतोश आहेत. मागतीही नाईक म।।र यास पत्रे पाठविली की, इग्रजाचे पारपत्यच करावे. कदाचित त्यानी सामदामाचा डौल लावला तर हरगिज न यैकावे यैसी पत्रे लिहून पाठविली, शृत होये. हपशानी तल्याघोसल्याकडें कोकनप्राती उपद्रव माडला आहे. त्याचे पारपत्यास येथून दोन हजार गारदी पाठविले आहेंत. त्यास व हपशासी लढाई जाली. उभयेपक्षी से दोनसे मणुश जाया जाले. इकडील येक जमादार होता तो ठार जाला, यैसे वर्तमान आले. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल, शृत होये. नित्य नाना व हरीपंत वगैर याचा खिलवत होत असतो. भाव यैकिल्यात येतो की, पुढें इग्रजाची मसलत प्राप्त आहे, त्याचे पारपत्य करावे. त्यास श्रावन मासी डेरे वगैर बाहेर करून दसऱ्याचे हगामास फौज वगैरे जमा करून इग्रजाचे पारपत्याचा उद्वोग करावा. दुसरे कितिक आपले दौलतीचे बदोबस्ताविशई नित्य खलवत होत असतो. शृत होयें. छ २० माहे म।।र रोज शुकरवार इग्रज कल्यानीस व ममईस जगी वगैरे सरजामा करितात. पुढे ते सत्वरच इकडे उद्वोग करणार यैसे वर्तमान आहे, शृत होये. राजश्री गनेशपंत बेहेरे कोडाईबरीकडें होते. त्यास कोडाईबरीकडे दुर्गोजी भापकर यास हजार दोन हजार फौजेनसी ठेऊन गनेशपंत पुन्यास येतात. हे वर्तमान पूर्वी लेखन केले होतेच. त्यास गनेशपंत खानदेंशाहून कासारबारी चहडून वरते आले. पुन्यास येतात. सत्वरच येऊन दाखल होनार. गनेशपतानी माहलोमाहाल खानदेशात बहुत उपद्रव करून खडन्या घेतल्या. फारच उपद्रव केला. सरकारचे माहाल चालीसगाव व देहार या उभयता माहालापासून खडनी घेतली, शृत होये. दरबार वगैर जाला होता, शृत होयें. छ २१ रोज शनवार राजश्री जिवाजीपताकडील पत्रे आली होती. पत्रे घेऊन कृष्णरावजी दरबारास गेले होते. पत्रें नानानी वाचली. उपरातिक नाना व कृष्णरावजी वगैरे याचा खिलवत जाला. भाव यैकिल्यात आला की, येज्यमानसाहेबास पत्रें व अर्ज्या लिहिनार, शृत होये. राजश्री भादूराव प्रतिनिधी व मानाजी फाकडे यानी खूल

केले होते. भवानराव प्रतिनिधी याची फौज जाऊन त्याचे पारपत्य जाले. भादूराव धरला. मानाजी फाकडा पळून गेला. हे वर्तमान पूर्वी लेखन केले होत त्याजवरून शृत जाले असेल. राजश्री भादूराव धरला आहे, त्यास येथे पुन्यास घेऊन येणार. मानाजी फाकडा सुरापुराकडे गेला. मागती तो व सटोजी भोसले खूल करून म्हसवडा-कडे येणार यैसे वर्तमान आहे, शृत होये. राजश्री हरीपतास येक दोन दिवस जाले ज्वर येत होता. आता आराम आहे, शृत होये. पुन्यात जुन्या कोटात लाहानसे टेकूड मातीचे होतें. कारभाऱ्यास कोन्ही सांगितले की येथे माल आहे. त्याजवरून त्या मातीचे टेकडावर चौकी बसऊन खनावयास लावले. पुरुश दो परसे खणले. सेवटी तेथे काही सापडले नाही. उगेच कोन्ही बहकाऊन सागितले म्हणून खणले. सेवटी काही सापडलें नाही, शृत होय. छ २२ रोज रविवार राजश्री कृष्णराव दरबारास गेले होते. रावजीसी व नानासी वगैर खिलवत जाला. भाव यैकिल्यात आला की, आनिक हैदर नायेकाकडें काही पत्रे वगैर लिहिणार. काये मजकुराची पत्रे लिहितील हे कळ-ल्यावर लेखन केले जाईल, शृत होये. श्रीमत वाडयात घोडी वगैर फिरवीत असतात व तीरदाजी वगैरे करीत असतात, शृत होये. सध्याकाली नाना राजश्री त्रिबकराव दीक्षित याचे घरी गेले होतें. ते मातबर सावकारी करीत असतात. त्याजपासी काही यैवज कर्जाऊ मागनार म्हणौन गेले होते, शृत होये. छ २३ रोज सोमवार मामलतदार वगैर मिलाले आहेत. खानदेशचें दोन तीन माहालची रसद घेऊन माहाल मामलतदारास सागितले. मामलेदाराचे काम ज्यारी आहे. शृत होये. हैदरनाईक याचे वकील दरबारास आले होते. त्यासी व कारभाऱ्यासी खिलवत जाला. भाव यैकिल्यास आला की नाईक म॥र यास पत्रे लिहिणार. शृत होये. दरबार वगैर जाला होता. विदित होये. श्रावन सुद ५ चा धर्म पनास हजार रुपये करावा यैसा निश्चये जाला आहे. यैवज सावकारापासून घेऊन दक्षना पचमीची करनार. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. शृत होये. छ ६ माहे

म॥र व छ १२ माहे म॥र यैसी दोन आज्ञापत्रे व छ १२ माहे जमादिलाखरचा इनायतनामा सादर करून पाठविला. इनायत-नामा ज्यवाबी व आज्ञापत्रे छ १९ माहे म॥री सरकारचे डाकेसमागमे पावले. पाऊन बहुत संतोश जाला. आज्ञापत्री सादर केले की बारीक मोठे वर्तमान शोधून वरचेवर लिहित जाणे, यैसी आज्ञा सरकारची आहे. त्यास आज्ञाप्रमाणे डाकेसमागमे हजूरात अर्ज्या व विनंतीपत्रे तपसीलवार रवाना होतात. शृत होये. छ १४ माहे म॥रचे आज्ञापत्र व छ २६ व छ २७ माहे जमादिलाखरचे दोन इनायेतनामे सादर करून पाठविले ते छ २१ माहे म॥री सरकारचे डाकेसमागमे सेवकास पावले. पावोन बहुत संतोश जाला. सदैव इनायेतनामे व आज्ञापत्रे सादर करनार स्वामी समर्थ आहेत. सर्व उमेद स्वामीचे चरनाची आहे. सेवकाचे जागिरीचे खेड्यास गनेशपंत वगैरे व खानदेशचे सुभेदार यानी उपद्रव देऊन मनमाने तैसा यैवज घेतला. ये विशईचे वर्तमान अहवालाचे छ १८ माहे म॥री डाकेसमागमे व हैबतराव याचे जोडीसमागमे विनंतीपत्र पाठविले आहे त्यात सविस्तर खेडयाचा म॥र लिहिला आहे त्याजवरून ध्यानास येईल. विनंती लिहिल्याप्रमाणे सेवकाचे खेडयाचे बदोबस्ताविशई सरकारचे इनायेतनामे व स्वामीचे पत्रे येथील कारभाऱ्यास व कृष्णरावजीस सादर जाले पाहिजेत. सर्वस्वे माझी लज्या स्वामीस आहे. माझे सर्वस्वे पालिग्रहन करनार स्वामी आहेत. बहुत काये लिहिणे कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 67.** (पो. ता. ) २ शाबान ११९५ हिजरी
२४ जुलै १७८१

पै॥ छ २ शाबान सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

पुरवणी श्रीमंत राजश्री नानास्वामीचें सेवेसी.

आहेत. परंतु, समयोचित हुजूर अर्ज करणें व लक्ष ठेवणें हेंच फार व प्रामाणिकास उपयोगी. चिरजीव राजश्री रघोतमराव यानीं प्रथमतां स्वामीची भेट जाहल्यापासून, हुजूरची मुलाजमत व इतरांच्या भेटी, व श्रीमंत राजश्री राजे भाऊसाहब व स्वामीसहित कृष्टणरावजीचा मनोदय जे होता, व यानी जे मतलब सांगितले ते हुजूर अर्ज केले. व उभयता स्वामीनीं रावजीची फिदवियत व एकनिष्ठता हुजूर याची पुष्टता करून, अर्ज मारूज करून, रावजीचे येण्याविषयी रावजीस व बालाजीपंतास इनायतनामे सादर होणार, हा समग्र कचा म॥र कृष्णरावजीस सांगितला. त्यावरून रावजी बहुत संतोष जाहले. व स्वामीचा श्नेह प्राचीन व पूर्वापार येक पद्धत. व श्रीमंताचे शुभचिंतक, व हुजूरचे येकनिष्ठ सेवक, याचा स्तव फार केला. श्रीकृपे करून इनायतनामे मुतजमनतलब आल्यानंतर कृष्टणरावजी हुजूर येतील. परस्परें रसायन होऊन यैक्यता व चौथाईचे तहाचा बंदोबस्त तो प्रकार करतील. इनायतनामे येण्याची इंतजारी आहे.

चिरंजीव रघोतमरायानीं स्वामीचे कृपेचा व ममता, तीर्थरूप राजश्री नानास्वामीप्रमाणें व सत्कार व सन्मान हुजूर व इतर स्थळीं विशेष करविला. याचा विस्तार चार बंद लिहिला होता. त्यास दुसऱ्याकडून जितकी सेवा घडली तितकी प्रीती करावी, हें उतम. पुरुषार(था)ची रीती व चितापासून विशेष प्रीती करणें, व दुसऱ्याकडून कांहीं उपयोग असो किंवा नसो, कृपा व ममता करीतच जावी हा रूणानुबंध. यास निमित सापेक्षित नांहीं. चिरजीवाची गणना चिरंजीवांत पूर्वींच केली. त्या अर्थीं पोटांतील उत्साहानुरूप जें योग्य तें आपण कृपा करीत आहेत. मीं विशेष विनती काय ल्याहावी. हुजूर ज्या कामास येथोन मीं पाठविलें व स्वामींनी कृपा करून समीप ठेविलें, त्याप्रमाणें कितेक कामाची मी विनंती करावयाचा म॥र चिरजीवास सांगितला. त्याप्रमाणें सरफराजी करून सत्वर इकडें मार्गस्त करावें. बहुत काय लिहिणें, हे विनती.

विनतीजे. राजश्री बालाजीपंत नानास व रा॰ कृष्टणरावजीस

हुजूरचे इनायतनामे आले. याचीं उतरें अर्जिया माघाऊन उभयतां-कडून घेऊ. हुजूर रवाना करितों, हे विनती.

---

**A. R. No. 68.** (पो.ता.) ३ शाबान ११९५ हिजरी
२५ जुलै १७८१

पै।। छ ३ माहे शाबान संन ११९५ हिजरी

पुरवणी २

सेवकाची जागिरीची खेडी प्र।। चालीसगाव व प्र।। बेदर प्रात खानदेश येथे आहेत. गतवर्शी रा।। गनेशपंत बेहेरे गेले. त्यानी अकरासे रुपये खड घेतला. सिवाये खर्चवेच. त्यामुले गांव खराब जाले. रा।। बापूजी होलकर यानी पाच साहासे रुपये घेतले. दुसरे खानदेशचे सुभेदार नारो कृष्ण, त्याचे फडनीस सिवरामपंत, त्यानी सुभेपटी व दहक वगैर मिळून पाच सातसे रुपये घेतले. नानाप्रकारचे उपद्रव. त्यामधे कमाविसदाराचे उपद्रव ते काये ल्याहावे. यामुले गावची वसाहत होत नाही. प्रस्तुत गनेशपंत बेहेरे इकडे येतात. त्यानी आमचे गावाजवल मुकाम केला. गाव गाव स्वार पाठऊन सात आठसे रुपये घेतले. सिवाये खर्च. दुसरे पिपरखेड म्हणौन गाव जागिरीत आहे. तेथील पाटलाचा कर्जदार गनेशपताजवल फिर्याद जाला. ते कर्ज बहुता दिवसाचे देऊन घेऊन काही राहिले न राहिले यैसे होते. कर्जदार फिर्याद जाला. म्हणौन गनेशपताने त्या पाट-लावर मसाला मारून स्वार पाठविले. तो पाटील गरीब त्याची अबरु घेतली. तुफानाची गोष्ट. त्यात देयास नाही हे जाणौन त्या पाटलाने पोट कटयारी करून प्रान दिल्हा. या प्रमाणे याजकडील उपद्रवाच्या गोष्टी आहेत. कोन्ही पुसता नाही. यैसे जाले. हे सविस्तर वर्तमान कारभाऱ्यास व कृष्णरावजीस सागितले. समा-धानपूर्वक मात्र गोष्टी सागतात, परतु येकही गोष्ट अमलात येत

नाही. ज्याचे चितास येईल तो लुटितो. नानाप्रकारे तुफाने उभे करून खून होतात. यैसा अतिशये आहे. सुभेपटी वगैर सरकारचे तालुक्यात घ्यावयास प्रयौजन नाही. यैसे असून पटी वगैर घेतात. हा बोभाट सागितला. त्याजवरून सरकारची पत्रे दिल्ही की सुभेपटी वगैरे न घेणे. सुभ्यानी पत्रे अमान्य करून यैवज घेतला. ते सुभेदार येथे आलेत. त्यास समक्ष ताकीद होऊन यैवज माघारा देवीत नाहीत. पत्रे खरी देतात किवा खोटी देतात याचा अर्थ ध्यानास आनावा. सेवकाचा खर्चवेच व संसार भारी. त्यामधे खेड्याची अवस्ता या प्रकारची. याजकडील उपद्रव या प्रकारचा आहे. स्वामीस कळावे म्हणौन लेखन केले असे. ये विशई इनायेतनामे कारभाऱ्यास व रावजीस निक्षून आले पाहिजेत की, इतका उपद्रव करावयास प्रयौज्यन काये. गनेशपंत वगैर यानी यैवज घेतला असेल तो माघारे देवणे, व पुढे हरकोन्हाचा उपद्रव न होये ते करणे. सुभेदार खानदेशाचे सुभेपटी वगैरेचा यैवज़ घेतात याचे कारन काये. सुभेपटी वगैरेचा यैवज घेतला आहे तो माघारा दवणे. पुढे पटी वगैरेचा यैवज न घेत ते करावे. हरयेक विशई याचे साहित्य होत असावे. या अनवये इनायेतनामे सादर करनार स्वामी समर्थ आहेत. माझी सर्व लज्या स्वामीस आहे स्वामी वेगला कोन त्राता आहे की त्यास आपले सुख दुख सागावे. ती॥ देवाजीपताचे आमरन स्वामीनी चालविले. पुढे माझी लज्या सर्व स्वामीस आहे, हे विज्ञाप्ती.

———

**A. R. No. 69.** २५ रजब ११९५ हिजरी  
१७ जुलै १७८१

पै॥ छ ४ शाबान गुरुवार त्रितीये प्रहरी सरकारच्या डांकेबराबर पावले. सन ११९५ हिजरी.

**श्रीनिवास**

**पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार विनती उपरि.**

येथील वर्तमान ता।। छ २५ रजब बुधवारपर्यंत मो पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष कृपापत्र छ १७ माहे म।।रचें, हुजूरचा इनायतनामा व नवाब मोइनुदौलाचें पत्र, व चिरजीव राजश्री रघोतमराव यांचा लिफाफा, सेवकास व राजश्री कृष्टणरावजीस हुजूरचा इनायतनामा मुतजमनतलब हुजूर, व मोइनुदौलाचें पत्र, व स्वामीचें पत्र येणेंप्रमाणें डांकेवर पाठविलीं. तें छ २४ माहे म।।रीं दोन घटका दिवस आल्यानंतर पावलीं. व त्रितीय प्रहरीं राजश्री कृष्टणरावजीस इनायतनामा व पत्रें समग्र पावतीं केलीं. रावजीची आरजू येक वर्षापासून जे होती ते सांप्रत स्वामीचे सईवर यजमानसाहबानीं बार आणली. या उपरि स्वार होऊन हुजूर जावें. याचें मोहूर्त पाहून निघावयाचा निश्चय करावा. या प्रमाणें सेवकानें रावजीस सांगितलें. त्यानीं उतर केलें कीं, इनायतनामा सादर जाहला त्यापक्षीं मुहूर्त पाहून निघांवें, हाच निश्चय. परंतु राजश्री जिवाजीपंतांचीं पत्रें हुजूरचे इनायतनाम्यासहित याच समईं आलीं. आजी येकादसी यास्तव दरबारास जात नांहीं. उदईक द्वादसी. बुधवारीं दरबारास जाऊन नानास सर्व वर्तमान सांगतों. व नानाचे व हरीपंताचे व आमचें मसलहतीनंतर जो निश्चय होईल, त्याप्रमाणें तुम्हास उतर सांगून, हुजूरचे इनायतनाम्याचें उतर लिहून देवितों. व या उपरि मुहूर्त पाहून निघावें हाच निश्चय. याप्रमाणें बोलिले. रा गोविंदरावजीस स्वामीचें पत्रें पावतें केलें. तें स्वामीचे भेटीचे बहुत आरजूमंद आहेत. माघाहून सत्वरच रावजीचे निघावयाचे सिधांतांचें वर्तमान लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

पै।। छ ४ शाबान

श्रीनिवास

पुरवणी. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे .

छ १७ रजबचे रवानगीपत्रीं आज्ञा होती जे रा़ो कृष्टणराव व गोविंदराव यांचे नांवें पत्र लिफाफे खुले पाठविले आहेत. मुनासिब पाहून देणें. त्यास हें लिहिणें मजला योग्य. स्वामीचे चालीची प्रवृती व सलाह श्रीहरीची कृपा ज्याजवर त्यासच प्राप्त होईल. बहुमानपूर्वक आपण आज्ञा करितात हे थोरांची पधत. आज्ञेनुरुप पत्रें वाचून गोंद लाऊन रावजीस व गोविंदरावजीस पावती केलीं. चौथाईचा तह हुजूरचे मर्जीप्रमाणें जाहला पाहिजे. म्हणून हुजूरचे आज्ञेप्रमाणें स्वामीनीं व चिरंजीवानीं व नवाब मोइनुदौला बहादरानीं लिहिलें. याविषईं रावजीनीं संशय घेऊन बहस फार केली. व त्याचें उतर सेवकानें समर्पक केलें व इंगरेजांचे नकशाचा करारा कोणे प्रकारचा जाहला याचाही तपसील फारच आहे व येथें बोलिले. मी उतर केलें कीं हुजूरचे तरफेनें पुरतेपणें वाकिफकारी नांहीं याकरितां येथें काय बोलावें. सांप्रत तुम्हीं हुजूर गेल्यानंतर हुजूरचे मुकरब व उमेद बानीकार तुम्हास लाजवाब करतील याचा विशेष नांहीं. चिरजीव रघोतमराव सर्व वर्तमानास वाकिफ जाहले आहेत, तेंच तुम्हास लाजवाब करतील. सारांश, रावजीचे तरफेनें हुजूर येण्याचा निश्चय जाहला. कारभाऱ्यांसी सलाहमसलत करून त्यांचे समतें करून निश्चय जाण्याचा हुजूरचे अर्जींत लिहून पाठवणें बाकी आहे. श्रीकृपेनें सत्वरच अर्जी येईल. जिवाजीपंताचा प्रकार व प्रभाकरपंताचा मा॥र चिरजीवानीं तपसील-वार लिहिला तो समग्र गोविंदराव यांस सागितला. स्वामीचे दर्शनानंतर परस्परें सर्व वर्तमान ध्यानारूढ होईल. मींहीं किसा सेवेसी लिहीन. दुनयवी लोक सर्व काबूचे यार यांत संशय नांहीं, हें माझें मत. चिरजीव राजश्री रघोतमराव योग्य व जवाबसाल व अर्जमारूज व लिहिण्यांत चांगले उगवले. खातरजमा जाहली म्हणोन पत्रीं आज्ञा. स्वामीचे कृपेंचा पूर्ण आधार व चिरजीवानी योग्य व्हावें हे इछा तीर्थरूपजीची व माझी. सांप्रत स्वामीनी त्यांची योग्यता पसंद केली त्या अर्थीं त्यांची सरफराजी व मजला व तीर्थरूपजीस स्वस्थता जाहली. व चिरंजीव स्वामीची कृपा संपादतील याकरितांच मी सेवेसी पाठविलें. व तेहीं बहुत आरजूमंद होते यास्तव सेवेसी आले. त्यांचे सरफराजींत सेवकाची सर्व प्रकारें

सरफराजी यास्तव विनतीजें. सांप्रत यजमानाचे सेवेंत सेवकास प्रतिबाधकता फार आहे. चिरजीवाचे सरफराजींत मुक्तता आहे. या राजद्वारीं दरबारी काम सर्व चिरंजीवाचे स्वाधीन करून मुख्तार त्यांस मी केलें. हुजूरीहून कांहीं राजकारणसंमधी इरशाद जाहल्यापक्षीं चिरजीव सलाह पुसतेत त्याप्रमाणें सांगणें व दरबारास जाणें लागतें. सांप्रत चिरजीव हुजूर आले आहेत याकरितां त्यांची हस्तकता करणें प्राप्त. स्वामी कृपा करून त्यास सरफराजीपूर्वक रुखसत करतील व ते येतील तो सुदिवस, हे विनती.

---

पै।। छ ४ शाबान

श्रीनिवास

पुरवणी अखबार पुणें छ २५ रजब सन ११९५ हिजरी.

मानाजी फांकडा सिंदा पंढरपुरावर प्रतिनिधीकडील लढाईंत पळोन गेला. व सटवाजी भोंसला व बाजीराव बरवे सुरतेस रघुनाथराव यांजकडें गेले. हें वर्तमान छ २४ माहे म।।री अखबार रवाना केली त्यांत लिहिलें होतें. त्यानंतर छ म।।रीं दुर्गोजी भापकराकडील कलमी खबर येथील कारपरदाजास आली की मानाजी सिंदा व सटवाजी भोंसला व आनंदराव जाधव व बाजीराव बरवा हजार स्वारानसीं कूच दरकूच सुरतेस जात होते. गणेशपंत बरवे यानी भापकरास लिहून पाठविलें कीं मानाजी सिंदा वगैरे पंढरपूरचे लढाईंत सिकस्त खाऊन पळोन जात आहेत. तुमचे काबूंत आलियां यांस लुटणें. त्यावरून भापकर वर्तमानाचे शोधांत होतें. कोल्हेरसमीप मानाजी सिंदे वगैरे आले ते समईं भापकरास खबर कळली कीं जमीयत थोडकी आहे व कबीलेसुधां जात आहेत. दुर्गोजी भापकराकडील च्यारपांचसे स्वार कांही लमाणाची भरताड सुरतेकडें जात होती ते लुटून आणाव-

याकरितां गेले होते. व च्यार पांचसे लोक भापकरासमीप होते. त्या संधीत हें वर्तमान आलें. व तयार होऊन मानाजी व सटवाजी भोसले वगैरे वर चालून गेले. कोल्हेरीपासून पांच कोस पुढें केळखामळया-समीप गांठ पडली. व परस्परें हमजातीची लढाई जाहलीं. दोन घटका लढाई जमली. मानाजी सिंदा वगैरे हजार अकरासे स्वार होते याक-रितां गालिब पडले व भापकर पसपा होऊन सांभाळून माघारा फिरले. मानाजी वगैरेनीं तीन कोस ताकूब केला. व मानाजी व सटवाजी व आनंदराव जाधव यानीं भापकरांस बहुत शरमिंदे केलें कीं तुम्हीं व व आम्हीं येकजात व शरीरसंमधी व सिपाहगिरीचा बाना बाळगितों. आम्हांपुढें तुम्हीं पळतां हा जंग तुम्हावर आहे. याप्रमाणें बहुत लाजविलें त्यावरून दुर्गोजी व परवतराव व अमृतराव वगैरे भापकर माघारा फिरले. पावसाकरितां चिखल जाहला व घोडयांस धावणीस फार किलत जाहली. याकरितां भापकरांचे सरदार व कितेक लोक प्यादें जाहले व घोडीं सोडलीं. त्यासमईं मानाजी व सटवाजी भोंसले वगैरे प्यादे जाहले. परस्परें तलवार व भाल्याची लढाई जाहली. सटवाजी भोंसल्याचे तोंडावर परवतराव भापकराचे तलवारीची जखम लागली. व सटवाजीनें तलवार चालविली ते परवतराव भापकरास लागून दोन बोटें हाताचीं तुटलीं. मानाजी सिंदा व सटवाजी भोंसला याची व अमृतराव भापकराचे लढाईत परस्परें जखमी जाहलें व अमृतराव भापकर ठार पडला. त्यानंतर भापकरानी लढाई मवकूफ करून जमून उभे राहिले. मानाजी सिंदे वगैरेही माघारा फिरोन गेले. दाहावीस घोडीं मानाजी वगैरे कडील भापकराकडें आली व भापकराकडील वीस पंचेवीस घोडें सटवाजी व मानाजी वगैरेनीं नेली. या प्र॥ छ २४ माहे म॥रीं वर्तमान आलें. येथील कारपरदाजांचे जुबानीं भापकराचीं फते जाहली व मानाजी वगैरे पळोन गेले. व अमृतराव जखमी फार आहे. सदरहू खारिज व कारपरदाजांचे सांगितल्याप्रमाणें लिहिल असे. श्रुत होय, हे विनती.

२

पै।। छ ४ शाबान

पुरवणी अखबार पुणें छ २५ रजब सन ११९५ हिजरी. गणेशपंत बहिरे खानदेशांत गिरना नदीवर आले हें वर्तमान पूर्वील पत्री लिहिलें आहे. सांप्रत यैकिलें कीं गाडदी वगैरे सिबंदीचे लोकानीं अडविलें, याकरितां लोकांचे समाजाविसीकरितां मुकामात करून राहिले आहेत.

प्रतिनिधीची फौज सदासिवपंत खाडेलकर दि।। वासुदेवबावा यासहित मानाजी फांकडे वगैरेचे तंबीस गेले होते. ते छ २४ माहे म।।रीं पुण्यास आले व वानवडीसमीप मुकाम करून राहिले. छ २५ रोजी बालाजी जनार्दन इस्तकबाल जाऊन भेटले. सदासिवपंत बालाजीपंताचे हमराह म।।रनुलेचे हवेलीस आला. व फौज सात आठसे स्वार वानवडीसमीप आहे.

छ २४ माहे म।।रीं पंतप्रधानांची स्वारी पर्वतीस गेली होती. वाघावर हाती घालून सेर केले. येके हातीनें वाघावर चोट चालवून जांया केले.

---

**A. R. No. 70.**

२६ रजब ११९५ हिजरी
१८ जुलै १७८१

पै।। छ ४ शाबान संन ११९५ हिजरी, रोज बुधवार डांकेबरोबर.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. यथील कुशल त।। छ २६ माहे रजब, मु।। पुणे, स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन, स्वानद लेखन आज्ञा करीत असिले प।।. विशेष येथील वर्तमान

छ २४ माहे म॥र रोज मगळवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले. ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर येथील वर्तमान, येकादसी म्हणौन तिसरे प्रहरी श्रीमत व नाना वगैरे कारभारी स्वारी तयार करून परवतीचे दरशनास गेले होते. दर्शन वगैरे करून दोन तीन घटका तेथें बसल होते. वाघ आणून त्याजवर हाती घातला. त्या हातीनी वाघास जाया केले. याप्रमाणे च्यार घटका तमाशा करून श्रीमत व नाना वगैरे कारभारी वाडयात आले. श्रीमताची स्वारी हातीवर होती. खवासीत नाना व अपा बळवत यैसे उभयेता होते, शृत होये. रा॥ हरीपतास पाच च्यार दिवस जाले ज्वर येत असतो. काही येक आराम आहे. परतु पाच सात दिवस जाले दरबारास येत नाहीत. त्याचे परामृशास नाना आले होते. च्यार घटका बसले होते. दोन घटका नाना व हरीपत याचा खिलवत जाला. उपरातिक नाना आपले वाडयात गेले, शृत होये. छ २५ माहे म॥र रोज बुधवार, मानाजी फाकडे व भादूराव प्रतिनिधी यासी व भवानराव प्रति याचे फौजेसी पढरपुरावर लडाई जाली. भादूराव धरला व मानाजी फाकडा पलून गेला. हे वर्तमान पूर्वी तीन च्यार विनंतीपत्री तपसीलवार लेखन केले होते त्याजवरून शृ(त) जाले असेल. प्रस्तुत वर्तमान आले आहे की राजश्री सटोजी भोसले सुरापूरचे लत्याकडे होते. त्यास सटोजी भोसले व मानाजी फाकडे व बाजीराव बरवे व भादूराव प्रतिनिधी याचा पुत्र यैसे येकत्र होऊन, चार हजार फौजेनसी खानदेश प्रातावरून कोडाईबारीकडे कूच दरकूच गेले. रा॥ गने(श)पंत बेहेरे कासारबारीखाले होते. रा॥ दुर्गोजी भापकर कोडाईबारीवर दोन हजार फौजेनसी होते, त्यास सटोजी व मानाजी फाकडे वगैरे हे दुर्गोजी भापकर याजवर चालून गेले. यासी व त्यासी लडाई जाली. उभयेपक्षी पाचच्यारसे मणुश जाया जालें. से दोनसे घोडी भापकर म॥र याची फाकडे म॥र यानी आनिली. दुर्गोजी भापकर सिकस्त होऊन निघाले. याप्रमाणे लडाई होऊन सटोजी भोसले व मानाजी फाकडे व बाजीराव बरवे वगैरे च्यार हजार फौजेनसी कोडाईबारी

उतरून सोनगडास गेले. पुढे ते सुरतेकडे जाणार यैसे वर्तमान आले. त्याजवरून कारभारी शेशाकित जालें. प्रस्तुत याप्रमाणें वर्तमान आले. मागती काये त्याजकडील वर्तमान तहकीक येईल हे लेखन केले जाईल परतु हे वर्तमान तहकीकच बोलतात, शृत होये. तमाम सिलेदार वगैरें लोकास पत्रे लिहितात की श्रावनमासी डेरे वगैरे बाहेर होनार. दसऱ्याचे हगामास सत्वर जमा व्हावे, शृत होये. हैदर नाईक याची पत्रे आली. पत्राचा भावार्थ हाच की दोन तीन पटलनें (पलटनें) त्यानी दुडविली. दुसरे कितीक श्नेह भावाच्या गोष्टी लिहिल्या होत्या. याप्रमाने पत्राचा भावार्थ यैकिल्यात आला. कारभारीही नाईक म।।र याचे ठिकानी बहुतच संतोश आहेत. वरचेवर नाईक म।।र यास बहुत ममतेंची पत्रे लिहितात, शृत होय सिद्यासी व इग्रजासी लडाई आहे. इग्रजाचा ज्यमाव विशेष आहे, यैसे वर्तमान आहे, शृत होये. दुर्गोजी भापकर च्यार पाचसे स्वारानसी कोडाईबरीकडे अंतापुरावर होते. सटोजी भोसले व बाजीराव बरवे वगैरे सातसे स्वारानसी होते. भापकर म।।र यासी व सटोजी भोसले वगैरे यासी छ १५ माहे म।।री लडाई जाली. परस्परे से पनास मणुश जाया जाले. दुर्गोजी भापकर याचा तरवारेच्या जखमेने हात उडाला. अमृत-राव भापकर ठार पडला. याप्रमाणे लडाई होऊन सटोजी भोसले वगैरे सोनगडास गेले. पुढें ते सुरतेस दादासाहेबाकडे जाणार यैसे वर्तमान सरकारात लिहिले आले, शृत होये. भवानराव प्रतिनिधी-कडील वासदेवबावा पढरपुराकडें गेले होते ते तीन च्यारसे स्वारानसी आले. नाना त्याचे भेटीस सात कोस गेले होते, शृत होये. किती बोलतात की सटोजी भासले यासमागमे मानाजी फाकडे गेले नाहीत. कितीक बोलतात की गेले. परतु सटोजी भोसले तर लडाई करून गेले. यैसे वर्तमान तहकीक आले. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काये लिहिणे कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 71**

२९ रजब ११९५ हिजरी
२१ जुलै १७८१

पै।। छ ८ माहे शाबान सन ११९५ हिजरी, सोमवार अडीच प्रहर दिवस, मै डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरि. छ १६ व छ १८ रजबीं स्वामीनीं पत्रें व इनायेतनामे रा। कृष्टणराव बलाळ यांस हुजूर येण्याविषई इनायतनामा सादर जाहल्यासहित पत्रें पाठविलीं. तें छ २४ माहे म।।रीं पावलीं. व रावजीस पत्रें पावती केलीं म्हणोन छ २६ माहे म।।रीं हुजूर अर्जी व स्वामीचे सेवेसी पत्रें डांकेवर रवाना केलीं. तें सेवसी व हुजूर पावली असतील. छ २४ माहे म।।रीं सेवकानें हुजूरचा इनायतनामा व नवाब मोईनुदौला बहादरांचें पत्र व स्वामीचें पत्र व चिरजीव रघोत्तमराव यांचें पत्र कृष्टणरावजीस पावतें केले. तेच समई कृष्टणरावजीनीं निश्चय केला कीं, मोहूर्त उतम पाहून हुजूर जावयाचा निश्चय करितां श्रावणी पौर्णिमास छ १३ शाबानपर्यंत येंथोन स्वार होऊं जाण्याविषई बालाजीपंताचें अनुमोदन पाहिजे व यांचे विचारानें सित्धांत व निश्चय करावा लागतो. याकरितां बालाजीपंतांसी बोलून निश्चय करूं. त्यानंतर हुजूरचे इनायतनाम्याचें उतर अर्जी देऊं. छ २५ रजबीं कृष्टणरावजी दरबारास गेले नांहींत. छ २६ रोजी बालाजी-पंताचे घरीं हरीपंत व कृष्टणराव व उभयतां गोविंदराव व बालाजी-पंत पांचाची खिलवत जाहली. दाहा घटकापर्यंत खिलवत जाहली. त्या उपरि मजलस बरखास्त जाहली. छ २७ व छ २८ दोन रोज हरीपंत व बालाजीपंतांची खिलवत जाहली. सेवकानें कृष्टणरावजीस विचारिलें कीं, बालाजीपंत स्वमुखें तुम्हांस जा म्हणतील, ते समईं जिवाजीपंताचे विद्यमानें जो इनायतनामा तुम्हांस आला आहे, त्याचा जवाब अर्जी लिहून देणें. हुजूर जांण्याचा सित्धांत मजला सांगतां त्या अर्थी रघोतमराव यांचे विद्यमानें हुजूरचा इनायतनामा

व मोईनुदौला बहादर यांचें पत्र, व राजें अमानतरामजीचें पत्र, व रघोत्तमराव यांचें पत्र तुम्हास जें आलें, त्याचे ज्वाब लिहून देणें. म्हणजे हुजूर निश्चय होईल कीं कृष्टणराव येतात. दोन दिवस आधिक उणें तुम्हीं जाल, ये विषईंचा संशय हुजूर होणार नांहीं. त्यावरून आजी छ २९ रजब रविवारीं रावजीनीं उभयतां गोविंदराव यांस सागितले कीं, रघोतमराव यांचे विद्यमानें हुजूरचा इनायतनामा व इतर जें पत्रें आली आहेंत, त्याच दरजवाब लिहून देणे. गोविंदराव यानीं निश्चय केला कीं, उदईक छ १ शाबान सोमवारीं पत्रें लिहून सिध करितों. छ २ माहे म॥रीं रवाना करणें. श्री कृपेने रावजी-कडील पत्रें सत्वरच हुजूर व स्वामीचे सेवेसी डांकेवर रवाना करितों. या उपरि कृष्टणराव यांचे येण्याविषईंचा संशय किमपि राहिला नांहीं. यैसा निश्चय यांचे भाषणावरून जाहला. सेवेसी श्रुत होये. अखबार छ २६ रजबीं रवाना केली होती. त्या उपरि छ म॥रपर्यंत पृथक लिहून सेवेसी पत्रें पाठविलीं आहेंत. बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

श्रीनिवास

पुरवणी. श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी विनतीजे. कृष्णरावजीस हुजूरीहून मुतजमीनतलब इनायतनामा आला आहे. त्यास रावजीनीं गोविंदराव यांचे इतिफाकानें सेवकास सांगीतलें कीं या उपरि हुजूर जाण्याविषईं कांहीं उजूर नांहीं. आम्हीं आपलें तरफेनें जे इछित होतो, त्याप्रमाणें हुजूरचा इनायतनामा सादर जाहला. श्रावणी पौर्णिमेपर्यंत निश्चयरूप स्वार होतों. परंतु राजकारणी काम राजश्री नाना व हरीपंत यांस वर्तमान सांगितलें. व आमचें व त्यांचें परस्परें उतर प्रत्योतर जाहलें. पुन्हां येकदोन बैठकी होऊन नानाकडून सिरधांत करऊं. तें समईं अर्जी हुजूर लिहून पाठऊं.

सांप्रत जिवाजीपंतास आम्हीं लिहिलें आहे कीं, बमोजिब इरशाद येतों. तुम्हींही याच प्रमाणें लिहिणें. याप्रमाणें रावजीनीं सांगितलें. सारांश, रावजीचे येण्याचा अनमान व संशय किमपि दिसत नांहीं. वर्षपर्यंत इनायतनामा यावयाचा प्रयत्न करीत आहेत. व सांप्रत बहुत प्रयत्नें करून इनायतनामा सादर जाहला याउपरि, कृष्टणरावजीकडून कांही दिकत निघाल्यास, पंतप्रधानाचे व हुजूरचे बिगाडांत बाकी कोणती राहिली? कृष्णराव हुजूर न आल्यापक्षीं, येथील कारभाऱ्यांचे चितांत कृत्रिमता व परस्परें सावध राहांवें हाच सिधांत. हैदरअलीखांनाची व पंतप्रधानांची यैक्यता जाहली आहे. व खान मा॥र इंगरेजांवर गालिब आहे. इंगरेजांसी इतिफाक हैदर नायकाचे अनुमतावितरिक्त येथील कारभाऱ्यांस सर्वथैव करणें नांहीं. कृष्टणरावजी हुजूर आल्यानंतर इंगरेजांसी बिगाड करावा म्हणोन पूर्वीं हुजूरचा इरशाद जाहला आहे. व नकशाप्रमाणें हुजूरची फौज सिकाकोल वगैरे मुलकात गेली नाही. याकरितां कृष्टणरावजीचे चितांत ज्वाबसाल करावयाची अरजू फार आहे. ज्वाबसालांत हुजूरीहून हे कायल जाहल्यास, हुजूरचे इरशादेप्रमाणें यैकतील. हे कायल न जाहले व हुजूरचे मर्जीप्रमाणें चौथाईचा फैसला व इंगरेजांची तंबी हुजूर मंजूर नांहीं, हाच निश्चय जाहल्यापक्षीं, कृष्टणरावजीस येथील कारभाऱ्यानीं बहुत दिवस सांगितलें आहे कीं, इंगरेजांचा मजहला तुटजोपर्यंत हजरत बंदगानआलीचे सरदार चौथ वगैरेचा अमल देत नांहीत, व सांप्रत हुजूरीहूनही चौथाईचा अमल बंद करविला आहे. याकरितां स्नेहावितिरिक्त दुसरी गोष्ट आम्ही उचार करीत नांहीं. जे दिवसी इंगरेजाचा दारमदार होईल, ते समई आम्ही स्वस्थ बसूं. हैदरआलीखानाकडून बेअदाई जाहलियां, त्याची तंबीं जे मुनासिब असेल तो हुजूरीहून होईल. या अर्थी कृष्टणरावजी हुजूर गेल्यानंतर जे गोष्ट कौल करारांत आली तें ठरऊन, जे मर्जीमुबारकेस आलें त्याप्रमाणें हुजूरीहून इरषाद होईल. तरी समयावर द्रिष्टी देऊन कृष्टणरावजीनीं हुजूरचे इरषादेप्रमाणें कबूल करांवे व रुखसत घेऊन यांवें. या समई मर्जी

तोडू नय. पुढें आपली काबू पडेल ते समईं समजोन घेऊं. व इंगरेजांसीं स्नेह हैदर नायकाचे इस्तसवाबेवितरिक्त सर्वथैव होणार नांहीं हा येथील कारभाऱ्यांचां सित्धांत आहे. सेवेसी श्रुत होय, हें विनती.

पैं।। छ ८ माहे शाबान सन ११९५ हिजरी, सोमवार अडीच प्रहर दिवस, मै डांक सरकार.

---

श्रीनिवास

पुरवणी. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी, विनतीजे. छ १६ रजबीं पत्रें पाठविलीं. त्याचें उतर छ २४ व छ २६ माहे म।।रीं डांकेवर सेवेसी पाठविलें, तें दारोग्याचे विद्यमानें सेवेसी पावलें असेल. छ १८ रजबचें पत्र व रवानगी छ २० पाठविलें, तें छ २६ माहे म।।रीं पावलें. राजश्री कृष्टणरावजीचे येण्याचा निश्चय लिहिणें म्हणोन आज्ञा. त्यास पौर्णिमेपर्यंत रावजी येथोन स्वार होतील. याचा विस्तार पृथकपत्रीं लिहिला आहे. येथील मंडली धनलोभी व कार्यकारण स्नेहित, याचा अनुभव मजला फार आहे. स्वामीसही आहे. राजश्री कृष्टणरावजीचा व स्वामीचा प्राचीन स्नेह, व गोविंदराव भगवंत बहुत रसिक आहेत. श्रीकृपेनें स्वामीं हुजूरचे दौलतख्वाह व येकनिष्ठ व दियानतदार. द्रव्याचे लोलुप नांहींत. व हुजूरची इनायत व समयोचित श्रीमंत पंतप्रधानाचे साहित्यास व सेवेसी तत्पर. त्या अर्थी, रावजी हुजूर आल्यानंतर ज्वाबसालांत शरीक मसलहत विषईं हुजूरीहून इरशाद आहे. व स्वामी चित घालतील. कृष्टणराव व गोविंदराव स्वामीचे स्नेहित. हुजूरचे तरफेनें कितेक ज्वाबसाल करावयाचे आपण करतील व करावे. व हुजूरचे इरषादचे बरखिलाफ उतर प्रत्योतर करणें कोणाचा मकदूर? परंतु श्रीमंत पंतप्रधानांचे स्नेहाचें लक्ष चितांत ठेवावें हा यांचा अशय आहे. बहुत काय लिहिणें, हे विनती.

पै।। छ ८ माहे शाबान सोमवार सन ११९५ हिजरी. अडीच प्रहर दिवस, मे डांक सरकार.

---

पै।। छ ८ माहे शाबान सन ११९५ हिजरी. सोमवार अडीच प्रहर दिवस, मे डांक सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें. अज इ।। छ २६ रजब लगायत छ २९ सन ११९५ हिजरी, रविवार श्रावण शुध १.
कोल्हेरसमीप केलखामल्याजवळ सटवाजी भोंसले वगैरेसी व दुर्गोजी भापकरासीं लढाई जाहली. अमृतराव भापकर ठार पडला व परवतराव भापकराचे हाताचीं बोटें तुटलीं. व परस्परें लोक जखमी जाहले. त्या उपरि सटवाजी भोंसलें वगैरे सांभाळून गेले. ते सुरतेस रघुनाथरायाकडें जाणार. गणेशपंत बहिरे याचकडील पागा वगैरे लोक आले व म।।र नुलेहीं सत्वर येणार. व प्रतिनिधीची फौज व सदासिवपंत खाडेलकर छ २५ माहे म।।रीं पुण्यास आले. या वितरिक्त कितेक वर्तमान लिहून अखबार हुजूर रवाना केली. ते दारोग्याचे विद्यमानें गुजरानली असेल. त्याउपरि यैकिलें व प्रत्यक्ष वर्तमान तफसिलवार लिहिलें असे.

सटवाजी भोंसले व आनंदराव जाधव व बाजीराव बरवे यांसी व मानाजी फांकडयासीं इतिफाक जाहला. व बइतिफाक सुरतेकडे गेले. हें वर्तमान छ २५ माहे म।।रचे पत्रीं यैकिल्याप्रमाणें लिहिलें होते. त्यानंतर येथील कारपरदाजांनी तहकीक बातनी आणविली. त्यांत निश्चय जाहला कीं, सटवाजी भोंसले व आनंदराव जाधव व

बाजीराव बरवे व नरसिंगराव वगैरे बइतिफाक सुरतेस गेले. मानाजी फांकडे पंढरपुरचे लढाईंत सिकस्त खाऊन गेला. तो तुळजापूर प्रांती आहे. याप्रमाणें तहकीक खबर कळल्यानंतर, फांकडे म॥रास दस्तगीर करावें किंवा पळ काहडल्यास ताकूब करावा, हे तजवीज येथील कारपरदाजानीं करून, पांडुरंग बाबूराव बारामतीवाले वगैरेस पत्रें पाठवावयाची तजवीज केली आहे की, तुम्हीं फौजेसुधां जाऊन मानाजीस दस्तगीर करणें.

गणेशपंत बहिरे खानदेशांत गिरनानदीचे समीप आहेत. सिबंदीचे लोकाचा हंगामा. याकरितां तेथेंच मुकामांत करून राहिले आहेत म्हणोन पूर्वील पत्री म॥र लिहिला आहे. सांप्रत येथील कारपरदाजानीं तजवीज केली आहे कीं, खानदेशचें रसदेपैकीं नख्त रुपये गणेशपंतास देवऊन, लोकांची समजावीश करावी. व गणेशपंतानी तेथेच राहांवें. ये विषईची पत्रें गणेशपंतास जाणार.

हैदरअलीखान चिदंबरासमीप, व इंगरेज महमदीबंदरासमीप व चिदंबरासमीप लढाई इंगरेजासीं जाहल्याचें वर्तमान पूर्वीं लिहिलें होतें. सांप्रत येथील कारपरदाजाचे जुबानीं यैकिलें कीं, कुंभकोणावर इंगरेजांची तीन पलटणें गेलीं होतीं. हें वर्तमान खान म॥रास कळल्यानंतर, बारचे जवान व तोफा दाहा व पांच हजार स्वार रवाना केले. त्यांसी व इंगरेजांचे पलटणासीं लढाई जाहली. परस्परें लोक जखमी व ठार जाहले. परंतु इंगरेजांची सिकस्त जाहली. इंगरेज व काळें प्यादे फार मारलें व दस्तगीर केले. राहिले इंगरेज झाडीचे आश्रयानें महमदीबंदरास गेले.

माहदाजी सिंद्यांची व इंगरेंजांची सिपरीकोलारसेसमीप लढाई रजबचे महिन्यांत जाहली. दुतरफा लोक जखमी व ठार जाहले. इंगरेजानी निकड केली. ते समईं मऱ्हाटी फौज निघोन गेली. सांप्रत माहादाजी सिंदे गनिमी कायद्यानें घेरा घालून आहेत. केवळ मुकाबिल लढाई देंत नांहींत.

पै।। छ ७ शाबान सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

पुरवणी. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी, विनतीजे. कृपा पत्रें दोन, यक छ २६ रजबचें जासुदांबरोबर व दुसरें छ २९ रजबचें डांकेवर रवाना केलें. ते छ ९ व छ १० रजबीं पाऊन बहुत संतोष जाहला. मौजे रेले व सांगवीस जाधवांचा उपद्रव लागतो. व पत्रास मालुमाती म्हणोन मानीत नांहींत. हा म।।र रा॰ कृष्टण-रावजी व गोविंदराव यांस सांगितला. जाधवाचे वकीलास ताकीद प्रखर केली. व पुन्हां नानाकडून ताकीद करवितों, व बंदोबस्त पका करून देवितों, या प्रमाणें नेम केला आहे. कितेक वर्तमान पृथक पत्रावरून व चिरजीव राजश्री रघोतमराव विनती करतील त्या-वरून सेवसी श्रुत होईल. हे विनती.

---

पै।। छ ८ माहे शाबान सन ११९५ हिजरी, शनवार अडीच प्रहर दिवस, मै डांक सरकार.

२

श्रीनिवास

पुरवणी अखबार. छ २९ रजब सन ११९५ हिजरी.

हैदरअली खानानीं येथील कारपरदाजांस पत्रें पाठविलीं आहेंत कीं, फौजेची निगाहदास्त करावयाकरितां आपल्याकडील मातबर मुतसदी पुणें प्रांतीं पाठवितों. पंतप्रधानानीं कौल व लोकांस परवानगी द्यावी. हा म।।र खासगत तैनाती जोडी छ १९ रजबीं रवाना केलीं, त्यांज-बरोबर पत्रें पाठविलीं, त्यांत लिहिला होता. सांप्रत राजश्री कृष्टणरा-

वजीनीं आपले मुखें वर्तमान सांगितलें कीं, खान म॥रानें स्पष्ट पत्रीं लिहिलें आहे कीं, मातबर मुतसद्यास विज्यापुरास पाठवितों. स्वाराची निगाहदास्त करील. पंतप्रधानानीं सदर कौल लिहून द्यावा कीं, खुषरजावंदीनें ज्याचे चितास येईल, त्यानें हैदरअली खानांचे नौकरीस जावें. याचें उतर अद्यापि वकीलास सांगितलें नांहीं. व खान म॥रासही लिहिलें नांहीं व याचें उतर कोणे प्रकारें ल्याहांवें व वकीलास सांगांवें याची सलाह हुजूरीहून इरशाद व्हावी म्हणोन जिवाजीपंतास लिहिलें आहें. पंत म॥र हुजूर अर्ज करतील. तुम्हींही लिहिणें म्हणोन रावजीनीं सांगितलें. मऱ्हाटे स्वार बहुत करून मिरासदार या प्रांतीचे सांप्रत पंतप्रधानाकडून कराराप्रमाणें रुपये पावत नांहींत. परंतु लोकांवर दाब आहे. इकडील परवानगी वितरिक्त दुसऱ्याचे नौकरीस खसूस हैदरअलीखानाकडें जात नांहींत. येकदां परवानगी दिधली म्हणजे लोकांची रुजवात तिकडें पडेल. हैदरअलीखान जरदार खजानेपुर स्वारांस नालबंदी पेशगी तलब देईल. ते समईं बहुत करून लोक खान म॥राकडे रुजू राहातील. लोकांस परवानगी न दिधलियां सांप्रत हैदरअलीखानासी यैक्यता जाहली आहे. यांत कत्रिम व संशय उत्पन्न होतो.

कृष्टणराव जोसी व रास्त्याकडील फौज पंतप्रधानाकडून हैदरअली खानाकडें रवाना जाहली होती. ते गुरमकोंडयापर्यंत गेल्याची खबर आजी छ म॥रीं आली. कर्नाटक प्रांतात मरीची हवा उत्पन्न जाहली. हैदरअलीखानाचे लष्करांत व रास्त्याकडील फौज येथोन गेली. तेथें मनुष्यें बहुत मरत आहेंत या प्र॥ वर्तमान आलें. छ २९ माहे म॥रीं कृष्टणराव बलाळ व गोविंदराव भगवंतांस बालाजीपंतानी भोजनास बोलाविलें होतें. उभयतांस पैठणी सेलें व मुडांसीं असामीस दोन वस्त्रें प्रमाणें दिधलीं. श्रुत होय. हे विनती.

**A. R. No. 72.**

१ शाबान ११९५ हिजरी
२३ जुलै १७८१

पै।। छ ८ माहे शाबान सोमवार सन ११९५ हिजरी, अडीच प्रहर दिवस, मै डांक सरकार.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. येथील कुशल. त।। छ १ माहे शाबान मु।। पुणे स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन, स्वानद लेखन आज्ञा करीत असिले प।।. विशष, येथील वर्तमान छ २६ माहे रजब रोज गुरुवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले. ते पावान सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर, येथील वर्तमान राजश्री सटोजी भोसले व बाजीराव बरवे व मानाजी फाकडे वगैरे सातसे आठसे स्वारानसी इकडून कोडाईबारीकडे गेले. बारीजवल दुर्गोजी भापकर पाचच्यारसे स्वारानसी होते. त्यासी लडाई करून, भापकर म।।र यास सिकस्त करून, सटोजी भोसले वगैरे आपल्या बेलबारी उतरून, सोनगडास गेले. पुढे सुरतेस जाणार. हे वर्तमान पूर्वीचे विनंतीपत्री लेखन केले होते. त्यावरून अक्षरशा ध्यानास आले असेल. त्यास सटोजी भोसले व मानाजी फाकडे व बाजीराव बरवे दादासाहेबाचे मेहोने व भादूराव प्रतिनिधी याचा पुत्र यैसे हजार बारासे स्वारानसी पढरपुराजवल जमून, सिद्याची व होलकराची निशाने केली. अवाई घातली की, आम्ही भापकराचे मदतीस जातो. यैसा कावा करून निघाले. ते लाब लाब मजला करून कासारबारी उतरून खानदेशात गेले. कासारबारीखाले नव दाहा कोसावर रा।। गनेशपंत बेहेरे पाच साहा हजार फौजेनसी होते. परतु त्यास हे वर्तमान नाही. वर्तमान कलल्यावर फौज वगैरे पाठवयाची तजवीज केली. तो सटोजी भोसले वगैरे निघून कोडाईबारीकडे गेले. तेथे पाचच्यारसे स्वारानसी दुर्गोजी भापकर होते. त्यासी व सटोजी भोसले वगैरे याची लडाई जाली. उभये-

पक्षी से दोनसे मणुश जाया जाले. अमृ(त) राव भापकर ठार जाले. दुर्गोजी भापकर यास जखम लागली. से पनास घोडी भापकर म।।र याची नेली. याप्रमाणे लडाई करून, भापकर म।।र यास सिकस्त करून, सटोजी भोसले व मानाजी फाकडे व बाजीराव बरवे वगैरे हजार स्वारानसी सोनगडास गेले. पुढे ते सुरतेस जाणार. मानाजी फाकडे याचा मात्र सदेई करितात की तो यात नवता. परतु फाकडे म।।रही सटोजी भोसल्यासमागमे गेला, यैसे वर्तमान आहे. शृत होये. सटोजी भोसले वगैरे हे सुरतेकडे गेले. हे खुल मातबरच गेले. येणेकडून तिकडे मऱ्हाटी फौज जमा. याअर्थी कारभारी वगैरे यास बहुत अदेशा प्राप्त जाला आहे. शृत होये. छ २७ माहे रजब रोज शुक्रवार. राजश्री गनेशपंत बेहेरे खानदेशात कासारबारी-खाले तीनच्यार कोस नसरतपुरावर मुकाम करून आहेत. इकडे येणार होते. प्रस्तुत त्यास लिहून पाठविले की, सटोजी भोसले वगैरे कोडाइंबारीकडे गेले. आता तिकडे ते उपद्रव करतील. त्यास उटी फौजेसहित कोडाईबारीकडे जाणे म्हणौन त्यास लिहिले आहे. त्यास गनेशपत फौज वगैरे तिकडे रवाना करून, अपन सडे मात्र येथे येऊन, कारभाऱ्याची भेट घेऊन, आपला खर्चाचा वगैरेचा बदोबस्त करून, मागी जाणार. यैसे वर्तमान आहे. शृत होये. र।। कृष्णराव दरबारास गेले होते. नाना व हरीपंत व कृष्णराव याचा खिलवत जाला. भाव यैकिन्यात आला की, र।। कृष्णरावजीस येज्यमान-साहेबाकडे रवाना करावे यैसा निश्चये होतो. कारन की, मोरो गिरमाजी तहाचे कामास आले आहेत. त्यास इकडून तिकडून अद्याप निर्गमात येत नाही. म्हणौन येज्यमानसाहेबी बेदर वगैरे कडील याचे कमाविसदार उठविले. त्यास येज्यमानसाहेबाचे मर्जीप्रमाणे कार्य करावे. दुसरे येज्यमानसाहेबाची णूतन काही मर्जी रक्षून, काही फौज तामील करून, इग्रजाचे पारपत्य करावे. यैसे यकदोन वगैरे राजकारनाचा डौल करून, रावजीची रवानगी श्रावन सुद ५ वगैरे जालिया होनार, यैसे यैकिन्यात आले. मग निश्चये होऊन रावजीची रवानगी जालिया लेखन केले जाईल. शृत होये. बेदर वगैरेकडील

कमाविसदार उठविले म्हणौन यथील लोक विपरियास भाव बहुत बोलतात. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. शृत होये. छ २८ माहे रजब रोज शनवार. विष्णुपंत गजरे याचे पुत्राजवल कारकून होता. त्याजपासून काही अतर जाले म्हणौन तो मेला. त्यास ब्राम्हनाचा दोश येंऊन, विष्णुपताचे पुत्रापासून दऊन लक्ष रुपये घेतले. शृत होये. इग्रज कल्यानीस व ममईस सरजाम करितात. सत्वरच ते इकडे उद्योग करणार. या अर्थी श्रावन सुद पचमीस हेही डेरे बाहेर करनार. तमाम लोकास पत्रे पाठवितात की, सत्वर जमा व्हावे. शृत होये. हैदर नाईक याची पत्रे आली. भाव यैकिन्यात आला की, मागती नाईक म॥र यासी व इग्रजासी लडाई जाली. इग्रजाकडील येक दोन पलटने सिकस्त केली. यैसे वर्तमान आहे. शृत होये. सध्याकाली नाना कृष्णरावजीचे घरी आले होते. साहा घटकापरियेत नाना व रावजी याचा खि(ल)वत जाला . भाव यैकिन्यात आला की, रावजीची रवानगी येज्यमानसाहेबाकडे सत्वरच होनार. मग निश्चये होऊन रावजीची रवानगी जालिया, लेखन केले जाईल. शृत होये. रा॥ दुर्गोजी भापकर लडाईत सिकस्त जाले, व लोक जखमी वगैरे जाले, व खर्चयास नाही म्हणौन त्यास दाहा हजार रुपये पाठवितात. शृत होये. छ २९ माहे रजब रोज रविवार. रा॥ सटोजी भोसले वगैरे हे सोनगडाकडे गेले. ते व गुलज्यारखान वगैरे येकत्र होऊन, व च्यार पाच पलटने यैसा ज्यमाव करून, कोडाईबारीकडे येणार यैसे वर्तमान आहे. शृत होये. कोकन प्राती तल्याचे किल्याकडे हपशानी मातबर उपद्रव माडला आहे. शृत होये. श्रावन सुद पचमीचे दक्षनेस आजपासून प्रारभ जाला आहे. वाडयात दक्षना होती. पचमीस दक्षना परवतीस होईल. शृत होये. राजश्री कृष्णरावजी नानाचे घरी भोज्यनास गेले होते. भोज्यन करून च्यार घटका खिलवत जाला. उपरातिक रावजी आपले घरास आले. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. कामे काजे जाली. विदित होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल, ते सेवेसी लेखन केले

जाईल . छ १५ व छ १८ माहे रजबची आज्ञापत्रे व छ १ माहे रजबाचा इनायेतनामा सादर केला. इनायेतनामा व आज्ञापत्रे सादर करून सरकारचे डाकेसमागमे पाठविली. ते छ २६ माहे रजबी सेवकास पावली. इनायेतनामा व आज्ञापत्रे पावोन बहुत संतोश जाला. सदैव याच प्रकारे इनायेतनामे व आज्ञापत्रे सादर करणार स्वामी समर्थ. आज्ञापत्री सादर केले की, छ १४ माहे रजब इनायत-नामे दोन ज्यवाबी डाकेसमागमे रवाना केले, ते पावल्याचे उतर पाठवणे. त्यास ते इनायतनामे पावले. त्याचे उतर पूर्वी विनंती-पत्र सेवेसी रवाना केले त्यात लेखन केले आहे. शृत होये. सेवकाचे गावखेडयास गनेशपंत वगैरे याचा उपद्रव फार जाला. यैवज नेला. गाव खराब जाले. येविशईचे वर्तमान पूर्वी येक दोन विनंतीपत्री तपसीलवार लेखन केले आहे. त्याजवरून ध्यानास येईल. गावखेडे वगैरेचे वर्तमान कृष्णरावजीस बहुत वेला सागितले. यैकून मात्र घेतात. परतु त्याजकडून निगर्म करून देवावा, पुढे ताकीद करावी, हे अमलात येत नाही. येविशई यथील कारभाऱ्यास व रावजीस सरकारातून ताकीद करनार व इनायेतनामे वगैरे पाठविणार स्वामी समर्थ आहेत. सर्वस्वे माझा अभिमान व लज्या स्वामीस आहे. सर्व प्रकारे मजला त्राते स्वामीचे चरन आहेत, माझी सर्व निष्ठा (स्वा)मीचे चरनासी आहे. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे हें विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 73.**

४ शाबान ११९५ हिजरी
२६ जुलै १७८१

पै॥ छ ११ माहे शाबान संन ११९५ हिजरी, रोज गुरुवार, डांकेवर.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार. विनती उपरि. येथील

वर्तमान त।। छ ४ शाबान, श्रावण शुध षष्ठी, गुरुवासरपर्यंत मो।। पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. पूर्वी छ १ माहे म।।री हुजूरी अर्जी व अखबार स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर रवाना केलें ते दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीस पावलें असेल. त्यानंतर छ १ लगायत छ ४ शाबानपर्यंत अखबार पृथकपत्रीं लिहिली आहे, त्यावरून इकडील वर्तमान सेवेसी श्रुत होईल. रा। कृष्टणरावजीस हुजूरचा इनायतनामा व नवाब मोईनुदौला बहादरांचें पत्र स्वामीचे व चिरजीव रघोतमराव यांचे पत्रासहित हुजूर येण्याविषईं आलें. त्याचीं उतरें राव म।।रनुलेनीं देतों म्हणोन निश्चय केला व येका दोन दिवसांत हुजूर पाठवितों म्हणोन पूर्वील पत्रीं लिहिलें होतें. त्यास छ २ माहे म।।रीं कृष्टणरावजीनीं सेवकास सांगितलें कीं, छ २६ (२८) रजबीं बाळाजीपंतासी खिलवत जाहला. त्या उपरि पुन्हां आम्हीं दरबारास गेलों नांहीं व बालाजीपंतानीं बोलाविलें नांहीं याकरितां पुन्हां दोन दिवस अर्जी हुजूर न पाठवावी व बाळाजीपंतासी बोलून जो सित्धांत होईल त्याप्रमाणें अर्जी लिहून पाठवणें. सलाह उतम आहे. आम्हीं आपले तर्फेनें हुजूर जावयाचे अरजुमंद व शरीर येथें व जीव हुजूर आहे. परंतु पराधीनता याकरितां बाळाजीपंताकडून आमचे जावयाचे सित्धांत जाहला म्हणजे हुजूर अर्जी व इतर साहबांस पत्रें लिहून देतों याप्रमाणें रावजीनी सांगितलें. त्यावरून म।।रनुलेकडील पत्रें राहिलीं. छ ३ माहे म।।र बुधवारी बमोजिब तलब कृष्टणरावजी, बालाजीपंताचेथें दरबारास गेले होते. परस्परें येकांत जाहला. हरीपंत व उभयतां गोविदराव शरीक मसलहत होते. कृष्टणरावजीनीं आपले मुखें सेवकास सांगितलें कीं, हुजूर सत्वर जाणें म्हणोन बालाजीपंतानीं परवानगी दिधली. याउपरि प्रयाण मुहूर्ताचा निश्चय करून येथोन स्वार होतों. या उपरि बालाजीपंताकडील गुंता राहिला नांहीं. छ ३ नागपंचमीपासून दक्षणा द्यावयाची गडबड, सप्तमी शुक्रवारीं दक्षणा समाप्त होईल. छ ६ शनिवारीं अर्जी व पत्रे लिहून देतों, याप्रमाणें निश्चय केला. सारांश, रावजीचे येण्याविषईं गुता नांहीं व आपले तरफेनें अरजुमंद येण्याचे

व बालाजीपंताचे चितांत कृष्टणरावजीस हुजूर पाठवावें म्हणोन होतें या अर्थीं निश्चयरूप येतात. ईश्वरइछेचा संकल्प मात्र कोणे प्रकारचा याचा नेम होत नांहीं. बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

पै।। छ ११ माहे शाबान सन ११९५ हिजरी, रोज गुरुवार डांकेवर.

श्रीनिवास

अखबार पुणें, अज इ।। छ १ शाबान लगायत छ ४ माहे म।।र, सन ११९५ हिजरी, श्रावण शुध ६ गुरुवासर. गणेशपंत बहिरे खानदेशांत आले व पुण्यास येणार होते. त्यांस कारपरदाजानी लिहून पाठविलें की, सटवाजी भोंसले वगैरे सुरत प्रांतास गेले. हगामा करतील. याकरितां तुम्ही पुण्यास न येणें. रसदेचे यैवजीं वीस हजारपर्यंत रुपये देवितों. ते लोकास देऊन समाजाविश करून पुन्हां कोडाईबारीस जाणें. व मानाजी फांकडा सटवाजी भोंसले वगैरे समागमें गेला नांहीं. तुलजापूर प्रांती घांटावर आहे. त्याचे तंबीकरितां पांडुरंग बाबूराव बारामतीकराची रवानगी होणार. हैदरअलीखानांसी व इंगरेजांकडील पलटणासीं कुंभकोणासमीप लढाई जाहली. यांवितरिक्त वर्तमानासहित छ १ माहे म।।रीं अखबार पाठविली ते पाऊन वर्तमान कळलें असेल. त्याउपरि प्रत्यक्ष जाहलें व यैकिलें वर्तमान हुजूर व स्वामीस दफेवार लिहून पाठविलें आहे.

छ ३ माहे म।।रीं हैदरअलीखानाचीं पत्रें वकीलास व कारपरदाजांस आलीं. वर्तमान लिहिलें होतें कीं, करनल कूट इंगरेज महमूदीबंदरासमीप मुकाम करून राहिला व खान म।।राचे फौजेचा माहासरा होता. बंदर म।।रीं लश्कर उतरावयाची जागा फराख नांहीं व रसद येण्याचा पेंच इंगरेजास फार पडला. देवनामपटणचें बंदर महमूदबंदराहून तीन कोस. पेशजी इंगरेजांचे मुकामात बंदर म।।रीं जाहले

होते व जागा लायक फौज राहावयाची याकरितां करनल कुटानें महमूदीबंदरीहून कूच करून देवनामपटणचा रुख धरला. येके तरफेस दरया, येक रुख खुष्की व हैदरअलीखानांची फौज. त्यांसी लढाई करीत देवनामपटणास गेला. इंगरेजाकडील दोन हजार मुडदा तीन कोसांत सुमारास आला. खान म॥राकडीलहीं हजार बारासें लोक व दोन तीनसें घोडी ठार जाहलीं. सांप्रत करनल कूट देवनामपटणीं व हैदर-अलीखान खाडीचे अलीकडें दोन कोसाचे फासल्यानें उतरला आहे.

कलकतेवाला इमादुदौला यास सवदा जाहला आहे म्हणोन लखनाऊची बातनी येथील कारपरदाजास आली आहे.

इंगरेजांकडील येक जाहाज मातबर दीडसें तोफा वगैरे सरंजामाचें विलायतीहून येत होतें. ते फरासीसानीं लढाईत पाडाऊ केलें व लढाक लोक तमाम जाहाजावरून उतरविले व सें सवासें लोक बतरीक कैद जाहाजांत ठेऊन आपले बंदरासमीप जाहाज लाविलें. रात्रीचे समईं जाहाजांतील लोकानीं रसे कापून जाहाज दरयांत चालविलें. मलाह कसबी नव्हते व तुफानाकरितां जाहाज बहकून गेलें तें येके महिन्यास कोंकणांत सुवर्णदुर्गबंदर किनारेदरया तालुका पंतप्रधान येथील सरहदेंत आले. ते समईं सुवर्णदुर्गवाल्यानीं जाहाज धरलें. गला वगैरे व भोजनाचा सरंजाम व दारू जाहाजावरील फरासीसानीं काढली होती. याकरितां जाहाजांतील लोक हलाक जाहलें व सुवर्णदुर्गा-समीप अकस्मात जाहाज लागलें. सखलादेचे ताके वगैरे सरजाम व पाषाणे दोनसें तोफा जाहाजावर आहेत म्हणोन सुवर्णदुर्गचे कमाविस-दारानीं पंतप्रधानांचे कारपरदाजास वर्तमान लिहून पाठविलें आहे. माघाहून मालाची तादाद लिहून पाठवणार. येथील कारपरदाजानीं कमावीसदारास लिहून पाठविलें आहे कीं, जाहाजावर इंगरेजांचे लोक दस्तगीर जाहले आहेत. त्यापैकी च्यार पांच माणसें हुशयार जें असतील त्यांस पुण्यास पाठऊन देणें म्हणजे यांचे जुबानीं विलायतचें वर्तमान काय याचा शोध घेऊं.

———

२

पुरवणी अखबार छ ४ शाबान सन ११९५ हिजरी.

माहदाजी सिंद्याकडील पत्रें छ २ माहे मा।रीं कारपरदाजास आलीं. मा।र लिहिला होता कीं, सिपरीकोल्हारसेसमीप जमीन काली व पर्जन्याकरितां चिखल फार जाहला आहे. रसद लौकर येत नांहीं, याकरितां गिरानी फार व घोडीं वगैरे जनावरास चारा बिलकुल मिळत नांही. सबब, काळाबाग सरायेसमीप छावणीस जातों. इंगरेजांची पलटणें सिपरीकोलारसचे सरहदेंत आहेत.

खंडोजी भोंसले आखर रजब नागपुरास येणार होते, आले असतील. दिवाकरपंत व मुधोजी भोंसले काबूची व जाहीरा दोस्त व बातनचे दुष्मन आहेत. याप्रमाणें कारपरदाजांचे चितांत संशय आला आहे.

गणेशपंत बहिरे नसरतपुरासमीप तीनसे स्वारानसीं आहेत. भापकरासमीप हजारपर्यंत स्वार आहेत. उभयतां येकत्र होणार म्हणोन भापकराचे वकीलाचे जुबानीं यैकिलें. पुरुषोतमराव हिंगणें पंतप्रधानांचे तरफेनें दिलींत वकील आहेत. पंत मा।र यमुनेस स्नानास गेले होते. तेथें गाड्यांसी खानाजंगी जाहली. तलवारीच्या च्यार जखमा पुरुषोतमराव वकीलास लागल्या आहेत म्हणोन वर्तमान आलें.

शाहज्याहनाबादेंत गुंडे वगैरे शरीर लोकांचा हंगामा फार जाहला आहे. हरयेक बाजार व पुऱ्यांत लोकास लुटितात व मारितात. शंभर पनास माणुस मुतफिक होऊन हर कोठें जातात. दाहा पांच माणसास नि:संशय जाण्याविषईं प्रवृती होत नांहीं. शहरचे बंदोबस्ताविषईं बादशाहानीं नजफअलीखानास ताकीद फार केली आहे म्हणोन येथें अखबार दिलीची आली.

प्रतिवार्षिक श्रावणाचे दक्षणेस छ १ शाबानापासून आरंभ जाहला आहे. लाख रुपये दक्षणेचा संकल्प केला आहे. हे विनती.

पै।। छ ११ माहे शाबान संन ११९५ हिजरी, रोज गुरुवार डांकेवर.

---

**A. R No. 74.**

५ शाबान ११९५ हिजरी
२७ जुलै १७८१

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. यथील कुशल ता।। छ ५ माहे शाबान मु।। पुणे. स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणोन स्वानद लेखन आज्ञा करीत असिले प।।. विशेष. यथील वर्तमान छ १ माहे मा।र रोज सोमवारी प्राथकाली विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाना केले. ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर, येथील वर्तमान हिदुस्तानप्राती सिद्यासी व इग्रजासी लडाई जाली. सिद्याकडील तीन च्यारसे मणुश जाया जाले यैसे वर्तमान आले. शृत होये. सटोजी भोसले वगैरे यानी दुर्गोजी भापकरासी लडाई करून सोनगडाकडे गेले. हे वर्तमान पूर्वीचे येक दोन विनंतीपत्री लेखन केले होते. त्याजवरून ध्यानास आले असेल. रा। सटोजी भोसले वगैरे व गुलज्यारखान व तीन च्यार पलटने येकत्र होऊन कोडाईबारीकडे येणार यैसे वर्तमान आहे. त्यास रा।। गनेशपंत बेहेरे येथे येणार होते. त्यास पत्रे गेली की, तुम्ही इकडे न येणे. कोडाईबारीकडे जाणे. कारन की, तिकडे सटोजी भोसले व गुलज्यारखान वगैरे येकत्र होऊन उपद्रव करनार. याअर्थी तिकडे जाणे. त्याजवरून गनेशपंत कोडाईबारीकडे जाणार. प्रस्तुत गनेशपंत बेहेरे खानदेशात कासारबारीजवल आहेत. तेथून कोडाईबारी पनास साठ कोस आहे. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. उपरातिक नाना व हरीपंत व कृष्णरावजी याचा खिलवत जाला. खिलवताचा भाव यैकिल्यात आला की, कृष्णराव-जीची रवानगी येुज्यमानसाहेबाकडे होते. शृत होये. छ २ माहे मा।र रोज मगलवार राजश्री चितो विठल कैदेत आहेत. त्यानी आपले

हाते सेडी उपडून फकीरीचे रूप घेतलें आहे. त्यास कारभाऱ्याचें मानस आहे की, त्याजपासून लाख रुपये घेऊन जामीन घेऊन पुन्यात ठेवावे. यैसा जाबसाल लागला आहे. येक दोन ग्रहस्तही त्याचे मध्यस्तीस पडले आहेत की, त्याजपासू(न) लक्ष रुपये घेऊन त्याची वतने वगैरे सोडावी. ते पुन्यात स्वस्त राहतील. यैसी रदबदली आहे. मग निश्चये होऊन जमल्यास लेंखन केले जाईल. शृत होये. राजश्री मानाजी फाकडे सटोजी भोसले यासमागमे गेले नाहीत. फाकडे म॥र यानी दोनसे स्वार मेलवून तुलजापुराकडे दहा वीस कोसी खूल केले यैसे वर्तमान आहे. त्याचे पारपत्यास मुढे वगैरे याची पागा पाचसातसे स्वाराची पाठविंणार. शृत होये. हैदर नायेकासी व इग्रजासी लडाई आहे. नाईक म॥र यास पत्रे पाठविली की, इग्रजाचे पारपत्य येथास्थित करावे. बहुत ममतापूर्वक नायेकास पत्रे लिहितात. पत्रे वरचेवर त्यास पाठवितात. शृत होये. छ ३ रोज बुधवार बेदर वगैरे येथील सरकारचे आमिलानी याचे कमाविसदार उठून दिल्हे . कारन की, तहाचा फडच्या होत नाही. कमाविसदार वगैरे उठून आले, म्हणोन कारभारी वगैरे आपले ठिकानी बहुत विशमता वाटून आहेत. नानाप्रकारे तर्क करितात. प्रस्तुत कृष्णरावजीची रवानगी येज्यमानसाहेबाकडे होनार, यैसा निश्चये आहे. दुसरे येज्यमानसाहेबाचाही इनायेतनामा रावजीस येण्यावशाइ आला यैसे वर्तमान यैकतो. त्याजवरून रावजीची रवानगी येज्यमानसाहेबाकडे सत्वरच होनार. रवाना जालियावर लेखन केले जाईल. शृत होये. येथे बहुमुखी वर्तमान आहे की, येज्यमानसाहेबाचा व याचा स्नेहे असता, याजकडील कमाविसदार वगैरे सरकारचे तालुक्यातून उठून आले. तस्मात काही येक स्नेहात अतर पडले. पुढे विपरीत आहे. यैसी वदंता. विशेष यैकिले वर्तमान सेवेसी लिहिले असे. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. उपरातिक नाना व हरीपंत व कृष्णरावजी याचा खिलवत जाला. खिलवताचा भाव यैकिल्यात आला की, रावजीचे रवानगीचा व दुसरे आपले कितीक दौलतीचे

बदोबस्ताविशई जाला. शृत होये. छ ४ माहे मार रोज गुरूवार. इग्रज कल्यानीस व ममईस सरजाम वगैर भारी करितात. रमजानचें महिन्यात ते इकडे येणार यैसी वदता विशेष, त्याजवरून कारभारी श्रावन वद्य ५ पचमीस डेरे बाहेर करनार. फौजेचे लोकास तमाम पत्रे पाठवितात की, सत्वर जमा व्हावे. डेरे वगैरे बाहेर करून पुढे इग्रजाचे पारपत्याची मसलत सत्वरच करणार. शृत होये. नजीबखान यासी व इग्रजासी लडाई होती. नजीबखान यानी काहीयेक इग्रज सिकस्त केले. प्रस्तुत नजीबखान वगैरे दिलीस आले यैसे वर्तमान आहे. येथून श्रीमताची व कारभाऱ्याची पत्रे नजीबखानास बहुत ममतापूर्वक जातात. दुसरे इग्रजाचे पारपत्य येथास्थित करावे, या अनवये स्नेहाची पत्रे लिहिली आहेत. येका दो दिवसा पत्रे नजीबखानाकडे रवाना होणार. शृत होयें. ब्राह्मनाचा समारंभ परवतीस जाला आहे. दो प्रहरानतर राजेश्री नाना व हरीपंत वगैरे दक्षना वाटावयास परवतीस गेले. आज रात्रौ दक्षना होऊन उदईक सध्याकालपावेतो दक्षना होऊन ब्राह्मन सुटतील. पचवीस तीस हजार ब्राह्मन मिलाला आहे. चागला वैदिक ब्राह्मन त्यास पाच च्यार रुपये देतात. मग सरासरे येक दोन तीन या धाऱ्याप्रमाणे दक्षना देतात. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. सदैव अज्ञापत्री सेवकाचा साभाल होत असावा. सर्वस्वे दासाणुदास स्वामीचा असे. बहुत काये लिहिणे. कृपालोभ कीजे, हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 75**   ७ शाबान ११९५ हिजरी<br>२९ जुलै १७८१

पै।। छ १५ माहे शाबान सोमवार सन ११९५ हिजरी पावले. दोन प्रहर दिवस मैं डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हयपतराव गोपाळ सां। नमस्कार विनती उपरि. येथील

वर्तमान त।। छ ७ शाबान श्रावण शुद्ध नवमी रविवारपर्यंत मो पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. पूर्वीं छ ४ पर्यंत अखबार लिहून छ ५ माहे म।।रीं डांकेवर रवाना केली, ते सेवेसी पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. राजश्री कृष्टणरावजीनी बमोजिब व रूप इनायतनामा हुजूर येण्याविषईं राजश्री बाळाजीपंत नाना यांचे सलाह व इस्तसवाबेनें निश्चय केला. व माघाहून हुजूरचे इनायतनाम्याचा दरजवाब अर्जी व पत्रें, राव मशारनुलेकडील हुजूर व नवाब मोइनुदौला बहादरांस व स्वामीस हस्तगत करून, सेवेसी रवाना करितों म्हणोन पूर्वीं पत्र पाठविलें त्यांत विंनती लिहिली होती. सांप्रत राव म।।रनुलेकडील अर्जी हुजूर व नवाब मोइनुदौला बहादर यांस फारसी पत्र व स्वामीस हिंदवी पत्र व रा गोविंदराव भगवंत याचे पत्राचें उतर प्राप्त जाहलें, तें चिरंजीव राजेश्री रघोतमराव यांचे नांवचा लिफाफा सेवसी पाठविला आहे, त्यांत मलफूफ करून समग्र पत्रें सेवेसी पाठविलीं आहेंत. चिरंजीव सेवेसी पावतीं करतील. यत्किंचित अखबार पृथकपत्रीं लिहिली आहे त्यावरून सेवेसी श्रुत होईल. रा कृष्टणरावजीचे प्रयाण मुहूर्ताचा अद्यापि निश्चय जाहला नांहीं. निश्चयानंतर सेवेसी सूचना करीन. साल म।।रीं चौथाईचा अमल मामलतदारांस न द्यावा. व तह जाहल्यानंतर अमल ज्यारी होईल. व येविषयीं हुजूरीहून हरयेक माहलाचे जागिरदार व आमिलास ताकीद जाहली आहे. या प्रकरणीं कृष्टणराव बलाळ यानीं सेवकास सांगितलें कीं, पंतप्रधानाचें तरफेनें हुजूरचे ज्वाबसालाची मध्यस्ती आम्हांकडें असतां चौथाईची मामलत हुजूरीहून बंद जाहली. याची इतिला आम्हांस न होतां बंदी जाहली हा सांप्रदाय पूर्वीपासून नांहीं. सांप्रत आम्हीं हुजूर जातों. श्रीकृपेकरून सर्व बंदोबस्त होईल. चौथाईचे अमलाची मोकलीक पेशज आमचे गेल्याचे जाहलियां, येथील कारपरदाजांस खुशनुमा दिसले. मीं उतर केले कीं साहा वर्षापासून मामलतीचा फैसला होत नांहीं व हुजूरीहून तऱ्हेच दिधली. साल म।।रीं बंदी करविली आहे.

याची मोकलीक तुम्हीं हुजूर गेल्यावितरिक्त होणार नांहीं. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

श्रीनिवास

पुरवणी पत्र. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनती उपरि. कृपा पत्र छ २४ रजबचें डांकेवर पाठविलें तें छ ५ शाबानीं पावलें व लेखनार्थ मनन् केला. चिरंजीव राजश्री रघोतमराव सेवेसी येऊन राजश्री कृष्टणरावजी हुजूर येण्याची आरजू चितापासून ठेवितात व इनायतनामा सादर जाहलियां येतील, या अन्वयें हुजूर अर्ज केला. व मीं सदैव रावजीचे सूचनेनुरूप हुजूर अर्जींत लिहीत होतों त्याप्रमाणें अज राहनवाजिश हुजूरीहून सरफराजी होऊन इनायतनामा सादर जाहला. याउपरि राव म॥रनुलेनीं कांहीं संशय न करितां सत्वर यांवें. याप्रमाणें हुजूरचे इरशादेप्रमाणें स्वामीनी व चिरजीव रघोतमराव यानीं लिहिलें होतें. त्याची पूर्ती रावजी हुजूर येतील तें समईं होईल. परंतु रावजीनीं बालाजीपंताचे विचारानें हुजूर जावयाचा निश्चय करून अर्जी लिहून दिधली. त्याअर्थीं मध्यस्ताकडील गुंता राहिला नांहीं. सारांश, हुजूर आल्यावितरिक्त याजला उपाय नांहीं. चौथाईची मामलत न द्यावी येविषईं हुजूरीहून आमिल व जागीरदारास ताकीद जाहली आहे. याजवरून समग्र पुण्यांतील लोकानीं निश्चय केला आहे कीं, हुजूरचा व पंतप्रधानाचा बिगाड जाहला. याची चर्चा फार जाहली आहे. याचा परिहार होऊन पंतप्रधानांची परवरश हुजूर मंजूर आहे. त्याचीच शोहरत सर्वत्र असावी. व इंगरेजांची तंबी करण्यांतच दौलतेची कायमी आहे. व हुजूरीहून तंबीचाच अज्म व्हावा येविषईची सलाह हुजूर अर्ज करावी, याकरितां रावजीचे चितांत बहुत इच्छा आहे. श्रीकृपेनें हे हुजूर आल्यानंतर यांचा खुलासा सर्व सेवेसी श्रुत होईल हे विनती.

पै।। छ १५ माहे शांबान सोमवार सन ११९५ हिजरी पावले. दोन प्रहर दिवस मै डांक सरकार.

---

श्रीनिवास

पुरवणी. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. नागपुरीहून पंतप्रधानाची जासूद जोडी अजी छ ७ शाबानीं अस्तमानीं आली. रा॰ दिवाकर पुरुषोतम यांस ज्वर येत होता. छ २३ रजब आषाढ वद्य दशमीस काळ जाहला म्हणोन वर्तमान आलें. श्रुत होय हे विनती. चिरजीवास व नवाब मुइनुदौलास चिठी लिहिली आहे ते चिरजीवास द्यावी हे विनती.

पै।। छ १५ माहे शाबान सोमवार सन ११९५ हिजरी पावले. दोन प्रहर दिवस, मै डांक सरकार.

---

पै।। छ १५ माहे शाबान सोमवार सन ११९५ हिजरी पावले. दोन प्रहर दिवस मै डांक सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें. अज इ।। छ ५ शाबान लगायत छ ७ माहे मा।।र सन ११९५ हिजरी रोज रविवार श्रावण शुध ९. करनल कूट महमुदी बंदराहून देवनामपटणास गेला. ते दिवसीं हैदरअलीखानांसीं व इंगरेजांसीं लढाई मातबर जाहली व तरफैन लोक जांया जाहले. माहादाजी सिंदे छावणीकरितां काळेबागासमीप येणार व खंडोजी भोंसले नागपुरास दाखल होणार होते. समीप आल्याचें वर्तमान वकीलाचे जुबानीं यैकिलें. सुवर्णदुर्गासमीप इंगरेजाकडील जहाज

सरजामसुधां तुफानांत आलें. तें सुवर्णदुर्गवाल्यानीं धरलें. तोफा वगैरे सरंजाम जाहाजांतील उतरवणार. या वितरिक्त अवांतर वर्तमानासहित पत्र पाठविलें तें डांकेवर दारोग्याचे विद्यमानें सेवेसी पावलें असेल. त्याउपरि यैकिलें व प्रत्यक्ष वर्तमान हुजूर व सेवेसी लिहिलें असे. हैदरअलीखानांची पत्रें कारपरदाजांस आलीं. त्यांचा म॥र इंगरेजांची पलटणें महमूद बंदराहून देवनामपटणास गेलीं व लढाई जाहली. हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत येथील कारपरदाजानीं प्रत्योतरें लिहून खान म॥राकडें रवाना केलीं. त्यांत म॥र लिहिला तो कृष्टणराव व इतर कारपरदाजांचे मुखें यैकिला नांहीं. कोण्हीं स्नेहितानीं सागितला. त्याप्रमाणें सेवेसी सूचनार्थ लिहिला असे कीं, नवाब बंदगानआलीनीं कृष्टणराव बलाळ यांस हुजूर पाठवून देणे म्हणोन इनायतनामा पाठविला आहे. त्यास इंगरेजांचा नकशा बंदगानआलीनीच ठराविला. व नकशाप्रमाणें मोहीमेचा अज्म होत नांहीं. सांप्रत दोन महिने पर्जन्यकाळाचे बाकी राहिले. पुढें दसऱ्यानंतर मोहीम रुबकार, बंदगानआलीची मसलहत कोणे प्रकारची, मोहीमेचा अज्म करीत आहेत किंवा नांहीं, याचा निश्चय कळला पाहिजे. कृष्टणराव बलाळ हुजूरचे जवाबसालाचे बानीकार. त्यांस पाठविल्यावितरिक्त हुजूरचे मर्जीमुबारकेचा खुलासा दरयाफ्त होणार नांहीं. याकरतां कृष्टणराव बलाळ यांस हुजूर रवाना करावयाचा सिधांत केला आहे. सत्वरच जातील. जंगी सरजामाची तयारी येथें होत आहे. व माहदाजी सिंद्याचे मदतीस पुन्हां फौज पाठवावयाची तजवीज केली आहे. व सिंदे म॥राकडील मुतसदी स्वारांचे निगाहदास्तीकरितां आला आहे. निगाहदास्त करीत आहे. याप्रमाणें वर्तमान लिहून खान म॥राकडें पत्रें पाठविली म्हणोन यैकिलें.

माहदाजी सिंदे काळेबागावर छावणीकरितां आले म्हणोन सिंद्याचे वकिलाचे जुबानीं यैकिलें. खंडोजी भोंसले नागपुरास पावले म्हणोन भोंसले म॥राचे वकीलानी सांगितलें.

बिरेवाडीस पंतप्रधानाकडील गाडदी गेले आहेत. ते त्याच जिल्यांत राहावे म्हणोन येथील कारपरदाजानीं तजवीज केली आहे. हबसियांची

२

पुरवणी अखबार. छ ७ शाबान सन ११९५ हिजरी.

जमीयत आली होती. ते पांचसात कोसाचे फासल्यानें आपले तालुकियांत आहे. बिरेवाडी व तळेंघोसांळयाहून जंजीरा बारा तेरा कोसाचे फासल्यानें आहे.

इंगरेजांकडील जहाज सुवर्णदुर्गासमीप धरलें आहे. याचा म॥र पूर्वील पत्रीं तपसीलवार लिहिला असे. जहाजावर जिनस पारचे व किराना वगैरे बहुत आहे. याचे चौकसीकरितां येथील कारपरदाजांचे तरफेनें हरीपंताचा पुतन्या मोरोपंत सुवर्णदुर्गास छ ६ माहे म॥रीं गेला आहे.

श्रावणमासची दक्षणा लाख रुपयेपर्यंत छ ५ माहे म॥रीं समाप्त जाहली. पंतप्रधानांची स्वारी सालगुदस्तां पर्वतीस गेली होती. सांप्रतही जावयाचा निश्चय होता. परंतु पंतप्रधानास किंचित हरारत येऊन प्रकृती अस्वस्थ जाहली व ज्वराचा बुखार. बारीक फुटकल्या कानन्याप्रमाणें अंगावर आल्या. या करितां स्वारी मवकूफ जाहली. श्रुत होय हे विनती.

पै॥ छ १५ माहे शाबान सोमवार सन ११९५ हिजरी पावले. दोन प्रहर दिवस, मै डांक सरकार.

**A. R. No. 76.** ८ शाबान ११९५ हिजरी

३० जुलै १७८१

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे यथील कुशल. ता॥ छ ८ माहें शाबान मु॥ क॥ पुणे. स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणोन

स्वानंद लेखन आज्ञा करीत असिले पाहिजे. विशष, यथील वर्तमान छ ६ माहे म॥र रोज शुकरवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले, ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर यथील वर्तमान परवतीस ब्राम्हनास दक्ष(णा) जाली. वीस हजार ब्राम्हन मिळाला होता. उतम ब्राम्हनास पाच सात रुपयें परियेत दक्षना जाली. मध्यमास दोन तीन येक रुपये या परियेत जाली. च्यार घटका रात्र परियेत दक्षना जाली. उपरातिक ब्राम्हन सुटले. दक्षना द्यावयास नाना व हरीपंत वगैरे बसले होते. शृत होये. ब्राम्हनाचे प्रदक्षेनेस श्रीमत आले नवते. कारन की श्रीमतास कांज्या निघाल्या आहेत. तीन च्यार दिवस जाले. आता श्रीमताचे कांज्यास उतार आहे. शृत होये. छ ६ रोज शनवार इग्रजाचे येक ज्याहज मातबर बदरातून माल भरून ममईस येत होते, त्या ज्याह(जा)सी व फरासीसाचे ज्याहजासी कोटे गाठ पडली. लडाई जाली. फरासीसाने ते इग्रजाचे ज्याहज हस्तगत केले, ते आपले बंदरास घेऊन आले. ते ज्याहज अकस्मात तेथून निघाले ते विजेदुर्गास श्रीमताचे तालुक्यात आले. ते विजेदुर्गवाल्यानी धरले. त्या जाहजात माल पउनेतीन लक्ष रुपये परितये आहे. पुतल्या वगैरे आहेत. यैसी वंदता आहे. कोन्ही म्हनतात की लाख़ पनास हजार रुपयाचा माल आहे. यैसे वर्तमान येथे आले आहे. तहकीक वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होयें. बेदर वगैरे सरकारचे तालुक्यातून याजकडील कमाविसदार उठून आले. त्याजवरून येथील लहान मोठे ग्रहस्त अफवाई वर्तमान विरूधाचे बोलतात. शृत होये. राजश्री कृष्णरावजीचा येज्यमानसाहेबाकडे यावयाचा निश्चये जाला आहे. माहे म॥री श्रावनी पूर्णिमा जालिया अलीकडे पलीकडे मोहर्त करून निघनार, यैसे वर्तमान आहे. निश्चये होऊन मोहर्त करून रावजी निघाल्यास लेखन केले जाईल. शृत होये. राजश्री नाना व हरीपंत व कृष्णरावजी याचा खिलवत जाला. भाव यैकिल्यात आला की रावजीची रवानगी येज्यमानसाहेबाकडे सत्वरच करावी. दुसरे इग्रजाचे पारपत्याविशई मसलत करून सत्वर

स्वारीचा उद्वोग करावा, आनीक कितिक आपले दौलतीचा बदोबस्त करावा या अनवये खिलवत जाला. यैसे यैकिल्यात आले. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. शृत होये. छ ७ रोज रविवार इग्रज ममईस व कल्यानीस सरजाम करून तयार जाले आहेत. रमजानचे महिन्यात इकडे उद्वोग करनार, यैसे वर्तमान आले आहे. शृत होये. राज(श्री) कृष्णरावजी दरबारास गेले होते. नानासी व रावजीसी च्यार घटका खिलवत जाला. उपरातिक रावजी आपले घरास आले. शृत होये. विजेदुर्गाकडे इग्रजाचे ज्याहज सापडले. त्याजवर माल साहा पाच लक्षाचा आहे. यैसे वर्तमान आहे. त्याजवरून तेथे पाच च्यारसे गारदी व काही कामाठी वगैरे पाठविणार, यैसे वर्तमान आहे. गारदी वगैरे पाठविल्यास लेखन केले जाईल. शृत हाये. श्रावन वद्य पक्षी पचमीस याचे डेरे बाहेर होणार. पुढे इग्रजाचे स्वारीचा उद्वोग करणार शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास आलिया लेखन केले जाईल. बहुत काय लिहिणे कृपा लोभ कीजे, हे विज्ञाप्ती. छ २४ माहे रजबचे आज्ञापत्र डाकेसमागमे सादर केले ते छ ५ माहे म।।री सेवकास पावले. पावोन संतोश जाला. सदैव आज्ञापत्रे सादर होत असावी हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 77.** ९ शाबान ११९५ हिजरी

३१ जुलै १७८१

पै।। छ २३ माहे शाबान मंगळवार सन ११९५ हिजरी पावले. दोन प्रहर मै जोडी तैनाती राये हैबतराव.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. यथील कुशल त।। छ माहे शाबान मु।। क।। पुणे स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानद लेखन आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष . येथील वर्तमान छ ८ माहे

म॥र रोज सोमवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचेडाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर, यथील वर्तमान. राजश्री देवाजीपंत दिवान भोसल्याचे, त्यास तीन च्यार दिवस ज्वर येऊन शात जाले, यैसे वर्तमान नागपुराहून येथे आले. चागला व शाहाना मणुश होता म्हणोन दोन घटका कारभारी त्याचा स्तव करीत होते. शृत होये. सरदेशमुखी वगैरेचे तहास व कितीक राजकारनाचे कामाचे बदोबस्तास राजश्री कृष्णराव-जीस येज्यमानसाहेबाकडे पाठवावे यैसी यौज्यना जाली आहे. हे वर्तमान एक दोन विनंतीपत्री लेखन केले आहे. त्याजवरून ध्यानास आले असेल. त्यास राव म॥र दो चौ दिवसा मोहोर्त करून निघनार. हे मोहर्त टलले तर आखर श्रावनमासी माहे म॥री निघनार यैसे वर्तमान आहे. मग कोनत्या मोहर्ते राव म॥र निघतील हे वर्तमान सेवेसी लेखन केले जाईल. शृत होये. पंचमाहाल वगैरे निर्मल प्राताचा सरदेशमुखी वगैरेचा पैका राहिला आहे. व सुरलीत पैका येत नाही म्हणौन त्या प्रातात फौज रवाना करावी. चागला मातबर सरदार यौजून पाठवावा यैसी यौज्यना करितात. त्यास र॥ विसाजी कृष्ण यासी पैगाम केला की, तुम्ही हिदुस्तान प्राती पनास साठ हजार फौज नेऊन तिकडील बदोब(स्त) केला. सर्वास जरबेत आनिले. प्रस्तुत तुम्ही फौज ठेऊन पचमाहाल वगैरे निर्मल प्रात इकडे जाऊन बदोबस्त करावा यैसा पैगाम केला. व नानाही समक्ष विसाजीपंतास सागितले. त्याजवरून विसाजीपतानी उतर केले की, हिदुस्तान प्राती जाऊन सर्व बदोबस्त केला, सिदे होलकर यास जरब देऊन पैका घेतला, सरकार काम येथास्थित केले. यैसे असता आम्हाकडे नानाप्रकारे दोश लाऊन पैका घेतला, योग्य ते सहन केली, असो. जे जाले ते उतमच जाले. प्रस्तुत फौज ठेऊन पंचमाहाल वगैरेकडे जा म्हनता. त्यास आमचे म्हातारपन जाले. चाकरी होत नाही. स्नानसध्या करून श्रीमताचे कल्यान इछितो. हे कामास अनीक कोन्हास सागावे. यैसे उतर प्रस्तुत त्यानी केले. त्याजवरून राजश्री नागोराम पागे यासमागमे पाच च्यार हजार

फौजेची नेमणूक करून पंचमाल वगैरे या प्रातात पाठवावे यैसी यौज्यना करितात. निश्चये होऊन नागोराम याची रवानगी जालिया लेखन केले जाईल. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. विदित होये. छ ९ रोज मगलवार इग्रजाचे ज्याहाज येक ममईस जात होते. ते ज्याज फरासीसानी धरले. ते ज्याहाज तुफानामुले तेथून निघाले. ते याचे तालुक्यात विजेदुर्गास लागले. त्याजवर माल फार होता. हे वर्तमान पूर्वी लेखन केले होते. त्यावजरून शृत जाले असेल. त्यास ते ज्याहाज सवदागिरी होते. सवदागिरानी इग्र-जाचा कौल घेऊन त्याचे निशान ज्याहाजावर लाऊन येत होते. ते ज्याहाज फरासीसानी अटकाविले. ज्याहाजासी ज्याहाज बाधले होते. सवदागीराचे लोकानी ज्याहाजाचे रसे कापले. ते ज्याहाज तुफानामुले चालले. ते ज्याहाज सुवर्णदुर्गास श्रीमताचे तालुक्यास लागले. ते ज्याहाज यानी धरले. त्यात आठ नव लक्षा रुपयाचा माल सापडला. यैसे वर्तमान आले. शृत होये. इग्रज ममईस व कल्यानीस आहेत. सरजाम वगैरे भारी केला आहे. पुढे ते इकडे उद्वोग सत्वरच करनार. शृत होये. डाकेसमागमे दौ चौ दिवसाआड वरचेवर विनंतीपत्रे सेवेसी रवाना होतात. त्याजवरून सविस्तर वर्तमान शृत होत असेल. विदित होये. सेवकाचे जागीरीस गनेशपंत व खानदेशचे सुभेदार यानी उपद्रव देऊन गाव खराब केले. मन माने तैसा यैवज घेतला. येविषयीचे वर्तमान पूर्वी दोन तीन विनंतीपत्रीं अक्षरशाहा लेखन केले आहे. त्याजवरून ध्यानास आले असेल. येविशई सरकारचे इनायेतनामे कारभाऱ्यास व रावजीस व आपली पत्रे माझे साहित्याविशई आले पाहिजेत की याचे गाव खेड्यापासून गनेशपंत व खानदेशचे सुभेदार वगैरे यानी यैवज घेतला आहे तो माघारा देविला पाहिजे. व गावखेड्यास कोन्हाचा उपद्रव न होये. या अनवये इनायेतनामे व आपली पत्रे सादर जाली पाहिजेत. सर्व प्रकारे मजला त्राते आपले चरन आहेत. सर्व माझी लज्या स्वामीस आहे. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे, हे विज्ञाप्ती.

---

A. R. No. 78.

१० शाबान ११९५ हिजरी
१ आगस्ट १७८१

पै।। छ २३ माहे शाबांन मंगळवार पावले. दोन प्रहर दिवस सन ११९५ हिजरी, मै जोडी तैनाती सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान ता।। छ १० शाबान श्रावण शुध द्वादसी सौम्यवासर प्रथम प्रहरपर्यंत मो पुणें, क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. इकडील अखबारी वर्तमान छ ८ माहे म।।रपर्यंत डांकेवर रवाना केलें. तें पत्रें दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीस पावलीं असतील. राजश्री कृष्टणरावजीस इनायतनामा मुतजमनतलब हुजूर चिरंजीव राजश्री रघोतमराव स्वामीचे सेवेसी पावल्यानंतर चिरंजीवाचा अर्ज हुजूरपिजीरा होऊन सादर जाहला. त्यावरून रावजीनीं राजश्री बाळाजीपंत नानाचे आज्ञेनुरूप हुजूर जावयाचा निश्चय करून, इनायतनाम्याचा जवाब हुजूर येतों म्हणोन, व नवाब मोईनुदौला बहादर व स्वामीचे पत्राचें उतर सेवकाचे स्वाधीन केलें तें चिरजीव राजश्री रघोतमराव यांचे लिफाफियांत मलफूफ करून स्वामीचे नांवचे लिफाफ्यांत चिरजीवाचा लखोटा घालून छ ८ शाबांनी डांकेवर पत्रें रवाना केलीं. तें दारोग्यानीं पावतीं केलीं असतील. या उपरि सुमुहूर्तें करून रावजी स्वार होऊन बारामतीचे मार्गें हुजूर येणार. चौथाईचा तह किंवा अमल ज्यारी होणें. जमीदाराचे लिहून दिधल्याप्रमाणें करार करून घ्यावा हें इकडील कारपरदाजाचें मानस नांहीं. हरयेक माहालांत खानावसुलाची रुजवात हजरत मगफरतमाब यांचे समईची पाऊन, त्याउपरि तह करार करावा हें यांचें मानस. चौथाई व सरदेशमुखीचे मामलतींत घासदाण्याची बाबत जमेस धरितात येविषईं येथें सेवकानें यांसी उतर प्रत्योतर बहुतवार केलें. परंतु घांसदाण्यासुधां समग्र बाबती

जमेस धराव्या लागतील यैसें म्हणता(त) . सेवटील प्रकार माधवराव व नारायणराव यांजपर्यंत जो अमल ज्या माहालांत चालला, त्याची रूजवात पाऊन, त्यापैकीं कमी करून, ज्यांत हुजूरचा नफा होय त्याप्रमाणें फैसला करावा येंविषईं नवाब मोईनुदौला बहादरानीं रावजीस पत्र पाठविलें. त्यांत दोन शकली लिहिल्या होत्या. त्या पैकीं, शकल दुयमीप्रमाणे, हुजूरचे पास मर्जीकरितां करार करावा लागेल म्हणोन कृष्टणरावजी बोलिले. व चौथाईचा तह मार्गाने हुजूरची किफायत होय. त्याप्रमाणे करण्यांत येईल म्हणोन रावजीचें बोलणें आहे. इंगरेजांचे मसलहतीचा निश्चय हुजूरीहून नकशा जाहला त्याप्रमाणेंच आमलांत यावा. व येंविषईं हुजूरचे तरफेनें ज्वाबसाल करणारास आपण लाजवाब करूं. खामखा आग्रह धरल्यास खावंद मुख्तार आहेत. दस्तायेवजी बोलण्यांत आम्हीं कायल होणार नांहीं. या प्र।। कृष्टणरावजी व गोविंदराव बोलत आहेत. इंगरेजांचे मसलहतींत जो करार हुजूरीहून जाहला, त्याचा इरशाद सांप्रत चिरजीव रघोतमराव यास जाहला. व साल गुदस्ता. (अपूर्ण)

---

**A. R. No. 79.** ११ शाबान ११९५ हिजरी
२ आगस्ट १७८१

पै।। छ १७ शाबान सन ११९५ हिजरी, सरकारच्या डाकेबराबर आले ते दारोगियाचे विद्यमाने पावले. गुरुवार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान त।। छ ११ शाबान श्रावण शुध त्रयोदसी गुरूवासरपर्यंत मा। पुणें, स्वामीचे कृपे करून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. पूर्वी छ ८ माहे म।।री हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र चिरजीव राजश्री रघोतमराव यांचे नांवचे लिफाफ्यासहित डांकेवर रवाना केलीं. तें दारोग्याचे विद्यमानें

पावलीं असतील. राजश्री कृष्टणराव बलाळ यांस इनायतनामा मुत-
जमनतलब हुजूरीहून आला होता. त्याचें प्रत्योतर अर्जी व नवाब
मोइनुदौला बहादर व स्वामीचे पत्राचीं उतरें राव म॥रनुलेकडील
चिरंजीवाचे लिफाफ्यांत पाठविलीं. तें चिरंजीवानीं सेवेसी पावती
केली असतील. उतम मुहूर्त पाहून रावजी हुजूर यावयाचे उदेशें
स्वार होणार. हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिले होतें. त्यास श्रावण
शुध व वद्य पक्षीं प्रमाण मुहूर्त चांगलें नांहीं. याकरितां भाद्रपदा
शुध त्रितीया बुधवार छ २ रमजानीं प्रयाण मुहूर्त निश्चय केला आहे.
सांप्रत कुटुंबासहित पुण्यांत आहेत. याकरितां दोन प्रकारची योजन
आहे. कुटुंबासहित बारामतीस गेले तरी श्रावण वद्य पक्षीं श्रीमंत
पंतप्रधान व कारभाऱ्यांपासून रूखसत घेऊन बारामतीस जांवें. व
छ २ रमजानीं बारामतीहून स्वार व्हांवें. किंवा, छ म॥रीं पुण्याहून
स्वार होऊन बारामतीचे मार्गें हवेलीस न जातां परस्परें जांवें. या
प्रकारची योजना आहे. कितेक मामलतदारानी बालाजीपंतास सुच-
विलें कीं, बेदर वगैरे माहालांत चौथ व सरदेशमुखीची
मामलत उगवत नांहीं व सांप्रत हुजूरीहून मामलतची बंदी
जाहली, हेंही वर्तमान आहे. याकरितां आम्हांस परवानगी देणें.
ज्याप्रमाणें कळेल त्या रीतीनें मामलत उगऊन घेऊ. बाळाजीपंतानीं
सर्वत्रांस सांगितलें आहे कीं, हुजूरीहून मामलत बंद जाहल्यास चिंता
नांहीं. मामलतीचे रुपये तुम्हास न आले तरी आम्हीं देऊं. व सां-
प्रत राजश्री कृष्टणराव बलाळ हुजूर जात आहेत. समग्र कामाचा
गुता उरकतील. राव म॥र हुजूरीहून परतोन आल्यानंतर तुमचा
बंदोबस्त करून देऊं. पुण्यांत लोकाचें जुबानीं बहुत करून चर्चा आहे
कीं, हुजूरीहून चौथाईची मामलत बंद जाहली. त्या अर्थीं पंतप्रधा-
नाचा व हुजूरचा श्नेह राहणार नांहीं. व मामलत उगवावयाकरितां
फौज जाईल. दरबारी या प्रकारची चर्चा. हा काळ किमपि नांहीं.
सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

पै।। छ १७ शाबान सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

अखबार पुणें. अज इ।। छ ८ शाबान लगायत छ ११ माहे म।।र, श्रावण शुध सन ११९५ हिजरी.

कृष्टणराव बलाळ यांस बमोजिब व रूप इनायतनामा हुजूर पाठवावयाची तजवीज केली आहे. हें वर्तमान पंतप्रधानांचे कारपरदाजानीं हैदरअलीखान यांस लिहून पाठविलें, व राव म।।र यानीं हुजूर जावयाचा निश्चय केला आहे. माहादाजी सिंदे काळेबागासमीप छावणीस आले. व खंडोजी भोंसले दोन तीन मजली नागपूरीहून आले होते. नागपूरास दाखल जाहले असतील. दिवाकर पुरुषोत्तम समाप्त जाहल्याचें वर्तमान नागपुरीहून आलें. या वितरिक्त अवांतर वर्तमान लिहून छ ८ माहे म।।रीं डांकेवर अखबार रवाना केली. ते हुजूर व सेवेसी पावली असेल, त्या उपरि जाहलें व यैकिलें वर्तमान दफेवार लिहिलें असे.

करनल गाडर व जनराल मुंबईकर, जंगी सरजाम दारू व गोळे वगैरे पनवेल व कल्याणीस, मुंबईहून पाठवीत आहेत म्हणोन येथील कारपरदाजास बातनी आली आहे.

पूर्वीं माहदाजी सिंद्यांसी व इंगरेजांसीं लढाई जाहली. हे खबर पेशजी लिहिली आहे. त्याच लढाइचें पुन्हां वर्तमान यैकिलें कीं उमरावगीर गोसांवी व आणखीं येक दोघें सरदार सिंद्याकडील लढाईंत कामास आले. सांप्रत इंगरेजांवर सिंदे गालिब नांहीत. परंतु गनिमाईचे युक्तीनें व कजाखी करून इंगरेजांचे रुखावर कायम व पशकदमी करून देत नांहींत.

दिवाकरपंत मेल्याचें वर्तमान यैकिल्यानंतर, येथील कारपरदाजानीं भवानी सिवरामाचे विद्यमानें, भवानी काळो व रघोजी भोंसले व

मुधोजी भोंसले यांस पत्रें पाठविलीं आहेंत. त्याचा म॥र तपसीलवार कळला नांहीं. खुलासा यैकिला कीं, दिवाकरपंत दुरंगी होते. सांप्रत तुम्हीं दूरअंदेश व साताऱ्याचे राज्याचे इष्टचिंतक आहांत. याकरितां, बगाल्याचे माहिमेस फौज मातबर पाठवावी. व पंतप्रधांनासी अकृत्रिम स्नेहानें वर्तत जांवें. यांत परस्परें स्नेहांची वृधी व राज्याची कायमी आहे.

हैदर नायकाचे लष्करांत इंगरेजांकडील हरकारे खुफिया आले होते. ते धरले गेले. त्याउपरि हरकाऱ्यानीं इंगरेजांकडील पत्रें सरसरी कोण्हीं येक सरदाराचे नांवचीं आणली होतीं तें दिधलीं. खोटीं पत्रें पाहून जासूदास बासाचा मार देऊन, नासिकच्छेद करून, लष्करबाहर करून दिधले म्हणोन कृष्टणरावजीचे मुखें वर्तमान यैकिलें.

मोतरम नामे फरासीस अदवनींत शुजाउलमुलक बहादरांसमीप होता. तेथें नोकरीचा बेबनाव जाहला. व पंतप्रधानांचे वकीलाचे मारफातीनें पंतप्रधानांचा कौल आणविला होता. सांप्रत छ १० माहे म॥रीं पुण्यास आला. समागमें जमीयत

| फरासीसनफर | बारचेजवान | शागीर्दपेशा वगैरे | घोडीं | उंट | याबू |
|---|---|---|---|---|---|
| १५ | ७५ | ५० | ६० | ६ | १० |

सदरहूप्रमाणें सरजाम सध्या आहे. माघाहून गोरे पंचेवीस व बारचे लोक दोनसें येणार म्हणोन यैकिलें.

———

पै॥ छ १७ शाबान सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

२

पुरवणी अखबार. छ ११ शाबान सन ११९५ हिजरी. मानाजी

फांकड्या उटनूर मांडव्यास आहे म्हणोन येथील कारभाऱ्यांस बातनी आली. त्यावरून पांडुरंग बाबूराव बारामतीकरास म॥रनुलेचे तंबीस पाठवावयाची तजवीज आहे. हें वर्तमान पूर्वी लिहिलें आहे. सांप्रत पांडुरंगराव याची पागा व गोविंदराव अनगळ व बळवंतराव मुंढे यास ताकीदपत्रें गेलीं आहेंत की मानाजीस दस्तगीर करून घेऊन येणें. म॥रनुले गेले म्हणोन यैकिलें.

इंगरेजांचें जाहाज तुफानांत वाहवलें तें सुवर्णदुर्गासमीप लागलें. व त्यांतील सरजाम काय याचे चौकसीस हरीपंताचे पुतने गेले हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत सुवर्णदुर्गीहून वर्तमान आलें कीं, जाहाजावर तोफा सुमार पांसष्ट व सरजाम बानात वगैरे दोन लाखाचे किमतीचा जाहला.

खंडेराव भोंसले नागपुरीहून दोन तीन मजली आल्याचें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत यैकिलें कीं, बिंबाजी भोंसले याची समजावीस करून खंडेराव भोंसल्यानी म॥रनुलेस आपले समागमें आणिलें आहे.

पंतप्रधानांची प्रकृती स्वस्थ जाहली. हरीपंत फडक्यास सुळां-करितां कांही येक स्वस्थता नांहीं.

---

**A. R. No. 80.** — १२ शाबान ११९५ हिजरी
३ आगस्ट १७८१

पै॥ छ २० माहे शाबान शनवार सन ११९५ हिजरी, दोन घटका रात्र, मै डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टांग नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान ता॥ छ शाबान श्रावण शुध पौर्णिमेपर्यंत क्षेम जाणून,

स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. छ म॥ रीं येथील अखबारेसहित पत्रें डाकवर रवाना केलीं. तें पाऊन सविस्तारें वर्तमान कळलें असेल. येशवंतराव नाईक निंबाळकर व मानाजी फांकडे वगैरेची तंबी पंतप्रधानांचे कारभाऱ्यानीं करावी. येविषईं, इकडील सूचने-नुरूप, हुजूरीहून इनायतनामे राजश्री बालाजीपंत व कृष्टणरावजीचे नांवें सादर जाहले होते. त्याचे जवाब उभयतानीं हुजूर अर्जी लिहून सेवकाचे स्वाधीन केली, ते सेवेसी पाठविली आहे. सेवकाचे अर्जीसहित हुजूर गुजरेल. राजश्री कृष्टणरावजी भाद्रपद शुध त्रितिया छ २ रमजानीं सुमुहूर्ते करून हुजूर यावयाकरितां रवाना होणार. हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिले आहे. सरंजामी जावयाची करीत आहेत. व हुजूर सत्वर जांवें हे उत्कंठा रावजीस बहुत आहे. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

**A. R. No. 81.**

१२ शाबान ११९५ हिजरी
३ आगस्ट १७८१

पै॥ छ १८ माहे शाबान सन ११९५ हिजरी रोज गुरुवार. मै डाक हजूर, संध्याकाळी.

श्रीशंकर

विनंती विज्ञापणा यैसीजे. येथील कुशल त॥ छ १२ माहे शाबान मु॥ क॥ पुने, स्वामीचे कृपावलोकने करून येथास्थित जाणोन, स्वानद लखनआज्ञा करीत असिले पाहिजे. विशष. येथील वर्तमान छ १० माहें म॥ रोज बुधवारीं प्राथःकाली विनंतीपत्र व हजुरात अर्जी व अखबार र॥ हयेबतरावं याचे तैनाती जोडीसमागमें सेवेसी रवाणा केले. ते पाऊन सविस्तर ध्याणास येईल. तदनंतर येथील वर्तमानं. राजेश्री देवाजीपंत दिवान भोसल्याचें यांस देव आज्ञा जालीं यैसे

वर्तमान नागपुराहून आले. देवाजीपंताचे मृत्यं पावल्याचे वर्तमान आले म्हणोन कारभारीं बहुत श्रमी जालें. दोन घटकां त्याची स्तवं करीत होते कीं, मणुश चांगला शाहाणां होता. याप्रमाणे स्तव करीत होते. श्रुत होये. राजेश्री विसाजी कृष्णं बिनिवालें यास कारभारी यानीं पैगांम केला. व समक्षंही बोलने जाले की, तुम्ही हिदुस्थानंप्रांती पणास हजार फौज घेऊन कामकाज केले, व सरदारास वगैरे जरबां देऊन सरकारकात केले हे ज्यहनसीनं आहें. प्रस्तुत तुम्ही फौज ठेऊन पंचमाहलं व निर्मळ वगैरे या प्रांतांस जावें. कारन कीं, तिकडील आपलें मामलतीचा पैका मागील येणे व पुढील पैक्याचा निर्गम होये ते करावें. व बदोबस्त येथास्थित राहे ते करावें. याप्रमाने विसाजीपंतासी पैगाम केला व समक्ष सांगितलें. त्याजवरून विसाजीपंतानी उतर केंले कीं, आम्ही हिदुस्थानंप्रांती पनासं हजांर फौज घेऊन गेलो. सरकार चाकरी येथानशंत्या जाली, सिंदे व होंलकर यास जरब देऊन पैका घेतला, व तिकडे राजकारनें बहुत केलीं. सरकार काम बज्यावलें. यैसे असता आम्हांस पेचात आणोन पैका घेतला. यौग्ये ते सहन केलीं. सर्व गोष्टी जांल्या. प्रस्तुत आपनं म्हणता कीं, फौज वगैरे ठेऊन पंचमाहल वगैरे या तालुक्यात जावें, पैका घ्यावां, त्यास सरकार चाकरी करावी हे उचितच होयें. परंतु आमचे वृधांपकाल, चाकरीची शक्त राहिली नाही. आतां श्नान सध्या करून श्रीमंतास कल्यान इछून असावे, यांतच आमचे स्वरूप आहें. फौज वगैरें ठेऊन पंचमाहाल वगैरेंकडे जावयाचे काम दुसऱ्यास सांगावें. आमचे चाकरीचे दिवस नाहीत यैसे प्रस्तुत उतर साफ विसाजीपंतानी केले. विसाजीपंताकडील यैसे उतर जाल्यांवर, राजश्री नागोराम दि॥ पागा याची योजणा केली आहे कीं त्यासमागमें प्रस्तुत पांच च्यार हजार फौज देऊन पंचमाहालं व निर्मळ वगैरे या प्रांतास पैका वसूल करावयांस पाठवावें. यैसी नेमणूक करितांत. निश्चये होऊन नागोराम रवाणा जाल्यांस लखन केले जाईल. श्रुत होयें. राजश्री कृष्णरावजी याची रवाणंगी येजमानसाहेबाकडें करावयाचा निश्चये जाला. हें तीन च्यार विनंती-

पत्री लखन केले आहे. त्याजवरून ध्याणास आले असेल. त्यास राव म॥र छ १८ माहे म॥रीं रवाणां होंणार यैसे वर्तमान आहें. रवाणा जालियांस लखन केले जाईल. राव म॥र हजुरात येतात. जाबसालास बलं पडावें म्हणोन, नागोराम वगैरे याची रवाणगी फौजेसहित पंचमाहाल वगैरेकडे करणांर यैसे वर्तमान आहें. श्रुत होये. इंगरेजाचे ज्याहज ममईस येत होते. त्यासी व फरासीं-साचें ज्याहजासी गांठ पडोन लडाई जाली. ते ज्याहज त्याजपासोन सुटून सुवर्णदुर्गास श्रीमंताचे तालुक्यात आलें यानी धरलें. त्याजवरं मालं बहुत सापडला. हे वर्तमान पूर्वीचे विनंतीपत्री लखन होते. त्याजवरून ध्याणांस आले असेंल. त्यास ते ज्याहज संवदागिरी होते. संवदागिरानें इगरेजाचे निशान लाऊन ममईस जात होते. त्यासी व फरासीसाचें ज्याहजासी गांठ पडली. परसपरे लडाई जाली. संवदागिराचें ज्याहज तुफानामुले बहकले. ते सुवर्णदुर्गास श्रीमंताचे तालुक्यांत लागलें. सुवर्णदुर्गास हरीपंताचे ठाणे होते, त्यानी ते ज्याहज धरले. ज्याहाजात दाहा लक्ष रुपयेची मता सापडलीं. वींस पचवीस तोफा होत्या. वंदता आहे कीं, ज्याहाजात माल बहुतच होता. परंतु दाहा लक्ष रुपयेचे वित सापडले यैसी वंदता आहें. त्यापैकी पांच च्यार लक्ष रुपयेच्या पुतल्या वगैरे होत्या. त्या येथे आणिल्यां. यैसे वर्तमान आहें. श्रत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकीं वगैरे कामाकाज जालें. श्रुत होयें. छ ११ माहे म॥र रोज गुरुवांर इगरेजानी ममईस व कल्यानींस भारी सरजाम केला आहे यैसी वदंता आहें. रमजानंचे महि-नियात इकडे उद्योग करणांर यैसे वर्तमान आहें. कारभारियाचेही मानसं आहे की, माहे म॥रीं वद्यपक्षी डेरे बाहेर करावें. फौजा वगैरे जमा कराव्यां. तमाम लोकांस पत्रे वगैरे पाठवितात. श्रुत होयें. नवांब बसालतजंग बहादर याजपांसी अदोनीस फरासीस चाकार होता. तो फरासीसं वीसं पंचवीसं गोऱ्यानसीं, व पऊनसे आसी गांडदी, व सात उंट व चालीस पणासं मणुश शागीर्दपेशा, या सरंजामानसीं अदोनीहून येथें येऊन दाखल जालां. तोफखान्यात उतरला आहें, त्यास चाकर ठेवणांर. श्रुत होये. हेदर नाइकाचे पत्रे आली.

पत्रे वकीलानी कारभारियांस दिल्हीं. पत्राचे वर्तमान यैसे ऐकल्यात आले आहे कीं, इंगरेजानी सलुकाचा पैंगाम नाइक मं॥र यासी लाविला आहें. मागतीं येविसीचा शोध करूनं सेवसी लेखन केले जाईल. परंतु नाईक मं॥र याचें समत घेतल्यावाचोन संलुकाचा डौल करणांर नाह्री यैसेह्री येथे बोलतात. श्रुत होये. राजेश्री नाना व हरीपंत व कृष्णरावजी या त्रिवर्गाचा खलबत जाला. खलबताचा भाव यैकल्यात आला कीं, रावजीची रवाणंगी हजुरात करावी. दुसरे कितेक आपले दंवलतीचे बदोबस्ताविशई जाला. श्रुत होयें. श्रीमंतांस कांज्या निघाल्या होत्या. हे वर्तमान पूर्वी लखन केले होते. त्यास श्रीमंतास कांज्या निघोन आराम जालां. येथास्थित आहेत. श्रुत होयें. आंगऱ्याचे विद्यमानें, इग्रेजानी काही सूत्रं पैगामाचे याजकडे आले आहें यैसी वदंता आहे. परतु येंथील लोक तर्क करितात कीं, इग्रेज दगाबाजी करून सळूकाचे सूत्रं आंगऱ्याचे विद्यमाने याजकडे लावितो. ठीक नाही. यैसे वर्तमान आहें. यैकिले वर्तमान सेवेसी लेखन केले असें. तहकीक शोध लागल्यास खनल (लेखन) केले जाईलं. श्रुत होयें. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल, ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काय लिहिणे. कृपा लोभ कीजे, हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 82.** १५ शाबान ११९५ हिजरी
६ आगस्ट १७८१

पै॥छ २३ माहे शाबान मंगळवार सन ११९५ हिजरी साइंकाळ म जोडी डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सं॥ नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान ता॥ छ १५ शाबान श्रावण वद्य त्रितिया इंदुवासरपर्यंत, म॥ पुणें, क्षेम जाणून स्वकीय स्वानंद लेखनाज्ञा कली पाहिजे. विशेष

पूर्वीं छ १२ माहे म॥र पर्यंत येथील अखबार हुजूर व स्वामीचे सेवेसी लिहून डांकेवर पत्रें पाठविलीं तें दारोग्याचे विद्यमानें पावलीं असतील. सांप्रत यैकिलें वर्तमान तपसीलवार पृथकपत्रीं सविस्तारें लिहिलें आहे. त्यावरून सेवेसी श्रुत होईल. राजश्री कृष्टणराव बलाळ यानीं आपले डेरे वगैरे सरंजाम पुण्याहून बारामतीस आजी छ म॥रीं प्राथःकाळीं रवाना केले. छ २ रमजानीं राव म॥र निश्चयरूप पुण्याहून स्वार होऊन बारामतीचे मार्गें हुजूर येणार. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

**A. R. No. 83.** (पो.ता.) २३ शाबान ११९५ हिजरी
१४ आगस्ट १७८१

पै॥ छ २३ माहे शाबान मंगळवार सन ११९५ हिजरी साइंकाळ. मै डांक सरकार.

श्रीनिवास

पुरवणी पत्र. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी. विनती उपरि. सखाराम भगवंत यांसीं व फडनिसांसीं प्राचीन द्वेष व परस्परें चित्तशुद्धता नव्हती. वैकुंठवासी माधवराव यांनीं आपले उत्क्रमणसमईं, पंत म॥र शहाणे व अजमुदेकार, याकरितां, मदारुलमाहामी सांगून नारायणराव यांस सखारामपंताचे स्वाधीन केलें. सखारामपंतानीं नव महिन्यांत पनास साठ लाख रुपये खजाना करून, यैसीं लाख रुपये कर्ज, बाजीराव यांजपासून सावकारी देणें होतें, ते फैसल केलें. रघुनाथराव यांसहीं वैकुंठवासी माधवराव यानीं मुक्त केलें होतें. व इतिफाकानें वर्तणूक करावी हे वसीयत होती. याकरितां रघुनाथराव यांचें मनोधारण रक्षून पंत म॥र कारभार करीत होते. याची असाध्यता दुसरे कारभारी हरीपंत व फडनीस मंडलीस जाहली. व नारायणराव यांचे बुधींत विपर्यास घालून रघुनाथरायांस पुन्हा

कैद करविलें. त्याजमुळें नारायणराव मारले गेलें. व पंतप्रधानाचे दौलतीचा पाया खचला. त्याउपरि, रघुनाथराव सरदार मुख्तार जाहले. याची असाध्यता सखारामपंत व फडनीस व हरीपंत वगैरे समग्रास जाहली. याकरितां समदुःखी होऊन परस्परें यैक्यता केली. व हुजूरचा आश्रय करून, पंतप्रधानांची दौलत कायम करून, श्रीमंत माधवराव पंतप्रधान याची सरदारी स्थापली. परंतु, कारभाराचे ईर्षेकरितां परस्परें हरयेकांत चितशुद्धी राहिली नांहीं. हरीपंतानीं फौजेचे कामाची सरबराई करून लोकांस इजाफे करून सिपाही लोक आपले ममतेत आणिले. व माली कामाची यख्त्यारी राजश्री बालाजीपंतनानाकडें. यास्तव सखारामपंतांस असाध्यता जाहली. व हरीपंताची व सखारामपंतांची ज्यानीं दुषमनी प्रमाणें द्वेष वाहडला. परस्परें काबू पाहूं लागले. सखारामपंतानी मोरो बाबूराव व तुकोजी होलकरास यैक्यतेंत घेऊन, बालाजीपंत व हरीपंतास राजी करावयाचा उपाय करून, बालाजीपंतांस आपले जरबेंत आणिलें. हरीपंताची व फौजेची यैक्यता. याकरितां जाहीरा सिपाही लोकांनी सखारामपंतासी स्नेह दाखविला. परंतु, अंतरंगी वचनप्रमाण हरीपंतासी करून यैक्यतेनें होते. सखारामपंताचा सांप्रदाय दुषमनास आपले अंकित करून थोडीसी जरब दाखवावी, सर्वस्वें त्याचा नाश न करावा. याकरितां, बालाजीपंतास राखिलें. व फक्त फडनीसीचें काम बालाजीपंतानी करांवें, व फौजेचे काम मोरोपंतानीं, व सरदारी सखारामपंताकडें, हरीपंतानीं सर्वत्रांची ताबेदारी करावी, याप्रमाणें निश्चय जाहला. माली कामाचा यख्त्यार बालाजीपंताकडें पूर्वीपासून. याकरिता गड व किले समग्र बालाजीपंताचे यख्त्यारींत. व महादाजी सिंद्यांसी व सखारामपंतांसी पूर्वीपासून

२

पै।। छ २३ शाबान सन ११९५ हिजरी मंगळवार साइंकाळ. मै डांक सरकार.

पुरवणी पत्र. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी.

चितशुधता नांहीं. यास्तव बालाजीपंतानी सिंदे म॥रास पांच लाख रुपये नख्त व असेरचा किला व जागीर देऊन आपले यैक्यतेंत आणिलें. व काबू पाहून मोरो बाबूराव व बज्याबा पुरंदरे यांस कैद करून, पुढें पर्यायें करून सखारामपंतास कैद केलें. व घरची चीजबस्त व ठेव वगैरे माल मवेसी जे होती, ते जप्त करून सरका(र) दाखल केली. तेच दिवसीं जे शहाणे व दूर अंदेस लोक होते, त्यानीं निश्चय केला कीं, सखारामपंताचा मनसुबा कचा. याकरितां दुषमनास दुखऊन पुन्हां संरक्षण केलें. सखारामपंताचे सहस्रगुणेकरून हरीपंत व बालाजीपंत शाहाणे. सांप्रत सखारामपंतास कैद केलें. परंतु, आजीच समाप्त जाहले हा निश्चय करून कैदेंत ठेविलें आहे. सर्पास दुखऊन जिवंत सोडणें बुधिमंतांचें काम नांहीं. याकरितां बालाजीपंतानी व हरीपंतानीं जें केलें तें फार चांगलें. व पकी मसलहत आपले उपयोगाची जाणून केलें. सारांश, कांहीं दिवस सिंहगडावर पंत म॥र कैदेंत होते. त्याउपरि, कोंकंणांत प्रतापगडावर एक वर्षपर्यंत ठेविलें. तेथील आबहवा सखारामपंतास मानली. व कारपरदाजांनीं कैद केलें, परंतु जिवंत सखारामपंत आहे, कदाचित, कांही उपाये करून सुटला तरी अनर्थ करील. याविषईं चिंता व हृद्रोग रात्रंदिवस होता. याकरितां, कोंकणांत रायगड म्हणून किला रघुनाथराव गजरे बालाजीपंताचे शालक प्रथम संमधी त्यांचे स्वाधीन आहे. व त्या गडावर वासुदेवभट कर्वे व बाला दीक्षित कोण्ही शिष्ट ब्राम्हण यांस कैदेंत ठेविलें होतें. त्यांनी परलोकास प्रयाण केलें. व रायगडांत कैद केल्यास, सत्वरच स्वर्गास मनुष्य जातें. स्वर्गाचा मार्ग तें स्थळ जाणून, व सखारामपंतानी कैदेंत श्रम किती दिवस अनभवावे, याकरितां रायगडावर कैदेंत ठेविलें. पायांत बेडी अहोरात्र व कोठिडीस कुलफ व दरीचकार सेवेंत दोघें माणसें. येक शूद्र आंधळा व बहिरा, व येक ब्राम्हण मुका. सीतळोदकें करून स्नान व भक्षायास जखीऱ्याचे मोठे तांदूळ. याप्रमाणें सरजाम नेमून दिधला होता. दिवसेंदिवस क्षीण प्रक्रुती होती. श्रावण शुत्ध त्रयोदशी छ ११ शाबान गुरुवारीं सखाराम-

पंतानीं परलोकास प्रस्थान करून, शरीर त्याग रायगडचे किल्यावर केला म्हणून येथील कारपरदाजांस वर्तमान आलें, म्हणून खारिज यैकिलें. व कृष्टणराव बलाळ यानी सांगितलें त्याप्रमाणें हुजूर व स्वामीस लिहिलें असे. कृष्टणराव बलाळ यांनी जिवाजीपंतास वर्तमान लिहून डांकेवर आजीच छ मजकुरी प्राथःकालीं पत्रें रवाना केलीं. हैदरअलीखानाचे व इंगरेज कर्नल कूट याची लढाई महमूदबंदराहून देवनामपटणास जातां जाहली. त्या लढाईंत मीर रजाअलीखान हैदरखानाचा शालक ठार जाहला म्हणोन खारिज यैकिलें. वकीलांचे सांगण्यांत किंवा दरबारी तहकीक नांही. हे विनती.

श्रीनिवास

विनतीजे. गणेशपंत बहिरे चालीसगांव परगण्यांत फौजेसुधा येऊन घांस दाणा घेतो. याजविषई आजिमुद्दौला बहादरानीं नाना व रावजीस पत्र लिहिलें आहे कीं, ताकीद मा।रनुलेस पाठवावी. यांस ताकीद मागतों. माळुमाती पत्र देतील. श्रुत होय, हे विनती.

पै।। छ २३ माहे शाबान सन ११९५ हिजरी मंगळवार साइंकाळ. मै जोडी डांक सरकार.

---

**A. R. No. 84.**

१७ शाबान ११९५ हिजरी
८ आगस्ट १७८१

पै।। छ २६ माहे शाबांन सन ११९५ रो शुक्रवार दोन प्रहर, मै डांक सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें. अज इ।। छ १६ शाबान लगायत छ १७ माहे मा।र सन ११९५ हिजरी रोज बुधवार.

सुवर्णदुर्गासमीप जाहाज सांपडलें. त्यांत पांसष्ट तोफा व दोन लाख रुपयाचे जिनसाना पंतप्रधानाकडील कारकुनानीं तादाद करून घेतला. व दिवाकरपंत समाप्त जाहल्यानंतर पंतप्रधानांचे कारपरदाजानीं मुधोजी व रघोजी भोंसले यांस पत्रें पाठविलीं. मोतरम फरासीस अदवानीहून पुण्यास नौकरीचे इराद्यानें आला आहे. व रायगडावर कोंकणांत सखारामपंतास कैदेंत ठेविलें होतें. छ ११ माहे मा॥रीं पंत मा॥रनुलेचा काळ जाहला. या वितरिक्त अवांतर वर्तमानासहित छ १२ व छ १५ माहे मा॥रीं डांकेवर हुजूर अर्जी अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें. तें पाऊन, वर्तमान विदित जाहलें असेल. त्याउपरि प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान सेवेसी व हुजूर लिहिलें असे.

मुंबईकर जनराल व करनल गाडर यानीं कल्याणी व पनवेलींत आपली ठाणीं कायम करून चौकी ठेविली आहे. जंगी सरजाम दारुगोली वगैरे कल्याणी व पनवेलींस मुंबईहून आणीत आहेत. हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. पंतप्रधानांचे कारपरदाजांनी खुफिया बातनी करितां नवी सिंदा व हरकारे मुंबई व कल्याणीस पाठविले आहेत. मुंबईस बेपारी व सवदागर पुण्याहून गेल्यास इंगरेजांकडील मनाई येणार व जाणारास नांहीं. पंतप्रधानाचे कारपरदाजानी मनाई व तकयुद फार केली आहे. परंतु कांही जरूरी सरंजाम लागल्यास, बालाजीपंत आपले तरफेनें बोहरीयास माल खरीदी करून आणावयाकरितां मुंबईस पाठवीत आहेत. व माल खरीदी होऊन येतो. बोहरी वगैरे बेपारी यांचे जुबानीं कांहीं कांही वर्तमान मुंबईकडील कळत आहे.

हैदरअलीखानांसी व करनल कूट इंगरेजासीं महमूदीबंदरासमीप लढाई जाहली. त्या लढाईंत मीर रजाअलीखान नाईक मा॥रचा मेहुणा ठार जाहला. हें वर्तमान खारीज यैकिल्याप्रमाणें छ १६ शाबानचे अखबारेंत लिहिलें होतें. त्याउपरि रा॰ कृष्टणराव बलाळ यांस विचारिलें. राव मा॥रनुलेनीं सांगितलें कीं, हैदरअली

खानानी पत्रांत लिहिलें आहे कीं, लढाईंत मातबर बखशी कामास आला. व वकीलांचे जुबानीं याचप्रमाणें खबर. कडप्याहून पंतप्रधानाकडील वकीलानें बातनी खबर लिहून पाठविली. त्यांत मीर रजाअलीखान पडला म्हणोन लिहिलें होतें. माणसें दुतरफा मेलीं व जखमी जाहलीं. व हैदरअलीखानाची जिनसी पुलानी कूचाकरितां माघें राहिली होती. व इंगरेज तोफाची मार करीत होते. व खान मा।।र करोल व बारचे जवानसीं लढला. याकरितां लोक फा(र) जांया जाहले. व तीन कोस माघारा येऊन मुकाम केला त्या संधीत इंगरेज देवनामपटणास गेले. हैदरअलीखानाची जिनसी आल्यानंतर कूच करून, देवनामपटणापासून दोन कोसाचे फासल्यानें राहिला आहे. व खान मा।।र इंगरेजांवर गालिब आहे. याप्रमाणें राव मा।।र यांचे जुबानीं यैकिलें.

२

पुरवणी अखबार. छ १७ शाबान सन ११९५ हिजरी बुधवार. माहदाजी सिंद्यांची व इंगरेजांची सिपरीकोलारसासमीप लढाई जाहली व उमरावगिरी गोसांवी सरदार फौज सिंद्याकडील पडला व एक दोघें सरदार मातबर पडले. हें वर्तमान पूर्वीं लिहिलें आहे. त्याउपरि, सिंदे मा।।र काळेबागासमीप येऊन राहिले. छ १८ रजबची पत्रें सिंद्याचे लष्करीहून पंतप्रधानाचे वकीलाचीं आलीं. त्यांत मा।।र होता कीं, सिंदे सरजामासुधां काळेबागासमीप आहेत. राणेखान वगैरे दाहा पंधरा हजार फौजेनसीं शाहदौरा कसबा, काळेबागापासून सातआठ कोसीं आहे, तेथें आहेत. याप्रमाणें कलमी खबर आली. खारीज यैकतों कीं, शाहदौऱ्यासमीप इंगरेजांची पलटणें येऊन कायम जाहलीं आहेंत. व सिंद्यांचे फौजेवर इंगरेज गालिब आहेत. माहदाजी सिंदे यानीं येथील कारपरदाजास लिहिलें आहे कीं, इंगरेजांची पंधरा पलटणें जमीयत आहे. कासद वगैरेची जुबानीं दाहा पलटणें इंगरेजांचीं आहेंत. व कालपीसमीप च्यार पलटणें याहून विशेष जमीयत नांहीं. गोहदकर जाट दाहा हजार जमियतेनसीं इंगरेजास शरीक जाहला आहे. माहदाजी सिंद्यानीं येथील

कारपरदाजांस लिहिलें आहेजे. पंचेवीस हजार फौज आपले हमराह आहे. पुन्हां दाहा हजार नवनिगाहदास्ती जरूर पाहिजे. व निगाहदास्त करविली आहे. ते फौज शामील जाहल्यानंतर इंगरेजांची तंबी वाकई होईल.

रो कृष्टणराव बलाळ यानीं छ २ रमजानीं प्रयाग मुहूर्त नेमिला आहे. छ मा।रीं श्रीमंत पंतप्रधान व बालाजीपंतनानाचा निरोप घेऊन अंगप्रस्थान करणार. छ ३ तारखेस स्वार होऊन बारामतींत घरास न जातां बागांत येक मुकाम करणार. व तेथून दर कूच हुजूर जाण्याचा उद्योग करावयाप्रमाणें रावजीचें मुखें वर्तमान यैकिलें.

पंतप्रधान यांस राघोजी अंगरे यानीं जाहाजनुमा लहान किस्ती तयार करून पाठविली आहे. ते मुठा नदींत घालून नदीचे किनारा उभे राहून पंतप्रधान तमाशा पाहत असतेत. मानाजी फांकडे याचे तंबीकरितां पांडुरंग बाबूराव बारामतीवाले याची फौज व पागा पांचसे लोक गेले होतें. फांकडे मा।र जोगाईचे अंब्यास-मीप दोन तीनसे लोकानसी होता. पांडुरंगराव वगैरेची बातनी मानाजीस कळतांच बाहीरबुनगासुधां तयार होऊन लढाईस मुस्तैद जाहला. दुतरफा लोक ठार व घोडीं मेली. त्याउपरि,फांकडे मा।र पाठ देऊन पळोन गेला. बुनग्यापैकीं कांहीं उंट वगैरे सरजाम लूट सापडली. व वीस पंचवीस घोडी पाडाऊ आली. पांडुरंग बाबूराव वगैरेचे फौजेस तीस कोसाची दौड पडली. याकरितां ताकूब केला नांहीं. या प्र।। वर्तमान आलें. सदरहू लढाई छ १२ माहे मा।री आटली म्हणून यैकील. वासुदेवबावा मुतालिक प्रतिनिधीस कांही ज्वराची बाध होती. याकरितां आपले गांवाखाले होत. त्याचा काळ जाहला म्हणून वर्तमान आलें.

पै।। छ २६ शाबान सन ११९५ हिजरी शुक्रवार दोन प्रहर मै डांक सरकार.

---

पै।। छ २६ शाबान सन ११९५ हिजरी शुक्रवार. दोन प्रहर, मै डांक सरकार.

श्रीनिवास

श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी. विनतीजे. चिरंजीव राजेश्री रघोतमराव यांजसमागमें विनतीपत्र सेवेसी पाठविलें. त्यांत खाजगी काम सेवकाचे उपयोगी, व सरकारची नुकसानीं, व कदीम ज्यागीरीपैकीं मौजे मदनूर इनाम अलतगमा बाफरजंदा व अखबारनवीसीची खिदमत चिरंजीवावर बहाल बरकरार करावी. येविषई सेवकानें हुजूरअर्जी लिहून दिधली. व स्वामीनीं अर्ज करावा म्हणोन विनती लिहिली आहे. कृपा करून युक्तीनें आपण अर्ज करतील. मंजूर व कबूल करून सरफराजी करणें यखतियार खावंदाचा आहे. व हे विनती ल्याहावयाचें कारण हेंच. जे चिरजीव सेवा करावयांस अधिकारी जाहले व पांच वर्षे जाहली. येथील अखबारीचें काम व सुदैव राजद्वारास जाणें व उतर प्रत्योतर करणें या कामाची यखतियारी मजकडून चिरंजीवास आहें. माझी गुमास्तगिरी मुख्तारीनें त्यांजकडें आहे. यास्तव, हुजूरीहून सरफराजी व्हावी. यांत मीं फिदवी नोकर मवरूसीं आहें. चिरंजीवांची सरफराजी जाहलियां तेही खानजादींत दाखल होतील. खिदमत त्यांचे नांवें जाहलीच पाहिजें. याविषईंची विनती करावयाचें कारण, माझी शरीरप्रकृती फार अशक्त जाहली. व या खिदमतेस सदैव कमर बांधून दरबारी राहिले पाहिज. हे श्रम माझें चितापासून करावे यांत सादत परंतु शरीर स्वाधीन नांहीं. कदाचित, हुजूर अर्ज मंजूर नच होय त्यापक्षीं इस्ताफा लिहून देणें प्राप्त होईल. स्वामी प्राचीन मुरबी व कृपावंत आहेत. युक्तीनें अर्ज करतील. श्री स्वामी सहाय जाहलियां मनोदयानुरूप कार्य होईल. बहुत काय लिहिणें. कदाचित मर्जींत येईल कीं, कृष्टणराव बलाळ हुजूर येणार. ते आल्यानंतर त्या संधीत अर्ज करूं. त्यास हुजूरीहून सरफराजी होण्याविषईं कृष्टणराव यांजकडून सिफारस

करवणें. फार लघुत्व व यांचा उपकार घेण्याचें प्रयोजन सर्वथैव नांहीं. सेवक लोकानीं आपलें सरफराजीविषईं मुरब्याकडून अर्ज मारूज करावा. धण्यानी कृपा करून सरफराजी करावी. दुसऱ्याची सिफारश व साहित्य नसांवें. हाच मार्ग चांगला. व सांप्रतचे प्रसंगीची कृष्टणरावजी हुजूर येतात. यांत परस्परें स्नेहाची वृद्धी व्हावी व सर्व मजहले पुसावे किंवा काळहरणावर दृष्टी देऊन हुजूरचे मर्जीप्रमाणें यैकांवें व जे समईं काबूची संधी ध्यानास येईल ते समईं बिगाड करावा, यैसा यांचा मनसुबा आहे. मार्गानें चौथाईचा तह जाहलियां हे करितील. इंगरेजांसीं दारमदार. हैदर नायकाचे इतिल्यावितिरिक्त सर्वथैव हे करीत नांहींत. नाईक म॥राचे कबज्यात व तसरुफांत लाखों रुपयाचा मुलुक आला आहे. व इंगरेजांवर गालिब. त्या पक्षीं हैदरअलीखान सर्वथैव दारमदार करीत नांही. पंतप्रधानांचे कारभाऱ्यांस स्पष्ट उमजलें आहे कीं, इगरेज बदकवली व बदमामली. यांचे कौल कराराचा विश्वास नांहीं व सांप्रत हैदरअलीखान शरीक मसलहत जाहला आहे. व यासी कौल करार जाहला. त्यांत तफावत सवथैव न व्हावा. या अर्थीं, रावजी हुजूर आल्यानंतर हुजूरचे मर्जीमुबारकेप्रमाणें कार्यभाग होणें बहुत दुस्तर दिसतें. हे विनती.

---

**A. R. No. 85.**

१८ शाबान ११९५ हिजरी
९ आगस्ट १७८१

पै॥ छ २६ शाबान सन ११९५ हिजरी, शुक्रवार दोन प्रहर मै डांक सरकार.

श्री

विनंती विज्ञापणा यैसीजें. येथील कुशळ ता॥ छ १८ माहे शाबान, मु॥ पुनें स्वामीचे कृपावलोकने करून येथास्थित जाणोन

स्वानंद लखनआज्ञा करीत असिले पाहिजें. विशष .येथील वर्तमान छ १५ माहे म॥र रोज सोमवारी प्रहर रात्रं पूर्व जाता विनंतीपत्र सरकारचे डाकीसमागमें सेवेसी रवाणा केले ते पाऊन सविस्तर वर्तमान श्रुत जालें असेंल. तदंनतर येथील वर्तमान इग्रेजाचें जाहज सवदागिरी सुवर्णदुर्गास धरले म्हणोन इग्रेजाचे जाहजे लडाईस सुवर्णदुर्गास येणांर म्हणोन येथून दोन हजार गारदी किले म॥र याचें मदतीस जाणार. हे विनंतीपत्री पूर्वी लखन केले होते त्याजवरून श्रुत जाले असेल. त्यास येथून दोन हाजार गार्दी सुवर्णदुर्गास जातात. इग्रेजाचे सवंदागिरी जाहाज यानी धरले. त्यात दोन अडचा लक्षाची मता यांस सापडलीं.श्रुत होये. राजश्री सखारामपंतबापू छ ११ माहे म॥री कैदेत मृत्य पावलें. हे वर्तमान सविस्तार विनंतीपत्री लेखन केले होते त्याजवरून श्रुत जाले असेल. त्यांस सखारामपंत-बापू छ ११ माहे म॥री मृंत्य पावले यैसे वर्तमान येथे आलें, श्रुत होयें. राजश्री कृष्णराव याचा व नानाचा दोन तीन दिवस जालें नित्य खलवत होतो. खलवतीचा भाव यैकिल्यांत आला की, राव म॥र हजुरात येतात. हजूरचेही इनायेतनामें राव मं॥र यास आले की सत्वर यावें. त्याजवरून सत्वरच निघावे यैसे होते. प्रस्तुत यैकिल्यात आले कीं आठपधरा दिवस राहून आखर माहे मं॥री निघणांर. कारन कीं राव म॥रास हजुरांत पाठवावें यैसा निश्चयें जालां. तें समई या सलेचे पत्रे कारभारी यानी हैदर नाइकास लिहिले कीं, राव मं॥र यास हजुरात तहाचे कामाविसी वगैरे आणिख कितेक जाबसालाविसीं पाठवावे लागते येंसी पत्रे नाईक म॥रास लिहिले आहेंत. त्याचे उतराची मार्गप्रतिक्षा करितात. पत्रे जाऊन येक महिणा होत आला. रावजीचे निघावयाचें संधीसं नाईक म॥राचेही उतरे येतीलं यैसे आहे. राव मं॥र निघाल्यासं लेखन केले जाईल. श्रुत होये. राजश्री हरीपंतासं दोन तीन दिवसं जाले समाधान नाही म्हणोन नाना हरीपंताचे येथे आले होते.श्रुत होये. छ १६ माहे म॥र रोज मग-लवार.रो मानाजी फाकडे बालेघाटाकडे तुळजापूर प्रांताकडे तीन चारसे राऊत मेलवून खुल केले आहे. त्याचे पारपत्यास रो पाडुरंग

बाबूराव बारामतीकर याची पागा व आनीख मुढें वगैरे याची पागा यैसे हजार पाचसे राऊत रवाणा केलें यैसे वर्तमान आहें. दुसरें फाकडे मा।र यास कौलही पाठविला आहे की येणे. श्रुत होयें. वैजापूर व गांडापूर व पैठंण वगैरे माहलं सरकारचे आहेत. तेथे होलकराकडील फौज जाऊन उपद्रव करावां यैसे वर्तमान होते. हे पूर्वीही लेखन केले होते. प्रस्तुत वाफगांवाहून वर्तमान आले कीं, राजश्री पाराजीपंत होलकराकडील दोन हजांर फौजनसी वाफगावाहून निघोन वैजापूर वगैरे माहलाकडे जातात. कारन कीं माहलात उपद्रव करूंन यैवज घ्यावा. माहांलास रखना करावा याअर्थी पाराजीपत जातात यैसे वर्तमान आलें. होलकराचा आग्रह कारभाऱ्यापासीं फार होता कीं, पाराजीपंतास वैजापूर वगैरे या माहलात पाठवावें. प्रस्तुत पाराजीपंत दोन हजार फौजेनसी वैजापूर वगैरे माहलाकडे जातात यैसे वर्तमान आले. पाराजीपंत वगैरे सरकारचे माहलात जातात म्हणोन शहराहून नवाब अजमतदौला बाहदर डेरे देऊन बाहेर निघालें. फौज वगैरे ठेवितात यैसे वर्तमान आहे. मागती पाराजीपंत वगैरेकडील वर्तमान आल्यांस लखन केले जाईल. श्रुत होये. चतुर्थी म्हणोन नाना फडनीस थेऊरासं गनपंतीचे दर्शनास गेले होते. दंर्शन करून सध्याकांळी घरास आलें. श्रीमंतही गनपतीचे दर्शनासं वाडयाबाहेर आले होते. दर्शन करून मागती वाड्यात गेले. श्रुत होये. दरबार वगैरे जाला होता. उपरांतिक कृष्णरावजी व नाना याचा खलबत जाला. विदित होये. छ १७ रोज बुधवार इग्रेज कल्यानीसं व ममईस आहेत. सरजाम वगैरें त्यानी फांर केला आहे. प्रस्तुत वर्तमान आहे कीं इग्रेज कल्यानीहून च्यार कोंस पुढे आले. घाटाकडे येतात किंवा आणीख कोन्हीकडे जातात हे वर्तमान आलिया सेवेसी लखन केले जाईल. श्रुत होये. रा० सटवाजी भोसले वगैरे कोडांईबारी उतरोन घाटाखाले गेले. त्यानी काही जमाव करून कोंडाईबारीकडे येणांर. त्याजवरूंन राजेश्री गनेशपंत बेहरे यासआज्ञा केली की, तुम्ही कोडांईबारीकडे जाणे. त्यास गनेशपंत बेहरे कासारबारीखालें नसरथपूरांवर दोन

तीन हजार फौजेनसी होते. वर्तमान आले कीं, गनेशपंत नसरथपुराहून कूचं करुन कोंडाइंबारीकडे जातात. श्रुत होये. राजश्री नागोराम यासमागमें दोन तीन हाजार फौज देंऊन पंचमाहाल वगैरेकडे पाठवावे यैसी यौजणा आहें. श्रुत होये. राजश्री विसाजी कृष्णा बिनिवालें याचीही उभारनी करून त्यास फौज सांगावी यैसी यौजणा करितात परतुं विसाजीपंत कबूल करीत नाहीत यैसे आहे. मग येविसी काय जे होईल ते सेवेसी लखन केले जाईल. विदित होये. पुढे जे प्रसंगाचें वर्तमान ध्याणास येईल तें सेवेसी लेखन केले जाईल. विदित होयें. छ ९ माहे मं॥रचे आज्ञापत्र व छ २३ व छ २६ माहे रजबचे जवाबी इनायेतनामे दोन इनायतनामे व आज्ञापत्र सादर केले ते छ १६ माहे म॥री पावले. पाऊन बहुत संतोश जाला. संदैव याचप्रकारे इनायेतनामे व आज्ञापत्रे सादर करणार स्वामी समर्थ आहेत. सेवकाचे जागीरीचें खेड्यास श्रीमंताकडील सरदारानी व खांनदेशाचे सुभेदारानी उपद्रव करून येवज घेतला. येविसी सरकारचे इनायेतनामे कारभारी यांस व रावजीस पाठवावे म्हणोन विनंतीपत्री लखन केले होते. त्याजवरून कृपावंत होऊन आज्ञापत्री सादर केले कीं, लि॥ प्रा॰ इनायेतनामें कारभारी यांस व रावजीस सादर करून पाठऊ म्हणोन आज्ञापिलें. त्याजवरून बहुत संतोश जाला. सर्व प्रकारे माझा अभिमानं स्वामीस आहें. विदित होये. खांनदेशचे सुभेदारांस श्रीमंताचे पत्र होते कीं मोगलाईचे खेडचापासून सुभेपटी व दहकपटी न घेणे. यैसे असता धटाई करून सुभेपटीचा व दहकपटीचा यैवज घेतला. गनेशपंत बेहरे यानी दोन वेला गावची खंडनी करून यैवज घेतला. हे वर्तमान पूर्वी येक दोन विनंतीपत्री सेवसी लेखन केले आहे त्याजवरून श्रुत जाले असेंल. कारभारी यांस व रावजीस इनायेतनामे आले पाहिजेत कीं, खानदेशचे सुभेदारानी व गनेंशपंतानी यैवज घेतला असेल तो माघारे देवणे. याचे गावखेडयास कोन्ही उपद्रव न करी ते करावे. या अनवयें इनायेतनामे व स्वामीचे पत्रे आली पाहिजेंत. विदित होये. बहुत कायें लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 86.**

२२ शाबान ११९५ हिजरी
१३ आगस्ट १७८१

श्रीनिवास

अखबार पंतप्रधान अज इ॥ छ१८ गुरुवासर लगायत छ २२ माहे शाबान सन ११९५ हिजरी. पांडुरंग बाबूराव बारामतीवाले यांची फौज वगैरे मानाजी फांकडे याचे ताकुबास गेले होते. त्याची लढाई जोगाईचे अंब्यासमीप जाहली. परस्परें घोडीं व लोक जखमी व ठार जाहले व मानाजी जरीदा फरारी होऊन गेला. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें सेवेसी व हुजूर पाऊन वर्तमान कळलें असेल. त्यानंतर प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान दफेवार लिहिलें असे.

रघुनाथराव सुरतेहून च्यार कोसी तीन च्यारसे लोकानसीं उतरले आहेत. अमृतराव व बाजीरा(व) बरवे व सटवाजी भोंसले सुरतेहून आठ कोसाचे फासल्यानें हजार बारासें स्वारानसीं आहेत. स्वारांची निगाहदास्त करितात म्हणोन खारीज वर्तमान यैकिलें. पंतप्रधानांचे कारपरदाजांचे जुबानीं रघुनाथराव यांस कानांत कांहीं रोग जाहला आहे. त्यास्तव बहुत श्रमी. सुरतेहून तीन कोस नर्मदातीर अश्विनीकुमार तीर्थापासीं इंगरेजांचे परवानगीप्रमाणें आहेत. बाजीराव व सटवाजी भोंसले यांस इगरेजानीं सुरतेस यावयाची परवानगी दिधली नांहीं. याकरितां आठ दाहा कोसाचे फासल्यानें आहेत.

पांडुरंग बाबूराव यांचे तरफेचे त्र्यंबकराव व गोविदराव कृष्टण वगैरे मानाजी फांकडयाचे ताकुबास जे फौज गेली त्यां सरदारास माघारा फिरोन येणें म्हणोन पंतप्रधानाची आज्ञापत्रें छ म॥री रवाना जाहलीं. पागेचे सरदार व जागीरदार व हुजरातीचे कितेक सरदार रुखसत घेऊन घरास गेले आहेत. त्यांस ताकीदपत्रें रवाना जाहली कीं, सरंजामसुधां दसऱ्याकरितां पुण्यास येणें.

माहदाजी सिंदे व हैदरअलीखानाकडील ताजी खबर आली नांहीं.

पंतप्रधान छ म।।रीं पर्वतीस गेलें होते. वासुदेवबावा नि।। प्रतिनिधी आजारी आहे याकरितां पुण्याहून कऱ्हाडास गेला आहे. प्रतिनिधीचे पागेचे सरदारापैकीं वासुदेवबावा म्हणोन होता-तो मृत्यु पावला. हे खबर प्रतिनिधीचे लश्करांत आली व गोटगस्तीचे जासुदानी कारपरदाजास वासुदेवबावा मुतालिक मृत्यु पावला म्हणोन खबर सांगितली. ते प्रसिध्द जाहल्याप्रमाणें हुजूर अखबार लिहिली. त्यानंतर बालाजीपंतानी तहकीक खबर आणविली व निश्चय जाहला की, वासुदेवबावा मुतालिक प्रतिनिधी बहुत काहला परंतु जिवंत आहे. दुसरा कोण्हीं वासुदेवबावा पागेचा सरदार होता तो शांत जाहला.

हरीपंत फडक्यांची प्रकृती पोटदुखीकरितां स्वस्थ नव्हती. सांप्रत स्वस्थ आहे. बालाजीपंताचे घरास येत असतात.

बातनीकरितां खुफिया जासूद पुण्यांत होते ते छ १७ माहे म।।री येंक जोडी धरली. तहकीकात करतां रघुनाथराव यांचे तरफेचे म्हणतात. श्रुत होय, हे विनती.

पै।। छ २ माहे रमजाण सुमार्सन ११९५ हिजरी बुधवार दोन प्रहर मै डांक सरकार.

---

**A. R. No. 87.** २३ शाबान ११९५ हिजरी
१४ आगस्ट १७८१

पै।। छ २ रमजान सन ११९५ हिजरी बुधवार दोन प्रहर मै डांक सरकार.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. यथील कुशल त।। छ २३ माहे शाबान, मु।। पुणे स्वामीचे कृपावलो(कने) करून येथास्थित जाणौन स्वानद लेखनआज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष. येथील

वर्तमान छ १८ माहे मा।र, रोज गुरुवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर यथील वर्तमान राजश्री सखारामपंत बापू शात जाले, हे वर्तमान पूवी दोन विनंतीपत्रे सेवेसी रवाना केली त्यात सविस्तर लेखन होते, त्याजवरून ध्यानास आले असेल. सखारामपंतबापूचे क्रियेस पाचहजार रुो देऊन सरकारचा कारकून सासवडास पाठविला. सासवडास त्याचे उतरकार्य होते, शृत होये. सिदे कोल्हारसिप्रीवर छावनी करून राहिले. तेथून इग्रजही दाहा बारा कोसावर आहेत. त्या इग्रजासी व सिद्यासी लडाई आहे, शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. उपरातिक रावजीचा व नानाचा खिलवत जाला. भाव यैकिल्यात आला की, रावजीस येज्यमानसाहेबाकडे रवाना करावयाचा. त्यास राव मा।र भाद्रपद सुद ३ तृतीयेस मोहर्त करून निघना (र) यैसे वर्तमान आहे. निघाल्यास लेखन केले जाईल शृत होये. छ १९ माहे मा।र रोज शुकरवार, राजश्री मानाजी फाकडे यानी दोनतीनसे स्वार मेलऊन खूल केले होते. त्याचे पारपत्यास राजेश्री पाडुरंग बाबूराव बारामतीकर वगैरे याच्या पागा पाठविल्या होत्या. हे वर्तमान पूर्वी लेखन केले होते. त्यास मानाजी फाकडे पळून गेले. त्याजकडील दाहा पाच घोडी वगैरे याजकडील लोकानी पाडाऊ करून आनिली यैसे वर्तमान आले. फाकडे मा।र जोगाईच्या आब्याकडे पळून गेला. त्याचे पाठीमागे याजकडील लोक आहेत यैसे वर्तमान आहे, शृत होये. राजेश्री कृष्णरावजी दरबारास गेले होते. नानासी व रावजीसी खलवत जाला. राजश्री जिवाजीपताकडील पत्रे आली होती. पत्रे नानास रावजीने वाचून दाखविली. पत्राचा भाव यैकिल्यात आला की, जिवाजीपतानी रावजीस लिहिले आहे की, इकडे यावयाचा उद्वोग सत्वर करावा. त्याजवरून रावजीही श्रावनमास जाल्यानतर सत्वरच निघनार, शृत होये. छ २० माहे मा।र रोज शनवार इग्रज कल्यानीस व ममई (स) आहेत. सरजाम वगैरे फार केला आहे. पुढे ते सत्वरच उद्वोग

करनार. दुसरे वर्तमान आहे की, कोकनप्रांतीचे काही किले राहिले आहेत ते घेऊन उपरातिक घाटाकडे यावे, यैसा विच्यार इग्रजाचा आहे म्हणोन वर्तमान आहे. मग जे इग्रजाकडील वर्तमान यैकिल्यात येईल ते लेखन केले जाईल, शृत होये. राजश्री वासदेवबावा प्रतिनिधीकडील यास समाधान वाटत नाही. त्यास देवआज्ञा जाली यैसे वर्तमान आहे. तहकीक वर्तमान आलिया लेखन केले जाईल, शृत होये. राजश्री त्रिबकराव दीक्षित मातबर सावकार होते ते मृत्य पावले. त्याचे पोटी पुत्र नाही. पधरा वीस लक्षा रुपयाची जागा त्याचे पदरी आहे. मरतेसमई त्याने दोन तीन लक्ष रुपय वाटले, धर्म केला. प्रस्तुत त्याचे द्रव्याची चौकशी सरकारात केली. त्याचे स्त्रीस धर्मपुत्र देऊन त्यास लाख रुपय द्यावे. बाकीचे द्रव्य सरकारात घ्यावे. कारन की बैतल माल, यैसा निश्चये जाला, शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले, शृत होये. छ २१ रोज रविवार होलकराकडून रा। पाराजीपंत दोन हजार फौजेनसी वाफगावाहून वैजापूर वगैर माहलात जाऊन उपद्रव करनार यैसे वर्तमान आहे. होलकराचे मानस फार आहे की, सरकारचे तालुक्यास उपद्रव करावा यैसी वदंता आहे की, सरकारचे होलकराकडील येक दोन पागा वैजापूर वगैरेकडे गेल्या, यैसे वर्तमान आहे. मागती वर्तमान तहकीक यैकिल्यास लेखन केले जाईल. पाराजीपंत वगैरेही जाणार. गेल्याचे वर्तमान यैकिल्यास लेखन केले जाईल, शृत होये. रावजीस हजुरात पाठवावे म्हणौन कारभाऱ्यानी हैदर नायेकास लिहिले होते. त्यास नाईक म॥र याजकडून साडनीस्वारासमागमे पत्रे आली. पत्राचा भाव यैकिल्यात आला की, नाईक म॥र यानीही लिहिले आहे की रावजीस हजुरात पाठविता हे उतम आहे. आनिकही त्यानी कितिक राजकारनी म॥र लिहिला होता. पत्रे कारभाऱ्यानी वाचली, शृत होये. राजश्री हरीपतास समाधान वाटत नाही म्हणौन नाना व कृष्णरावजी हरीपताचे येथे आले होते. नाना व हरीपत व कृष्णरावजी याचा खल(व)त येक प्रहर पावेतो जाला. भाव यैकिल्यात आला की, कितीक राजकारनी

वगैरे दैलतीचे बदोबस्ताविशई बोलनी जाली. दुसरे हैदर नायेकाक पत्रें आली ते जिवाजीपताकडील पत्रे आली ते हरीपतास दाखविली. खलवत वगैरे होऊन नाना व रावजी आपले घरास गेले. रावजीस हजूरात रवाना करावे यैसा निश्चये जाला. भाद्रपद सुद ३ येस अथवा सुद पचमीस रावजी मोहर्त करून निघनार यैसे वर्तमान अहे. शृत होये. छ २२ रोज सोमवार. होलकरासी व अहिल्याबाई होलकरीन यासी शुधता नाही म्हणोन उभयेताचे सफाईस येथून कारभाऱ्यानी र॥ बाबूराव वैद्य पाठविले होते. त्यास सिष्टाई करून बाबूराव येथून दो तीन मजलीवर आले. येका दो दिवसा येथे दाखल होनार. अहिल्याबाईने कारभाऱ्यास सागून पाठविले की, ज्यात तुमची मर्जी तेच आमची मर्जी आहे. होलकराविशई आमचा काही फार दुराग्रह नाही मग बाबूराव येथे आलियावर सर्व ध्यानास येईल. अहिल्याबाईने श्रीमतास वस्त्रे वगैरे बाबूराव यासमागमे पाठविली आहेत म्हणोन वर्तमान आहे, शृत होये. सुरापूरवाल्याचा येक भला मणुश आला आहे. जाबसाल कृष्णरावजीचे विद्यमाने करितो. सुरापूरकराचा पैगाम आहे की, स्नेह विशेष असावा. पुढे भेटीचा योग जाला तर करावा यैसे आहे. मागती त्याजकडील जे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल, शृत होये. राजेश्री कृष्णरावजी भाद्रपद सुद ३ त्रितीयेस निघतात. रावजीसमागमे दोनसे स्वार व पचवीस गारदी, पाच जासूदाच्या जोड्या वगैरें शागिर्द पेशा व येक अबारीचा हाती याप्रमाणे सरजाम रावजीसमागमे नेमला आहे. रावजीसमागमे गोविदराव भगवतही येतात, शृत होये. सध्याकाली नाना व हरीपत व कृष्णरावजी याचा खिलवत जाला. उपरातिक हैदर नायेकाकडील णूरखान वगैरे वकील आले होते त्यासीही दोन घटका खिलवत जाला. भाव यैकिला की नाईक म॥र यास पत्रे लिहिणार, शृत होये. वासदेवबावा प्रतिनिधीकडील याचे मृत्य पावल्याचे वर्तमान होते, परतु वर्तमान मृत्य पावल्याचे नाही. त्यास फार समाधान वाटत नाही यैसे आहे, विदित होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल.

सदैव आज्ञापत्री परामृश होत असावा. बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 88.** (पो.ता.) २ रमजान ११९५ हिजरी
२२ आगस्ट १७८१

पै।। छ २ रमजाण सन ११९५ हिजरी, बुधवार दोन प्रहर मै डांक सरकार.

श्रीनिवास

पुरवणी. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनती उपरि. चौथाईचा तह हजरत मगफरतमाब यांचे समई अमल होता त्याप्रमाणें करार करून देतों म्हणोन पंतप्रधानांचे कारपरदाजानीं कबूल केलें असतां, तह करून देत नांहींत व सुबे खुजस्ते बुनयाद येथील कितेक माहलांत निमेनिम रुपये आजीपर्यंत घेत आहेत. याचप्रमाणें हैदराबाद सुब्याचे माहालापासून स्वराज्याचा अमल घेतात. याकरितां तह होजोपर्यंत मामलतीची बंदी करवावी व येविषई हुजूर अर्ज करावा म्हणोन चिरंजीव रघोतमराव सदैव सेवकास सांगत होते. परंतु हुजूरचे मुसाहिब व मुकरब साहब तदबीर त्यां मजलसींत आपले अकलनाकसेनें कांही सलाह ल्याहावी हें अयोग्य. व बाजाचे उडाणापुढें बटेर व चिमण्यानीं काय उडावें. तथापि बुधीलक्षण परवाजाचे मकदुराप्रमाणें असल्यास बुधीप्रमाणें तजवीज करून हुजूर अर्ज केलियां खांवंद कदरदान शंभर गोष्टीहून येक गोष्ट पसंद करून सरफराजी करीत आहेत. यास्तव हुजूर अर्ज करावयाकरितां स्वामीचे सेवेसी व हुजूरहीं संक्षेपेत करून अर्जी लिहिली आहे व च्याहारमची जप्ती व्हावी हे सलाह दौलत होती ते जाहली. पेस्तर करण्याचा प्रकार कृष्टणराव बलाळ हुजूर येत आहेत. याचें मुख्य कारण सखारामपंतास कैद केल्यानंतर बालाजीपंताचे चितांत

बहुतकरून होतें कीं कृष्टणराव बलाळ यानीं हुजूर जाऊन मिजाज मुबारक मुतवजे अहवाल आपल्यावर करवावी. त्यासमईं राव मा।।रनुलेचे चितांत हुजूर जावें हे आरजू असतां पुन्हां बालाजीपंतानीं बमोजिब सलाह दुसरे कारपरदाज तजवीज मवकूफ केली व माहदाजी सिंदे व होळकर यासी इतिफाक व रियायत याजवर करणें फार उपयोगी हे सलाह पसंद जाहली. माहदाजी सिंद्याची पासखातर बालाजीपंत करीत आहेत व बइस्तसवाब बालाजीपंत होळकरांचे ज्वाबसालाचे बानीकार हरीपंत जाहले आहेत. हुजूरीहून इनायत व मिजाज मुबारक मुतवजे अहवाल आहेत. त्याप्रमाणें आपले तरफेनें फिदवीयंतीत कसूर न करावा याप्रमाणें बालाजीपंताचा निश्चय. गो कृष्टणराव बलाळ याचा येतमाद व इतबार पूर्वी वैकुंठवासी माधवराव यांच समइ होता. सांप्रत बाळाजीपंत व हरीपंतासमीपहीं चांगला आहे. परंतु हुजूरचे तरफेनें ज्वाबसालाचा मध्यस्तीचा सिलसिला राव मा।।राकडें. याकरितां अकसर कामांत सिवाय खानगी, बालाजीपंत रावजीस शरीक मसलहत करितात व सलाह पुसत आहेत. हेहीं आपला भ्रम रक्षून समयोचित वर्तणूक करितात. हुजूरचे सिलसिल्याकरितां आपल्यास उमदगी व हुजूर जाऊन पुन्हां सादत मुलाजमत व इनायत ताजी संपादिलियां अफजायश आबरू आहे. याकरितां हुजूर येण्यांची आरजू दिली होती, ते हजरतेचे तफजुलानें बार आली. व हुजूर जाऊन चौथाई वगैरे मालीकाम व इंगरेजांकडील मोहीम वगैरे मुलकी कामाची सलाहदौलत आपण अर्जमारूज करूं त्याप्रमाणें हुजूर पसंद व कबूल होईल, हा भरवसा रावजीस फार आहे. कदाचित अर्ज कबूल न जाहला व पंतप्रधानांचे कारपरदाजांचे मसलहतीस बरखिलाफ इरशाद जाहलियां उभयपक्षीं ज्वाबसाल व उतर प्रत्योतर होत जाईल. त्यांत आपलें बोलणें जवाब ब सवाब पडेल व हजरत आपण अर्ज केली सलाह मंजूर करतील. ज्याबसालाची कुन्हा समजोन पुन्हां आपली तजवीज सलाहदौलत म्हणोन इरशाद करतील.

---

पै।। छ २ रमजान सन ११९५ हिजरी.

२

श्रीनिवास

पुरवणी. श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी. गरज व काबूचा दारमदार व स्नेह जाहला. सांप्रत पंतप्रधान वयेंकडून धाकटे. परंतु सरदार व फौज बइतिफाक. रघुनाथराव इंगरेजाचे रिफाकतीनें बहुत वर्षें लढाई व लोंकांसी भेद करीत आहेत. परंतु हमराही लोकांची फूट जाहली नांहीं. इंगरेंजांचे लढाईस हरसाल कमरबस्ता व सरगरम आहेत. बंदगानआलीनीं वाजबीचें रुईनें कायल करून आपले मतालबा प्र।। फैसला करणें व सलाहप्रमाणें अमल करावयाचा इरशाद केलियां कबूल आहे. करूं कायल न करितां मर्जीप्रमाणें वर्तणूक करणें, म्हणोन इरशाद जाहलियां, इंगरेजांकडील मोहिमेचा आंज्याम जाहला नांहीं. म्हणोन बमोजिब इरशाद कबूल करणें जरूर न केलियां, दुतरफा निफाकाची व लढाईची सरबराई होणार नांहीं. दाहापांच दिवस ज्वाबसालांत कसीस व वोढ धरावी. उपरांतिक हजरतीचे मर्जीप्रमाणें चौथाईचा तह करितों व इंगरेजांकडील दारमदार हैदरआलीखानाचे इस्तसवाब व इतल्याविितरिक्त होणार नांहीं. हजरत व इंगरेज बइंतिफाक हैदर नाईकाचे तंबीस मुतवजे होतील तर उतम आहे. आम्ही माने व तालुकियांत खललअंदाज होणार नांहीं. हैदरखानाची तंबी मंजूर न होतां फरखुंदे बुन्यादेंत राहणें. सलाह असलियां तेथेंच राहांवें. इंगरेजांचा व पंतप्रधानाचा दारमदार आपले मारफतीनें करितों म्हणोन इरशाद जाहलियां करावा. पंतप्रधानाचे खातरख्वाह जाहलियां बमोजिब सलाह हैदर-आलीखान करूं. पंतप्रधानांसीं बिगाड करावा हेच मर्जी असलियां प्रधानाचे तरफेनें कसूर नांहीं. हजरत मुख्तार आहेंत. याप्रमाणें उतरप्रत्योतर करून चौथाईचा तह मर्जीप्रमाणें करून द्यावा व कृष्टणरावजीनीं रूखसत हासल करून यांवें. ज्यासमईं फरागत हासल होईल तें समईं सलाह वक्त जें ध्यानास येईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं.

याप्रमाणें हुजूर जाऊन ज्वाबसाल करावा. राजश्री हरीपंतास पोट-दुखीची व्यथा नवीन जाहली आहे. महिन्यांत येकदोन वेळा फार श्रमी होतात. सांप्रतहीं प्रकृती स्वस्थ नांहीं याकरितां राजश्री बालाजीपंत व कृष्टणराव पंत म।।राचे घरास छ १९ माहे म।।रीं गेले होते. तीन घटका दिवसापासून प्रहर रात्रपर्यंत मसलहत जाहली. खिलवतेचा राज प्रसित्ध जाहला नांहीं. परंतु हुजूरचे तरफेचीच मसलहत होती म्हणोन यैकिलें. पंतप्रधानांचे फौजेची तादाद व फौज जमा केल्यास किती जमा होईल? हजरत बंदगानआलीनीं बिगाड केलियां गालिब मगलूब पक्ष कोणाचा, व हुजूरांत फौज गाडद व स्वार व पागा किती, याची तादाद करीत आहेत म्हणोन यैकिलें. जें वर्तमान यैकिलें व ध्यानास आलें तें लिहिलें असे. हुजूरीहून इंगरेजासीं इतिफाक किंवा बिगाड व हैदर नाईकासी तंबी मंजूर किवा उपेक्षा, व पंतप्रधानासी इतिफाक किंवा निफाक, यापैकीं कोणताहीं येक विचार सित्धांतांत येईल. हजरत बंदगानआलीसमीप फौज मातबर मवजूद आहे. परंतु दाहापांच हजार चांगली चुनंदी फौज नवनिगाहदास्त करावी. कांहीच काम मोकदम नसलियां खालस्यांतील मुफसदां

(अपूर्ण)

---

**A. R. No. 89.** — २५ शाबान ११९५ हिजरी
१६ आगस्ट १७८१

पै।। छ ४ रमजान सन ११९५ हिजरी, रोज शुक्रवार, दोन घटका दिवस राहता दारोग्याचे विद्यमाने पावले.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार, विनंती उपरि. येथील वर्तमान त।। छ २५ शाबान, श्रावण वध त्रयोदसीपर्यंत मा॰ पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे.

विशेष पूर्वी छ २३ माहे म॥रीं डांकेवर पत्रें रवाना केलीं ते दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीचे सेवेसी लिफाफा पावला असेल. त्या उपरि सांप्रत छ म॥रपर्यंत अखबार व अर्जी हुजूर व पृथक पुरवणींत अखबार स्वामीचे सेवेसी लिहून पत्रें डांकेवर रवाना केली आहेत दारोग्याचे विद्यमानें लिफाफा सेवेसी प्रविश्ठ होईल. चिरजीव राजेश्री रघोतमराव यांचें पत्र सेवेसी पाठविलें तें चिरजीवांस पावलें. मानूरीहून रा॥ धोंडो काळो नि॥ त्र्यंबकराव यानीं भाळगांव नि॥ पंतप्रधान व दहीगांव खालसा सरकार येथील सिंवेचे कजीयाचा म॥र लिहिला होता जे. दोन्ही गांवचे पाटलानी पंचाइतीस जावें. पंचाइतींत जो ठराव होईल त्याप्रमाणें यैकावें. या रीतीचा निश्चय सौलतजंग बहादराचे विद्यमानें भालगांवकरानी केला. त्यानंतर पंचाइतीस जात नांहींत व कजीयाचे जमीनींत भालगांवकर राघो बापूजी पागेनी कुरण राखिलें आहे. येविषई राघो बापूजीस पंत-प्रधानाकडून ताकीद होऊन भालगांवकरास पंचाइतीस पाठवांवें म्हणोन लिहिलें आहे. त्यावरून राजश्री कृष्टणराव व गोविंदराव यांस बहुतवार सांगितलें व या उभयतानी राघो बापूजी पागे दि॥ पंतप्रधान यांस सांगोन पाठविलें जे पचाइतीस पाटलास पाठवणें. न पाठवाल तर हुजूरीहून फौज येऊन भालगांवकरास तंबी करील. राघो बापूजीचे ध्यानास येत नांहीं व पंचाइतीस जाऊन सिवेचा कजिया फैसल करीत नांहीं याप्रमाणें साफ उतर केलें. कारभाऱ्यांची व कृष्टणराव यांची वरचेवर ताकीद मानीत नांहीं. याचा बंदोबस्त जो मुनासिब असेल तो हुजूरीहून होईल. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पै॥ छ ४ रमजान.

श्रीनिवास

अखबार पुणें. अज इ॥ छ २३ शाबान लगायत छ २५ माहे

म॥र सन ११९५ हिजरी, रोज गुरुवार. रघुनाथराव सुरतेंहूत तीन कोस अश्विनीकुमार तीर्थावर आहेत व सटवाजी भोंसले वगैरे आठ दहा कोसाचे फासल्याने सुरतेपासोन. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान हुजूर व सेवेसी श्रुत जाहलें असेल. त्या उपरि प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान दफेवार लिहिलें आहे.

रघुनाथराव सुरतेंत असतां तेथील इंगरेजाकडील जवानासीं व राव म॥र यांचे देंवढीचे चौकीदारासीं कजिया जाहला. चौकीदारानें इंगरेजाचे जवानास तरवारीनें जखमी केलें. तो जवान आपले सरदारासमीप गेला. त्यानंतर रघुनाथरायाकडील जमादार देवढीचा, त्यास इंगरेजानीं धरून नेऊन जीवें मारले. यावरून रघुनाथराव बहुत अजुर्दा जाहल व पाच सातसें स्वार व यक पलटण बार व दाहा तोफा राव म॥रनुलेचे हमराह आहेंत. त्यासहित बमय कबीले कूच करून सटवाजी भोंसले व बाजीराव बर(वे) वगैरेसीं मुतफिक जाहले. तेथोन दोन कूचे करून डांगरी म्हणोन मकान सुरतेहून वीस पंचेवीस कोस तेथें आलें. समागमें दोन हजार स्वार व पलटणें येक व तोफा दाहा पर्यंत आहेत. सुरतेंत इंगरेजांचे तरफेनें तेथील काम मामलतदार जो आहे त्यानें राव म॥रनुलेचे समजांविसीकरितां आपले तरफेचे दुभासी पाठविले आहेत व आपणहीं येणार. याप्रमाणें वर्तमान रघुनाथरायांचे लष्करीहून कासदांची जोडी सावकारी आली. त्यांचे जुबानीं व नंदुरबार खानदेशाचे कमावीसदारानें येंथील कारपरदाजास कलमी लिहून पाठविलें तें छ २४ माहे म॥रीं पत्र आलें व जासूदहीं छ म॥रीं आले.

मानाजी फांकडयाचे समजाविसीचा सिलसिला परशरामपंताचे विद्यमानें बालाजीपंतानी लाविला. हें वर्तमान पेशजी लिहिलें होतें. त्याउपरि प्रतिनिधीकडील सरदारानी निकड करून भांबूराव यास दस्तगीर केलें व मानाजी फरारी जाहला. त्याचे तंबीस पांडुरंगराव वगैरेची फौज गेली होती. त्यांसी लढाई जोगाईचे आब्यासमीप जाहली व मानाजी तेथोनही निघोन गेला. हें वर्तमान

पूर्वील अखबारेंत लिहिलें आहे. सांप्रत येथील मातबर व शरीक-मसलहत त्याचे जुबानीं यैकिलें कीं मानाजी फांकड्याची समजावीस करून त्यास आणावें. येविषईं परशरामपंताचे विद्यमानें हरीपंत फडके बानीकार व धोंडो आपा पुरंदरे याचे विद्यमानें सफाई व करार-मदाराचा ज्वाबसाल जाहला आहे. जोगाईचें आंब्यासमीप लढाई होऊन मानाजी फरारी होऊन गेला. हें वर्तमान आल्यानंतर बालाजी पंतानीं आपले हातें तसलीचें पत्र व धोंडो आपाकडील खातरजमेची पत्रे सुतरस्वारासमागमें मानाजीकडें रवाना केलीं. ज्या स्थळीं मानाजी फांकड्याचा पता लागेल ते स्थळीं पत्रें पावतीं करावीं.

२

पै॥ छ ४ रमजान.

पुरवणी अखबार छ २५ शाबान सन ११९५ हिजरी. याप्रमाणें सांगोन सुतरस्वाराची रवानगी केली म्हणोन वर्तमान यैकिले. पंढरपूरचे लढाईचे समई मानाजीनें आपली स्त्री गुरसाळेंनजिक पंढरपूर येथे महिपतराव कवड्याचा लेंक आवजी कवड्या याचे आश्रयानें छपाऊन ठेविली. लढाईंत मानाजीची सिकस्त होऊन फरारी होऊन गेल्यानंतर आवजी कवड्यानें पंतप्रधानांचे कारपर-दाजास इतिला केली. यानीं लिहून पाठविलें कीं तुम्हासमीपच ठेवणें. मानाजी फांकड्या शरीर आहे. त्याची फहमायश करून आपले इजनांत ठिवावा व मानाजी माहदाजी सिंद्याचे बिरादरांत येकसूईनें राहिल्यास सरफराजी करावी, हाही मनसुबा कारपर-दाजांचा आहे.

हदरअलीखानाकडील पत्रें वकीलास आलीं. त्यांनी कारपर-जांस सागितला म॥र सेवकानें यैकिलाजे. करनल कूट इंगरेजानें देवनामपटणीहून कूच करून चिनापटणास जाणार किंवा चिनापट-णास दाखल झाला असेल. हैदरअलीखान गनिमी कायद्याप्रमाण लढाई करीत ताकूबावर आहे. पंतप्रधानाचे वकीलानें खबर लिहिली त्यांत म॥र आहे कीं, करनल कूट चिनापटणास दाखल जाहला व हैदर

अलीखान वन्हेश्वर चिनापटणाहून साहा कोसाचे फासल्यानें बारीचे तोंडी मकान तेथे आहे. यैकिल्याप्रमाणें वर्तमान लिहिलें आहे.

येथील कारपरदाजानीं सुरब बारूत व बान वगैरें सरजामाचे तयारीकरितां तीस हजार रुपये तोफखान्याचें दारोग्यास दिधले. हें वर्तमान पूर्वीं लिहिलें होतें. बानाचा कारखाना ज्यारी आहे. छ २३ माहे म॥री बालाजीपंत व कृष्टणराव बलाळ गुलटेकडीसमीप जाऊन बाण सोडून पला किती होतो याचा अंदाजा पाहिला. श्रुत होय, हे विनती.

---

**A. R. No. 90.** २६ शाबान ११९५ हिजरी

१७ आगस्ट १७८१

पै॥ छ ४ रमजान शुक्रवार दोन घटका दिवस राहाता पावली दारोग्याचे विद्यमाने, सन ११९५ हिजरी.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. येथील कुशल. ता॥ छ २६ माहे शाबान मु॥ क॥ पुणें. स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानद लेखनआज्ञा करीत असिले पाहिजे विशेष. यथील वर्तमान छ २३ माहे म॥र रोज मगलवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाके-समागमे सेवेसी रवाना केले, ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर येथील वर्तमान राजश्री नाना व कृष्णरावजी वगैरे गारद्याची हजरी घ्यावयास गावाबाहेर गुलटेकडीजवल गेले होते. हजरी वगैरे घेऊन तोफाचे बार करून तोफेच्या गोल्याचे पले पाहिले. बार वगैरे करून सध्याकाली नाना वगैरे आपले वाडयात आले. शृत होये. हैदर नायेकासी व इग्रजासी लडाई जाली. हैदर नायेकाकडील येक दोन कोन्ही मातबर मणुश जाया जाला. हे वर्तमान पूर्वी विनंतीपत्री लेखन केले होते त्याजवरून शृत जाले असेल. प्रस्तुत वर्तमान आहे की हैदर नायेकासी व इग्रजासी लडाई जाली. नाईक म॥र याचा मेहोना मीर होता तो लडाईत कामास आला,

इतर लोकही फार जाया जाले. व इग्रजाकडीलही लोक बहुत जाया जाले. याप्रमाणे परस्परे लडाई होऊन उभयेपक्षी कायेम राहिले. यैसे वर्तमान आले आहे. इग्रजाजवल पचवीस पलटने जमली आहेत, त्याचे शहावर हैदर नाईक आहे. परस्परे लडाई आहे यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. शृत होये. छ २४ रोज बुधवार साताऱ्यास राज्याकडील मंत्री वगैरे कारभारी आहेत त्यास नानानी पत्रे लिहिली आहेत. व कृष्णरावजीनीही पत्रे लिहिली आहेत की, पहिले नवाबाच्या वेलेस चौथाई व सरदेशमुखी वगैरेचा तह कोन्या प्रकारचा जाला, कागदपत्र तहाचे कैसे जाले. त्या कागदपत्राचे प्रस्तुत प्रयोज्यन पडले आहे, ते तहाचे कागदपत्र कारकुनासमागमे पाठऊन द्यावे. यैसे येथील कारभाऱ्यानी साताऱ्यास मंत्री वगैरे यास पत्रे लिहिली. तेथून तह वगैरेचे कागदपत्र येथे कारभाऱ्याजवल देणार. शृत होये. नाना व हरीपत व कृष्णरावजी याचा खिलवत येक प्रहरपावेतो जाला. भाव यैकिल्यात आला की, पुढे इग्रजाचे मसलतीविशई ज़ाला. दुसरे कृष्णरावजीस हजुरात रवाना करावे यैसा निश्चये जालाच आहे. त्यास राव म॥र भाद्रपद शुद ३ त्रितीयेस मोहर्त करून निघनार यैसा निश्चये जाला. शृत होये. करनल गाडर इग्रज कल्यानीस व ममईस राहतो. सरजाम वगैरे जंगी त्याने फार केला आहे. भाद्रपद मासी तो इकडे उद्वोग करनार यैसी वदता आहे. दुसरे वर्तमान आहे की, कल्यानीहून दोनतीन पलटने तीन च्यार कोस पुढे आली आहेत. मग काये उद्वोगावर आली आहेत हे तहकीक वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. शृत होये. छ २५ रोज गुरुवार. श्रीमत राजश्री दादासाहेब सुरतेस बाहेर आहेत. त्याजवर चौकी पाहारा इग्रजाचा आहे. प्रस्तुत येथे वदंता आहे की, सटोजी भोसले व बाजीराव बरवे वगैरे गेले. हे दादासाहेबास भेटले. त्याजवरून इग्रजासी व दादा-साहेबासी नाखुसी जाली. सटोजी भोसले वगैरे यानी पाच च्यार

हजार फौज मेलऊन दादासाहेबास तेथून दोन तीन मजला काहाडले. यैसे वर्तमान येथे कोन्हाचे घरी आले, त्याजवरून हे वदता आहे. परतु सरकारात कलमी हे वर्तमान नाही. अफवा हे आहे. मग तहकीक सरकारात वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. राजश्री मानाजी फाकडे यानी जोगाईचे आब्यांकडे खुल केले आहे. त्याचे पारपत्यास पागा वगैरे गेल्या आहेत. काही येक लडाईही जाली. हे वर्तमान पूर्वी येक दोन विनंतीपत्री लेखन केले आहे. शृत जाले असेल. पूर्वी मानाजी फाकडे यास कारभाऱ्यानी कौलही पाठविला होता की येणे. प्रस्तुत वर्तमान आहे की मानाजी फाकडे त्या कौलावरून येणार. मग येतात किवा न येतात हे मागाहून लेखन केले जाईल. शृत होये. भाद्रपद शद त्रितीयेंस राजश्री कृष्णरावजी मोहर्त करून निघनार यैसा निश्चये जाला. निघाल्यावर कूच दर कूच येज्यमानसाहेबाकडे येणार. शृत होये. हैदर-नायेकाकडून पत्रे आली. पत्रे घेऊन नाईक म॥र याचे वकील दरबारास आले होते. पत्रे नानास दिल्ही. दोन घटका वकीलाचा व नाना व रावजीचा खलवत जाला. पत्राचा भाव कलला की नाईक म॥र यासी व इग्रजासी लडाई जाली. नाईक म॥र मांगे दोन तीन कोस सरले. इग्रज काही येक त्याजवर गालिब आहेत यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान कलल्यास लेखन केले जाईल. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 91.** २६ शाबान ११९५ हिजरी

१७ आगस्ट १७८१

पै॥ छ १० रमजान सन ११९५ हिजरी रोज गुरुवार, अस्तमानी जोडीबराबर पावले.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. यथील कुशल. ता॥ छ २६ माहे

शाबान मु।। पुणें. स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानद लेखनआज्ञा करीत असिले प।। विशेष. येथील वर्तमान छ म।।री प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान ध्यानास येईल. यानतर यथील वर्तमान राजश्री कृष्णरावजी भाद्रपद सुद ३ त्रितीयेस स्वार होऊन येज्यमानसाहेबाकडे येतात. शृत होये. हैदर नाईक यासी व इग्रजासी लडाई मातबर जाली. उभयेपक्षी मणुश बहुत जाया जाली. नाईक म।।र काही येक सिकस्त होऊन मागे दोन तीन कोस गेले. यैसे वर्तमान आहे. नाईक म।।र याचे वकील दरबारास आले होते. कारभाऱ्यासी दोन तीन घटका खिलवत जाला. भाव यैकिल्यात आला की, नाईक म।।र यास पत्रे लिहिणार. शृत होये. राजश्री कृष्णराव तहाचे कामाकरिता हजूरात येतात. पहिले नवाबसाहेबाचे वेलेस शाहू राज्याचे कारकिर्दीत सरदेशमुखी वगैरे याचा तह होऊन कागदपत्र जाहले आहेत, ते कागदपत्र साताऱ्यास राज्याचे जामदर-खान्यात आहेत म्हणोन मंत्री वगैरे यास येथून कारभाऱ्यानी पत्रे लिहिली आहेत की, ते तहाचे कागदपत्र पाठऊन द्यावे. ते कागदपत्र आल्यानतर त्याच्या नकला रावजीसमागमे देनार. शृत होये. मानाजी फाकडे जोगाईचे अब्याकडे खूल करून आहेत. त्याचे पारपत्यास र।। पाडुरगराव वगैरे याच्या पागा पाठविल्या आहेत. दुसरे फाकडे म।।र याजला कौलाही पहिले पाठविला होता की, येणे. त्याजवरून वर्तमान आहे की, फाकडे येणार. मग येतो किवा न येतो हे पाहावे. शृत होये. नाना व हरीपंत व कृष्णरावजी याचा नित्य खलवत होत असतो. भाव आपले दौलतीचे बदोबस्ताविशई व राव म।।र हजूरात येतात येविशई खलवत होत असतो. शृत होये. इग्रज कल्यानीवर आहेत. वर्तमान आहे की, दोन तीन पलटने तीन च्यार कोस पुढे आली. यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. प्राथःकाली

विनंतीपत्र रवाना केले त्याजवरून ध्यानास येईल. बहुत काय लिहिणे. कृपा लोभ कीजे. हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 92.**

२७ शाबान ११९५ हिजरी
१८ आगस्ट १७८१

पै।। छ १० रमजान सन ११९५ हिजरी गुरुवारी आस्तमानी तेनाती जोडीबराबर आली ते पावली.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान त।।छ २७ शाबान श्रावण वद्य चतोर्दसी शनिवार-पर्यंत वास्तव्य पुणें, स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणोन स्वानंद लेख-नाज्ञा केली पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान छ २५ माहे म।।र डांकेवर पत्रें हुजूर व स्वामीचे सेवेसी पाठविलीं तें पावलीं असतील. व पुन्हां वरचेवर डांकेवर पत्रें रवाना होत आहेंत. रघुनाथराव यांचे चौकीदारासीं व इंगरेजाकडील इंगरेजासीं कजिया जाहला. व इंगरज (ज)खमी जाहला तो मेला. त्याचे खुनाचे बदल्यास इंगरेजानीं रघु-नाथराव याचे चौकीदारास मारलें. याजकरितां राव म।।र अजुरदा होऊन वीस कोस सुरतेहून डिंगरीपर्यंत आले. बाजीराव बरवे व सटवाजी भोंसले वगैरे दोन हजारपर्यंत स्वार व येक पलटण व दहा तोफा समागमें आहेत म्हणोन छ २५ माहे म।।रीं वर्तमान लिहून पाठ-विलें. त्यानंतर छ २६ तारखेस पुन्हा येथील कारपरदाजास बातनीं आली कीं, सोनगडपर्यंत रघुनाथराव आले. येथील कारभाऱ्यांस सशय उत्पन्न जाहला आहे कीं, रघुनाथराव यांस इंगरेजांवितरिक्त दुसऱ्यांचा आश्रय नांहीं. व सांप्रत इंगरेजासीं नाखुसी व कजिया करून सोनगडपर्यंत आले. त्या अर्थी काय मनसुबा केला असेल याचा

तर्क अनेक प्रकारचा करितात. परंतु निश्चय होत नांहीं. राजश्री कृष्टणराव बल्लाळ नेमाप्रमाणें छ २ रमजानीं पुण्याहून प्रस्थान करून हुजूर येणार. राव म॥र हुजूर आल्यानंतर जे सलाहदौलत असेल त्याप्रमाणें रावजीस इरशाद होईल. सेवकाचे तैनाती जासूद जोड्या दहा त्यांची हाजरीची इस्मनवीसी व बरावर्द आखर जमादिसानी सन ११९५ हिजरीपर्यंत सेवेसी पाठविली आहे. सांप्रदायाप्रमाणें दाखल दफ्तर सरकारआली व्हावी. मुरलीदाससंमधी प्रकरण पूर्वीं डांकेवर विनतीपत्रीं लिहिले आहे. चिरंजीव रघुतमराव विनती करतील, ते मान्य होऊन हुजूरचें दस्तक देविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

**A. R. No. 93.**

१ रमजान ११९५ हिजरी
२१ आगस्ट १७८१

पै॥ छ ९ रमजान सन ११९५ हिजरी बुधवार अस्तमान डांकेवर म॥ दारोग्याचे पावली.

श्रीनिवास

पोष्य हबतराव गोपाळ सां नमस्कार विनती उपरि. येथील वर्तमान भाद्रपद शुध द्वितीया भौमवासर त॥ छ १ रमजानपर्यंत मा। पुणें, स्वामीचें कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे, विशेष. छ २६ शाबानीं डांकेवर पत्राचा लिफा(फा) सेवेसी पाठविला तो दारोग्याचे विद्यमानें सेवेसी पावला असेल. सांप्रतचें वर्तमान पृथक पुरवणीवरून सेवेसी श्रुत होईल. राजश्री कृष्टणराव बलाळ उदईक त्रितीया बुधवार छ २ रमजानीं श्रीमंत पंतप्रधान व राजश्री नाना व हरीपंताचा निरोप व रुखसत घेऊन रात्रौ अंगप्रस्थान करणार. व छ ३ गुरुवारीं भोजन करून स्वार होऊन

पुण्याहून सहा कोसी लोणीचा मुकाम करूं, याप्रमाणें रावजीचें मुखें निश्चय येकिल्याप्रमाणें हुजूर व सेवेसी लिहिले आहे. श्रीकृपेनें सत्वर हुजूर येतील.· बहुत काय लिहिणें, हें विनती.

---

पै।। छ ९ रमजान

श्रीनिवास

पुरवणी श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनतीजे. कृपापत्र चिरजीवाचे पत्रासहित छ ८ शाबानचे रवानगीचें छ १६ माहे शाबानीं येथें पावलें. त्याउपरि पत्र येत नांहीं व आजीपर्यंत न आलें. हुजूरचा इनायतनामा दारोग्याचे पत्रासहित छ २१ शाबानचे आजी छ १ रमजानीं पावलें. स्वामीचे पत्राचे आगमनीं संतोषास कारण. परंतु पत्र पाठवावें हे लिहिणें अमर्यादा. तथापि अखबार पावली याची रसीद अवश्यरूप येत जावी. येविषईं हजूरहीं लिहितों व आपले सेवेसीहीं विनती पूर्वीपासून लिहिण्याचा सांप्रदाय, यास्तव निःसंशय लिहितों. निर्मलकरानें वली महमद नामी कारभारी व त्याचे रफीकास मारलें. व तो बागी जाहला आहे. याप्रमाणें पंतप्रधानाचे वकीलाचीं किंवा इतराचीं पत्रें येथें आली. यावरून येथील कारभारी बहुत आश्चीर्य करितात कीं वीस पंचेवीस लक्षाचा तालुका ज्याचे स्वाधीन व जातीनें मूल व तारुण्याचा आरंभ म्हणजे ज्याहल व अविवेकी याप्रमाणें असतां हजूरीहून त्याची उपेक्षा होत आहे. याप्रकारचा सरदार हुजूरचे कांहीच उपयोगी नांहीं. दैवयोगें याचप्रमाणें बळावला तरी खानगी फितूर व मुफसद जबरदस्त होईल. व या विषवृक्षाची मुळी खोल गेल्यानंतर वृक्षास उपटोन टाकणें बहुत श्रम लागतील. हुजूरचे सरदाराचे वर्तमान लिहिण्याचे प्रयोजन नांहीं. परंतु परकीय दरबारी चर्चा जाहली ते हुजूर इतिला करावी यांत दोष नांहीं. याप्रमाणें समजण्यांत आलें. परंतु हुजूर ल्याहावयाची शक्ती न

जाहली. व अनेक प्रकारचे संशय उत्पन्न जाहले यास्तव हुजूर हें वर्तमान लिहिले नांहीं. स्वामीचें सेवसी व चिरजीवास आहे हे विनती.

---

पै॥ छ ९ रमजान

श्रीनिवास

अखबार पुणें, अज इ॥ छ २६ शाबान लगायत छ १ रमजान भाद्रपद शुध २ मंगळवार.

रघुनाथराव सुरतकर इंगरेजासीं कजीया करून बमय कबीले सुरतेहून निघोन डांगरीस आले. मानाजी फांकडयाचे खातरजमेविषईं धोंडो आपा पुरंदरे यांचे विद्यमानें बालाजीपंतानीं शुतरस्वारासमागमें पत्रें रवाना केलीं. करनल कूट देवनामपटणीहून चिनापटणास गेला. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित हुजूर अखबारेचा लिफाफा व अर्जी व स्वामीचे सेवेसी पत्र छ म॥र डांकेवर रवाना केलीं. तें हुजूर व सेवेसी पाऊन वर्तमान कळलें असेल. त्याउपरि प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान दफेवार लिहिलें आहे.

रघुनाथराव बमय कबिले व जमीयत हमराही डांगरी व गढेंकामळेंनजीक मुकामात करून राहिले आहेत, व राव म॥रनुलेचे समजावीसीकरितां करनल गाडर मुंबईहून सुरतेस आला. याप्रमाणें पंतप्रधानांचे कारपरदाजास खबर आली, म्हणोन कृष्टणराव बलाळानीं सांगितलें. बाजारी सर्वतोमुखी चर्चा आहे कीं रघुनाथराव सोनगडापर्यंत आले. समागमें दोन हजार स्वार व दोन पलटणें व दाहा तोफा मवजूद. पुन्हां स्वार जमा होत आहेत. गणेशपंत बहिरे यांचे मारफतीनें बालाजीपंताचें इस्तसवाबेनें कागदपत्राचा सिलसिला रघुनाथराव यांसी आहे. त्या सिलसिल्यावर रघुनाथराव इंगरेजासीं अजुर्दा होऊन

निघाले किंवा दुसरे कोण्हीं सरदारांचा सिलसिला असेल त्या भरवसियावर इंगरेजासीं बेबनाव करून निघाले असतील. याप्रमाणें कयास कितेक लोकांचे व कारपरदाजांसहीं संशय प्राप्त जाहला आहे.

- हैदरअलीखानानें येथील कारपरदाजांस व आपलें वकीलास पत्र पाठविलें. त्यांत म।।र लिहिला आहेजे. चिनापटणीहून करनल कूटानें खान म।।रास बहुत मिनतवार लिहून पाठविले आहे कीं कलकत्याहून गोरंदोज मुख्तार होऊन आला आहे त्याचे विद्यमानें हैदरखानांसीं व इंगरेजासी स्नेह व दारमदार पका व्हावा. याचें उतर हैदरखानानीं चिनापटणकर कुटास लिहिलेजें. तुमचा व कलकतेवाले दोघांचे कराराचा विश्वास आम्हांस येत नांहीं. त्याअर्थी दारमदार किमर्थ करावा? लढाईंत ज्याची फते होईल तो रियासत करील. याची इतिला कारपरदाजांस करणें व गाडराकडील किंवा कलकतेवाल्यांचा पैगाम आलियां कारपरदाजानीं सर्वथैव स्नेहाचे प्रकरणीं गोष्ट न यैकावी व साष्टी व वसईसुधां घेतला मुलुक माघारा देतो म्हणतील तर त्यांचे बोलण्याचा विश्वास व लालुचेवर द्रिष्टी न द्यावी. या प्र।। लिहिलें होतें. वकीलानीं येथील कारपरदाजास पत्रार्थ सांगितला. यानीं उतर केलें कीं खान म।।राचे इस्तसवाबेवितरिक्त इंगरेजासीं कांही ज्वाबसाल अथवा सिलसिला आम्हाकडून होणार नांहीं.

———

पै।। छ ९ रमजान २

पुरवणी अखबार पुणें. छ १ रमजान सन ११९५ हिजरी.

चितो विठल सुमारगडावर कैदेंत होता. सन्यास घेतला म्हणोन चर्चा यैकिली होती. परंतु नमकहराम व खावंदासी कृत्रिम येकवार ज्यानीं केलें त्याचा भरवसा नाही. याकरितां देहसंमध सोडून तो जीव यमलोकास जावा हेंच प्रायश्चित कारभाऱ्यांनी नेमिलें होतें. आजी छ म।।रीं वर्तमान आलें कीं चितो विठल समांप्त जाहला.

वासुदेवबावा मुतालिक प्रतिनिधी मुमूर्ष होता. याकरितां प्रथमतां समाप्त जाहल्याचें वर्तमान आलें. परंतु ते समई नांवकरी कोण्हीं पाग्या मेला, हे वर्तमान पूर्वी लिहिले आहे. सांप्रत तहकीक येकिलें की वासुदेवबावा कऱ्हाडांत होता मृत्यू पावला. कृष्टणराव बलाळ छ २ माहे रमजानीं प्रस्थान करून छ ३ गुरुवारीं स्वार होणार. समागमे दीडसे स्वार व येक हाती व पंचेवीस गाडदी पंतप्रधानांनी आपले सरकारचे तरफेने नेमून दिधले आहेत. हरीपंत फडके यांस शुलाची व्यथा उत्पन जाहली आहे. दोन दिवस स्वस्थ व दोन दिवस अस्वस्थ प्रकृती असती. छ १ माहे म॥रीं रा॰ बालाजीपंत नाना व कृष्टणराव बलाळ रा॰ हरीपंताचे घरास गेलें होते. च्यार पांच घटकापर्यंत येकांत जाहला. त्याउपरि स्वस्थळास गेले. श्रुत होय हे विनती.

---

**A. R. No. 94.**

२ रमजान ११९५ हिजरी
२२ आगस्ट १७८१

छ ९ माहे रमजान संन ११९५ हिजरी बुधवार अस्तमान डांकेवर म॥ दारोगा हरकारा.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजें. यथील कुशल त॥ छ २ माहे रमजान मु॥ क॥ पुणे स्वामीचें कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानद लेखनआज्ञा करीत असिलें पाहिजे. विशेष. यथील वर्तमान छ २६ माहे शाबान. विनंतीपत्रे दोन, येक प्राथःकाली सरकारचें डाकेंसमागमे, दुसरें दो प्रहरा राजश्री हैबतराव याचे तैनाती जोडीसमागमे मै अर्जीसहित यैसे सेवेसी विनंतीपत्रे रवाना जाली त्याजवरून सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर येंथील वर्तमान. श्रीमत राजश्री दादासाहेबासी व इग्रजासी नाखुसी काही येंक जाली म्हणौन दादासाहेब सटोजी भोसले वगैरे मिळाले. हें सुरतेहून निघोन

सोनगडाकडे आलें यैसी वदता आहे. हें वर्तमान पूर्वीचें विनंतीपत्री लेखन केले होते त्याजवरून शृत जालें असेल. त्यास खानदेश प्रातीहून र॥ गनेशपंत बेहरें वगैरे याची पत्रें आली की दादासाहेब च्यार हजार मणुश व येक पलटन व सटोजी भोसले वगैरे याचें दोन अडीच हजार स्वार या सरजामानसी सुरतेंहून निघून सोनगडास आलें. पुढे फौज वगैरें मेलऊन कोडाईबारी चहडून खानदेश प्राती येणार. इग्रजाचे पलटन वगैरे दादासाहेबासमागमे नाही. त्याचेंच येंक पलटन वगैरे मणुश व सटोजी भोंसले वगैरे आहेंत. सोनगडास आले. इग्रजासी व त्यासी काही नाखुसी जाली. इकडे येतात म्हणौन गनेशपंत वगैरे यानी लिहिले होते. येथे तर्क बहुतानी केले की इग्रजासी नाखुसी करून पुढें परिनाम काये. सटोजी भोसलें वगैरे प्रस्तुत त्यास मिळाले आहेत. यानी इग्रजासी काही येक मसलत करून दादासाहेबास सोनगडास आनिले की फौज जमा व्हावी याअर्थी आनिले असेल यैसे बोलतात. त्यास श्रीमत दादासाहेब यानी कुटुब व मूल सुरतेस ठेऊ(न) आपन खासा पाच च्यार हजार मणुश व येक पलटन व दोन अडीच हजार स्वार, सटोजी भोसले व बाजीराव बरवे वगैरे याचे व दाहा पाच तोफा या सरजामानसी सोन-गडास आले. सटोजी भोसले वगैरें दादासाहेबासमागमेच आहेत. सटोजी भोसले व बाजीराव बरवे वगैरे यानी इग्रजास मसलत दिल्ही की देशात वर्तमान आहे की दादासाहेब इग्रजाचे कैदेत आहे. या अर्थी फौज वगैरे जमा होत नाही. दादासाहेबास आमचे स्वाधीन करावे. सोनगडास राहून फौज वगैरे जमा करून खानदेश प्राती उपद्रव करितो. तुम्ही बोरघाट वगैरेकडे उपद्रव करावा. यैसी मसलत करून दादासाहेबास घेऊन सटोजी भोसले वगैरे सोन-गडास आलें यैसे वर्तमान आहे. दादासाहेब वगैरे सोनगडास आले हें वर्तमान येथे तहकीक आले. शृत होये. दुसरे वर्तमान येथे आहे की दादासाहेब इग्रजासी नाखुसी करून निघाले. इकडे येतात म्हणौन करनैल गाडर ममईहून दादासाहेबाचे समजूतीस गेला यैसेही वर्तमान आहे. परतु दादासाहेब इग्रजासी नाखुसी करून

निघतील यैसी त्याची जरब नाही. इग्रजाच मसलतीने फौज वगैरे जमा करावी या अनवये दादासाहेब सोनगडास आले यैसे वर्तमान आहे. पुढे तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. छ २७ माहे शाबान रोज शनवार. श्रीमत दादासाहेब सोनगडास आले. फौज वगैरे जमा करून पुढे उपद्रव करनार म्हणौन कारभारी वगैरे माहे म॥री सुद दशमीस डेरे बाहेर करनार. तमाम लोकास व सरदारास पत्रे पाठवितात की दसऱ्यास जमा व्हावे. शृत होये. सटोजी भोसले व बाजीराव बरवे हे दादासाहेबास सोनगडास घेऊन आले. फौज इकडील जमा करनार. इकडील सरदारास ते फितुर करतील म्हणौन कारभारी अदेशात आहेत. चौकसी करितात व सरदार वगैरे यास ताकीद करितात. शृत होये. रा॥ नाना व हरीपत व कृष्णरावजी याचा खिलवत जाला. राव म॥र छ २ माहे म॥री मोहर्त करून निघनार. शृत होये. दादासाहेब सोनगडाकडे आले म्हणोन राजश्री गणेशपंत बहरे यास पत्रे पाठविली की तुम्ही जेमयेतसुधा त्याचे शाहास जाणे. पंत मजकुरापासी हाजार स्वार आहेत. गणेशपंत तिकडे जानार. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाली. शृत होये. छ २८ माहे शाबान रोज रविवार. वलीमहमद बक्षी नवाब जफरुदौला बहादुर मरहूम यांजकडील व निर्मलचा किलेदार व कोतवाल वगैरे जमादार यानी सिबंदीत फितुर करून पांच्यार हाजार माणूस आपणाकडे केले की नवाब मरहूम याचे पुत्रास दगा करावा. हे वर्तमान जफरुदौला बहादुर यांचे पुत्रास कलल्यावर त्यांचेही मायेची दोन च्यार हजार माणूस होते, हे बक्षी मजकूर यांजवर चाल करून गेले. यांसी व त्यासी लडाई जाली. वलीमहमद बक्षी वगैरे धरले गेले. जे जमादार वगैरे फितुरात होते ते सपूर्ण बादूर मजकूर यांचे पुत्राणे जीव मारले, यैसे वर्तमान येथे आले. शृत होये. इंगरेज कल्याणीस व ममईस जमाव करून आहेत. प्रस्तुत दादासाहेब सोनगडास जमाव वगैरे करावयासी आले. त्यानी पुढे कोंडाईबारीस चाल केल्यास कल्याणीवाले इंगरेज बोरघाटाकडे चाल करनार यैसे वर्तमान आहे. शृत

होये. नित्य खलबत हरीपंत व नाना व कृष्णरावजी यांचा होत असतो. भाव यैकिलियांत आलां की पुढे दौलतीचा बंदोबस्त करावा. फौज वगैरे जमा करावी. स्वारीचा उद्योग करून इंगरेजाचे पारपत्य करावे. शृत होये. दुसरे हैदर नाईक यांजकडील वकील दरबारास आले होते. कारभारी यांचा व त्यांचा खलबत जाला. नायेकाकडे पत्र लिहिनार. शृत होये. हरीपंतास येक दोन दिवस समाधाण वाटत नाही, परंतु आराम आहे. शृत होये. छ २९ माहे शाबान रोज सोमवार. चिंचोडचे देव चतुर्थीस मोरेश्वरास गेले. त्यांचे दर्शणास पुण्याबाहिर श्रीमंत व नाना वगैरे गेले होते. दर्शण करून पुन्हा गावात आले. शृत होये. राजश्री भगवंतराव निंबालकर कृष्णरावजीचे घरी आले होतें. त्यांसी व रावजीस दोन तीन घटका खलबत जाला. खलबतीचा भाव यैकिल्यात आलां की राव मजकूर हजुरात येतात त्यांस निंबालकर मजकूर यानी आपले साहित्याविसी सांगितले. त्यांजवरून राव मजकूर हाजुरात अर्ज करनार. शृत होये. राजश्री माणाजी फाकडे जोगाईच्या आंब्याकडे होते, त्यांचे पाठीमागे याची फौज होती. प्रस्तुत वर्तमान यैकिल्यांत आले की राक्षसभुवनावर गंगा उतरून दादासाहेबाकडे जानार. समागमे जमाव दोनसे स्वार आहेत याप्रो वर्तमान यैकिले. तहकीक वर्तमान आल्यावर लेखण केलें जाईल. शृत हाये. छ १ माहे मजकूर रोज मंगलवार. नाना व कृष्णरावजी हरीपंताचें येथे आले होते. गणपतीचा उत्छाहा आहे म्हणून नाच होत होता तो पाहून उपरांतिक खलबत जाला. शृत होये. श्रीमंताचे येथे वाडयांत गणपतीची स्तापणा होऊन उत्छाहा आहे. कारभारी वगैरे उत्छाहाचे नाचास व कथेस जात असतात. शृत होये. राजश्री चिंतो विठल गडास कैदेत होते तें मृत्य पावले यैसे वर्तमान आले आहे. मागतीही शोध करून लेखण केले जाईल. शृत होये. दादासाहेब सोनगडाकडे गेले म्हणून करनेल गाडर इंगरेज पांच सातसे मानसानसी झाहाजात बसून ममईहून सुर्तेस गेला यैसे वर्तमान आले. मग श्रीमंत दादासो इंगरेजाची नाखुसी करून निघाले किवा त्याचे सळुखाने निघाले हे वर्तमान

तहकीक करून लेंखण केलें जाईल. शृत होये. छ २ माहे मजकुरी रो कृष्णरावजी दीड प्रहर रात्रपूर्व गेल्यानंतर महूर्त करून बाहिर निघनार. कूच दर कूच हजुरात येतात. शृत होये. बहुत काय लिहिणे. कृपालोभ कीजें. हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 95.**

३ रमजान ११९५ हिजरी
२३ आगस्ट १७८१

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टांग नमस्कार. विनती उपरि. येथील वर्तमान ताा छ ३ माहे रमजान भाद्रपद शुध चतुर्थी गुरुवासरपर्यंत वास्तव्य पुणे, स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. कृपापत्र छ २१ शाबानचे रवानगीचें डांकेवर रवाना केलें तें छ २ माहे रमजान बुधवारीं दोन प्रहर दिवसां पाऊन संतोष जाहला. व चौथाईचे अमलाचे मोकलीकेंविषईं राजश्री कृष्णरावजीचे खुलास्याप्रमाणे स्वामीनी हुजूर अर्ज केला व त्याचें उतर हुजूरीहून इरशाद जाहला. परंतु नवाब मोइनुदौला बहादर याचे फर्माविण्यांत आपण सांगू त्याबमोजिब उत्तर सेवकास ल्याहांवें म्हणोन आज्ञा. त्यास सांप्रत रावजी हुजूर सत्वरच पावतील व समक्ष अर्ज करतील. व इरशादही समक्षच होईल. छ १ माहे रमजानपर्यंत वर्तमानासहित छ २ माहे म।।रीं पत्रें डांकेवर रवाना केलीं, ते सेवेसी पाऊन वर्तमान हुजूर व सेवेसी श्रुत जाहलें असेल. छ ३ माहें म।।र गुरुवारीं प्राथःकालीं प्रहर दिवसपर्यंत राजश्री कृष्ट-णरावजी उभयतां गोविंदरावजीसहित बालाजीपंत नानाचे हवेलीस जाऊन, येकांती परस्परें संभाषण जाहलें. त्याउपरि नाना फडनीसनी विडे देऊन रुखसत केलें. छ २ माहे म।।रीं श्रीमंत पंतप्रधान गणेशाचे उछाहाचे मजलसींत बसले होते. राजश्री बालाजीपंत नानासहित

कृष्टणराव रुखसतीकरितां गेले. श्रीमंतानीं विडे देऊन राव म॥रनुलेस रुखसत केलें. आजी छ ३ माहे म॥रीं रावजी अडीच प्रहर दिवसानंतर पुण्याहून स्वार जाहले. लोणीचेसमीप मुकाम नेमिला आहे. तेथें जातील. छ ५ रमजानीं बारामतीस जाणार. तेथें येक मुकाम करून छ ७ रोजीं स्वार होतील. इंदापुरीं येक मुकाम होईल. त्याउपरि दरमजल हैदरबादेस जावयाचा नेम केला आहे. भगवंतराव निंबाळकर माढेकर कृष्णरावजीचे आश्रयानें पुण्यास आला आहे. सांप्रत रावजी हुजूर गेले याकरितां निंबाळकर म॥रहीं हुजूर जाणार. हरी उमाजीस रावजीनीं समागमें घेतलें आहे. रा॰ हरीपंत फडके यांस उदरशूलव्यथा उत्पन्न जाहली. याकरितां बहुत अस्वस्थ. हें वर्तमान पूर्वीं लिहिलें आहे. त्यास पंत म॥र यांची प्रकृती स्वस्थ नांहीं. पोटांत शूल व वांती होती ते समईं रक्त पडतें. उपचार औषधाचे बहुत करितात. परंतु साध्य होत नांहींत. येथील समग्र मंडली कोंकणस्थ आदिकरून लोकानीं व अनुष्ठानास ब्राह्मण घातले आहेत. त्यानीं निश्चय केला आहें कीं कोण्हीं प्रयोग केला त्याची बाधा जादूसंमधी आहे. व कितेकाचें कयासांत वासुदेवभट करवे व इतर येक दोयें ब्राह्मण कैदेंत समाप्त जाहले ते लागले. यैकिल्याप्रमाणें लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें. चिरजीवास पत्र लिहिलें ते पावले हे विनती.

---

**A. R. No. 96.**

३ रमजान ११९५ हिजरी
२३ आगस्ट १७८१

पै॥ छ १० रमजान सन ११९५ हिजरी, रोज गुरुवारी अस्तमानी दारोग्याचे विद्यमाने डाकेबराबर पावले.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. यथील कुशल ता॥ छ ३ माहे रमजान

मु॥ पुणे स्वामीचे कृपावलोकणे करून येथास्थित जाणौन स्वानद लेखनआज्ञां करीत असिले पाहिजे. विशेष. यथील वर्तमान छ २ माहे म॥र रोज बुधवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाके-समागमे सेवेसी रवाना केले. ते पावोन सविस्तर वर्तमान ध्यानास येईल. तदनतर येथील वर्तमान श्रीमताचे वाडयात गनपतीचे उछ-वाचे नाचास नाना व कृष्णरावजी गेले होते. नाच वगैरे पाहून सध्याकाली आपले घरास गेले. हरीपतास समाधान वाटत नाही म्हणोन ते वाडयात आले नवते. शृत होये. राजश्री कृष्णरावजी रोज म॥री तेरा घटका रात्रपूर्व गेल्यानंतर मोहर्त करून प्रस्थानास गेले. उदईक गुरुवारी चतोर्थीस भोज्यन करून साहा कोस लोनीस मुकामास जानार. तेथून दो दिवसा बारामतीस जानार. बारामतीस बागात दोन तीन दिवस राहून, पुढे कूच दर कूच येज्यमानसाहेबाकडे येतात. रावजीसमागमे दोनसे स्वार व येक हाती, चालीस पनास मणुश शागिर्दपेशाचे दिल्हे आहे. शृत होये. राजश्री भगवतराव निबाळकर यासी व रावजीसी खलवत जाला. भाव यैकिल्यात आला की निबा-लकर म॥र यानी रावजीस सागितले आहे की हजूरात अर्ज करून नजरमाफी करून जागीरीचा बदोबस्त जाल्यास करावा. न जाल्यास श्रीमताचे पदरी पडलेच आहे. याप्रमाणे भाशणे जाली. राव-जीनीही कबूल केले आहे की तुम्हाविशई अर्ज करून बदोबस्त करून याप्रमाणे रावजी निबालकर म॥र यासी बोलले. शृत होये. प्रस्तुत भगवतरावजी निबालकर यास दोन हजार रुपये दरमाहा-प्रमाणे आठ हजार रुपये खर्चास दिल्हे. शृत होये. छ म॥री गुरुवारी राजश्री कृष्णरावजी रुखसत होऊन स्वार होऊन साहा कोस लोनीस मुकामास गेले. येक दोन दिवस बारामतीस राहनार. उपरातिक कूच दर कूच येज्यमानसाहेबाकडे येतील. राव मा॥र तिसरे प्रहरी स्वार होऊन गेले. शृत होये छ २१ माहे शाबानचे आज्ञापत्र डाकेसमागमे सादर केले ते छ २ माहे म॥री सेवकास पावले. पावोन संतोश जाला. पत्री आज्ञा की वरचेवर बारीक मोठे वर्तमान शोद करून लिहित जाणे, म्हणौन आज्ञा आहे. त्यास

आज्ञाप्रमाणे वरचेवर विनंतीपत्रे सेवेसी रवाना होतात. व अर्ज्याही हजूरात रवाना होतात. शृत होये. बहुत काय लिहिणे? कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 97.**

७ रमजान ११९५ हिजरी
२७ आगस्ट १७८१

पै।। छ १४ रो। सोमवार माहे रमजान संन ११९५ हिजरी डांकेवर दोन प्रहरास पावली.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां।। नमस्कार विनती उपरि. येथील वर्तमान ता। छ ७ रमजान भाद्रपद शुध नवमी इंदुवासर पर्यंत मो। पुणें क्षेम जाणून स्वकीय स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. पूर्वी छ ३ माहे म।।री हुजूरचे अर्जीसहित विनतीपत्र डांकेवर पाठविलें. ते सेवेसी व हुजूर पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रतचें वर्तमान पृथक पुरवणी पत्रावरून विदित होईल. चौथाईचे मामलतीची मोकलीक व्हावी ये विषंई कृष्टणरावजीची विनती हुजूर होती. याचें उत्तर हुजूरीहून इरशाद जाहला तो म।।र स्वामीनी कृपापत्रीं मुख्तसर लिहिला होता की नवाब मोइनुदौला बहादरांचे इतिल्यानें माघाहून लिहून पाठऊं. चिरजीव रघोत्तमराव यानींही संकळित व स्वामीचे व नवाबसाहबांचे आज्ञेप्रमाणें लिहून पाठऊं म्हणोन लिहिलें होतें. सांप्रत राजश्री गोविंदराव कृष्टण यानीं वर्तमान सागितलें कीं जिवाजीपंतास हुजूरचा इरशाद जाहला व त्यानी पत्री म।।र लिहिला आहे. जे सन ११८५ सालापासून मामलतीचा तह करून द्यावा याप्रमाणें करार असतां तह होत नांही. धास्तव पांच वर्षें अधिक रुपये वसूल नेला. याचा जिमा कोण्ही केल्यास मोकलीक करून

देऊं. याप्रमाणें इरशाद जाहला. याचें उतर कृष्टणरावजीनीं लिहिलें कीं हुजूर आल्यानंतर समक्ष रूबरू समग्र कामाचा फैसल होईल. चिरजीव राजश्री रघोतमराव यांची सरफराजी सेवकाचे अर्जीनुरूप व्हावी. ये विषई पूर्वी विनतीपत्र अर्जी लिहून चिरंजीवाचे स्वाधीन केली आहे. सांप्रत येक लिहून पाठविली आहे. चिरंजीव स्वामीस दाखवितील. मर्जीस आलियां गुजराणावी. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पैं।। छ १४ माहे रमजान संन ११९५ हिजरी रोज सोमवार डांकेवर.

श्रीनिवास

अखबार पुणें. अज इ।। छ ३ रमजान लगायत छ ७ माहे म।।र सन ११९५ हिजरी. इंदुवासर भाद्रपद. कृष्टणराव बलाळ यानीं छ २ माहे म।।रीं पंतप्रधानांची रुखसत घेऊन छ ३ रोजी बालाजीपंत व हरीपंताचा निरोप घेतला व हुजूर जावयाकरितां स्वार होऊन लोणीचे मुकामास गेले व यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित छ ३ माहे म।।रीं हुजूर अर्जी व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर पाठविलें तें पाऊन वर्तमान कळलें असेल. त्याउपरि प्रत्यक्ष व जाहलें वर्तमान दफेवार लिहिलें असे. रघुनाथराव डांगरी व गढेंकामळेसमीप सुरतेहून पंधरा सोळा कोसी आहेत व करनल गाडर राव म।।रनुलेचे समजाविसीकरितां मुंबईहून स्वार होऊन सुरतेस गेला म्हणोन पूर्वील पत्री म।।र लिहिला होता. साप्रत पंतप्रधानांचे सरकारची बातनी आली नांहीं. परंतु खारिज सर्वतोमुखी चर्चा आहे की गाडर रघुनाथराव यांचे लश्करास येऊन बहुताप्रकारें दिलदारी व खातरजमा करून माघारा घेऊन गेला. सुरतेसमीप

तीन कोसी जाऊन उतरले आहेत, म्हणोन यैकिलें. गणेशपंत बहिरे व आणखीं खानगीं शागिर्द यांचे विद्यमानें बालाजीपंत व हरीपंत रघुनाथराव यांसी यैक्यतेचा पैगाम करीत आहेत. परंतु रघुनाथरायांस यांचे वचनाचा व बोलण्याचा भरवसा कोणेही प्रकारें येत नाही. दसऱ्यानंतर मोहिमेचा निश्चय इंगरेजांचा आहे. माहदाजी सिंदे काळाबाग शाहदवऱ्यासमीप व इंगरेजांची फौज दाहा कोसाचे फासल्यानें हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिले होतें. सांप्रत यैकिलें की इंगरेजानीं सिंद्यावर शबखून घातला व सरजाम-बहिर-बुनगा टाकून पळाले. लश्कर लुटलें गेले. याप्रकारें बाजारी सर्वतोमुखी चर्चा आहे. पंतप्रधानांस कलमी किवा अवातर बातमी आली नांहीं. पंतप्रधानांचेथें खबर आल्यानंतर जे तहकीक खबर येईल ते लिहून पाठऊं.

हैदर नाईक चिनापटणापासून च्यार कोसाचे फासल्यानें व इंगरेजांची पलटणें चिनापटणांत आहेत. पूर्वील लढाईंत हैदर-खानाकडील सरदार पडले व खराबी फार जाहली त्या दिवसापासून ज्याहालत करून इंगरेजांवर चालून जात नांहीं व इंगरेजहीं खान म॥रावर चालून येत नांहींत.

मानाजी फांकड्याकडील बातनी येथील कारपरदाजास आली कीं परली परगण्यांत वेंका माहार याचे आश्रयास जाऊन राहिला आहे. धोंडो अपा पुरंदरे यांचे विद्यमानें पत्रें गेलीं आहेंत त्याचे दरजवाब आले नांहींत.

गणपतीचा उत्साह वर्षप्रमाणें होत आहे. पंतप्रधान व वरकड सरदार वगैरे मजलसींत बमोजिब तलब येतात. छ ६ माहे म॥रीं गाजुदीखानाचा पुत्र गेला होता. कृष्टणरावजीचे पुत्र गोविंदराव बोलावयाकरितां गेले होते. इतर मुतसदी व सरदार व वकील बमोजिब तलब जातेत.

२

श्रीनिवास

पुरवणी अखबार छ ७ रमजान सन ११९५ हिजरी.

रो। हरीपंत फडके यांची प्रकृती अद्यापि स्वस्थ नांही, दरबारास येत नांहींत.

मालोजी व शंकराजी घोरपडे शरीर व त्यांजकडें कांहीं संशय फितुराचा दोन वर्षांपासून आहे. परंतु जबरदस्त व माहदाजी सिंद्याचे सिफारसी. याकरितां कारभारी आजीपर्यंत भ्रमांत वलते आहेत. परस्परे संशयाकरितां उभयतां घोरपडे दरबारास येतच नांहीत. आले तरी जभाव सुधां येतात. श्रुत होय. हे विनती.

रो। कृष्णराव बलाळ बारामतीस येक मुकाम करून तेथोन स्वार होणार. हा नेम रावजीचे मुखं यैकिला होता. साप्रत गोविंदरावजीनी सांगितलें जे तीन दिवस राहतील. सारांश दोन दिवस अधिक उणे सत्वरच हुजूर येतील. हे विनती.

पै।। छ १४ माहे रमजान सन ११९५ हिजरी रोज सोमवार दोन प्रहरास डांकेवर पावली.

---

**A. R. No. 98.**

८ रमजान ११९५ हिजरी
२८ आगस्ट १७८१

पै।। छ १४ रोज सोमवार माहे रमजान संन ११९५ हिजरी दोन प्रहरास डांकेवर पावली.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसीजे. येथील कुशल ता। छ ८ माहे

रमजान मु॥ पुणे स्वामीचे कृपावलोकणें करून येथास्थित जाणौन स्वानद लेखन आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष. यथील वर्तमान छ ३ माहे म॥र रोज गुरुवारी तिसरे प्रहरी राजश्री कृष्णरावजी स्वार जाल्याचे वर्तमान सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर येथील वर्तमान राजश्री कृष्णरावजी स्वार होऊन बारामतीस गेले. तेथे दोनतीन दिवस राहून उपरातिक कूच दरकूच हजुरात येणार. रावजीसमागमे राजश्री गोविदराव भगवतही आले आहेत. रावजी सत्वरच तेथे येऊन पोहचनार. शृत होये. राजश्री कडोजी भापकर व दुर्गोजी भापकर खानदेशात कोडाईबारीजवल होते. त्यास दुर्गोजी भापकर पाचच्यारसे स्वारानसी कोडाईबारी-जवल आहेत. कडोजी भापकर दाहावीस स्वारानसी येथे आले. कारन की लोकास खायास खर्चास नाही. म्हणौन पैका मागावयास आले आहेत. भापकर म॥र याची व कारभारी म॥र याची भेट एका दो दिवसा होनार. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले. शृत होये. छ ४ रोज शुकरवार श्रीमत राजश्री दादासाहेब सुरतेहून सोनगडास आले होते. तेथे सटोजी भोसले वगैर याच्या भेटी जाल्या. पुढे ते फौज वगैर ठेऊन कोडाईबारीकडे येऊन उपद्रव करनार. हे वर्तमान पूर्वीचे विनंतीपत्री सविस्तर लेखन केले होते त्याजवरून शृत जाले असेल. प्रस्तुत वर्तमान आले की कर्नेल गाडर ममईहून सुरतेस गेला होता. त्यास गाडर म॥र दादासाहेबाकडे जाऊन, दादासाहेब सोनगडाजवल पाच साहा कोसावर होते त्याची समजूती करून, मागती दादासाहेबास सुरतेस घेऊन गेले यैसे वर्तमान आले. त्यास दादासाहेब सोनगडाजवल आले होते. मागती दादासाहेब सटोजी भोसले वगैर सहित सुरतेस गेले यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. गनपतीचा उछव श्रीमताचे वाडयात आहे. कारभारी वगैर नित्य नाच पाहावयास वाडयात जात असतात. शृत होये. छ ५ रोज

शनवार हैदरनायकासी व इग्रजासी लडाई जाली. नाईक मा।र सिकस्त होऊन माघारे पाच सात कोस गेले. हे वर्तमान पूर्वी लेखन केले होते त्याजवरून शृत जाले असेल. प्रस्तुत वर्तमन आहे की नाईक मा।र यासी व इग्रजासी लडाई जाली. नाईक मा।र कायेम होऊन पाचसात कोस पुढे गेले. पुढे चिनापटनाकडे जाणार यैसे वर्तमान नाईक मा।र याचे वकीलाकडे आले. हे वर्तमान वकील मा।र यानी कारभाऱ्यास सागितले. दोन घटका कारभाऱ्यासी व वकील मा।र यासी खिलवत जाला. नाईक मा।र यास पत्रे लिहिणार. शृत होये. हिदुस्थानप्राती सिद्यासी व इग्रेजासी लडाई जाली. उभयेपक्षी मणुशे फार जाया जाली. इग्रजाजवल सरजाम विशेष आहे. गालिब आहेत यैसे वर्तमान आहे. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. उपरातिक नाना हरीपताचे येथे गेले होते. कारन की हरीपतास समाधान वाटत नाही. हरीपतास पाहून उपरातिक नानाचा व हरीपताचा च्यार घटका खिलवत जाला. खिलवत होऊन नाना आपले घरास गेले. शृत होये. छ ६ रोज रविवार श्रीमताचे येथे गनपतीचे उछवाचा नाच होत असतो. नाच पाहावयास नवाब गाजुदीखानाचे पुत्रास अनावयास गोविदराव रावजीचे चिरजीव यास पाठविले होते. त्यास घेऊन आले. गाजुदीखानाचे पुत्र नाच पाहवयास वाड्यात आले. वाड्याबाहेर त्यास पेशवा नाना गेले होते. त्यास वाड्यात आनिल होते. नाच पाहवयास श्रीमत व गाजुदीखानाचे पुत्र वगैर सर्व बसले होते. दोन तीन घटका नाच वगैर पाहून उपरातिक गाजुदीखान याचे पुत्र आपले बिऱ्हाडास गेले. शृत होये. रा। सखारामबापूचे क्रियेस पाच हजार रुपये पाठविले होते हे पूर्वी लेखन केले होते. प्रस्तुत त्याचे दानास येक पालखी व येक घोडे सासवडास पाठविल्ले. शृत होये. रा। चितो विठल मृत्य पावले. हे पहिले लेखन केले होते. त्यास चितोपंत मृत्य पावले. शृत होये. रा। हरीपताचे येथे गनपतीचा उछव होता म्हणौन नाना कथेस हरीपताचे येथे आले होते.

ललित वगैर करून उपरातिक नाना आपले घरी गेले. शृत होये.
छ ७ रोज सोमवार इग्रजाचा ज्यमाव कल्यानी व ममईस फार जाला आहे. करनेल गाडर सुरतेस गेला आहे, तो

पुरवणी २

ममईस आलियावर इकडे उद्वोग करनार यैसे वर्तमान आहे. शृत होये. कोकनप्राती तलेघोसाल्याकडे हबशाने उपद्रव माडला आहे. कारन की हबशाची त्या प्रातात चौथ वगैर आहे, ते येथास्थित चालत नाही म्हणौन त्यानी उपद्रव माडला आहे. त्यास पहिलेप्रमाणे हबशाचा बदोबस्त करून देनार. शृत होये. हरीपत व नाना याचा नित्य खिलवत होत असता. भाव हाच की पुढे इग्रजाचे मसलतीचा व दौलतीचे बदोबस्ताचा. अस्वीन मासी कारभारी वगैर बाहेर निघनार यैसी वदता आहे. शृत होये. राजश्री कृष्णरावजी छ ३ माहे मा।री स्वार होऊन बारामतीस गेले. तेथे येक दोन दिवस राहून कूच दरकूच हजुरात येज्यमानसाहेबाकडे यैतात. तेथे राव मा।र आलिया सर्व स्वामीचे ध्यानास येईल. शृत होये. राजश्री कृष्णरावजी चिरजीवास हजूरचे मुलाजमतेस समागमे घेऊन येत होते. राव मा।र चिरजीवासही समागमे नेतात. येथोन कारभाऱ्यास काही येक संशये पडला. त्याजवरून कारभाऱ्यानी रावजीस म्हटले चिरजीवास समागमे न न्यावे आम्हा-पासी असू द्यावे. यैसा जाबसाल जाल्यानतर रावजीनी चिरजीवास येथे ठेविले. समागमे गोविदराव भगवत यास घेऊन गेले. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे, हे विज्ञाप्ती.

# पुणें अखबारांतील कठिण शब्दांचे अर्थ

**(अ.)–अरबी; (फा.)–फारशी; (तु.)–तुर्की; (हिं.)–हिंदुस्थानी;**
**(सं.)–संस्कृत; (म.)–मराठी; (रा. व्य. को.)–राजव्यवहारकोश.**

### अ

**अकलनाकस (अ.)**, अल्पबुद्धी.

**अकसर (अ.)**, बहुशः , सर्वसाधारणपणें.

**अखबारनवीसी (फा.)**, वार्तालेखन, बातम्या कळवणें.

**अखरश (फा.)**, सरतेशेवटीं.

**अंगूर (अ.)**, द्राक्ष.

**अज्म (अ.)**, निश्चय, बेत.

**अज् (फा.)**, पासून, मुळें.

**अजमाश (फा.)**, चांचणी, परीक्षा.

**अंजाम (फा.)**, परिणाम, शेवट.

**अजीज (अ.)**, प्रियव्यक्ति.
अजीजस्तुभवेदिष्टम्-नात्यांतली व्यक्ति.

**अदा करणें (फा.)**, प्रगट करणें, फेड करणें.

**अंदेशा (फा.)**, संशय, विचार.

**अफजायश (फा.)**, वाढ, आधिक्य.

**अफलातून (अ.)**, प्लॅटो, बुद्धिमान मनुष्य.

**अमलनलास, अमलनालिस (अ. फा.)**, गाऱ्हाणें चव्हाट्यावर टांगणें; कोर्टांत फिर्याद करणें.

**अयश, ऐश (अ.)**, चैन, सुख, विलास.

**अर्जमारूज (अ.)**, विनंत्या, प्रार्थना.

**अरस्तु (फा.)**, ॲरिस्टॉटल.

**अलकाब (अ.)**, पदव्या, मायने.

**अलतगमा, अलतमगा (तु.)**, राजमुद्रा. कायमची देणगी.

**अलाहिदा (अ.)**, पृथक, विभक्त, निराळें.

**असल (अ.)**, अकृत्रिम, खरें.

**असामी (अ.)**, (इस्म शब्दाचें अनेकवचन), व्यक्ति नेमणूक, वार्षिक वेतन.
असामीनाम वृत्तिदानपत्रम्. (रा. व्य. को.)

**अहद (फा.)**, करार.

**अहदपैमान (फा.)**, वचनप्रमाणानें करार करणें.

### आ

**आईना (फा.)**, आरसा, प्रतिबिंब.

**आखरिश (फा.)**, सरतेशेवटीं.

**आजमोदाकार (फा.)**, अनुभवी, प्रौढ विचाराचा.

**आजुर्दगी (फा.)**, दुःख, असंतोष, कष्टीपणा.

**आजुर्दा (फा.)**, असंतुष्ट.

**आबखोरा (फा.)**, पाणी पिण्याचें भांडे.

**आमिल (अ.)**, अधिकार गाजविणारा, सरकारनियुक्त अधिकारी.

**आरजू (फा.)**, इच्छा.

**आरजूमंद (फा.)**, इच्छा बाळगणारा, इच्छुक.

**आलम (अ.)**, विश्व.

**आलमियात (अ.)**, विश्वनिवासी.

**आवारा (फा.)**, अनिर्बंध संचार करणारा, उच्छृंखल.

